हिंदुधर्माचा अत्यंत अभिमानी
व महा विद्वान.

# पंडित जगन्नाथराय.

वानोत निंदोत सुनीतिमंत ॥
चलो असो वा कमला गृहांत ॥
ये मृत्यु आजी अथवा युगांतीं ॥
सन्मार्ग टाकूनि भले न जाती ॥ १ ॥

वामन पंडित.



कोणताही देश पाहा—ह्मणजे त्याच्या ऐतिहासिक माहितीच्या संबंधानें विचार करून पाहतां त्यांत नामांकित कवि, विद्वान, शूर, राज्यकारणपटु मुत्सद्दी आणि पतिव्रता स्त्रिया होऊन गेलेल्या असणारच. आमच्या या भरतखंडांत विद्वान असे कवि व रणशूर पुरुष आणि राज्यकारस्थानी स्त्रिया किती तरी निर्माण होऊन गेलेल्या आहेत! युरोपखंडांत साधारण एखादा विद्वान असला तरी त्याचे जातभाई आपल्या देशाचा नांवलौकिक होण्याकरितां पाहिजे तशा रीतीनें त्याचा गौरव करून नसतें देव्हारें माजवितात. तसा प्रकार आपल्या देशांत नाहीं आपल्या देशांत उत्तम विद्वान, कवि व योद्धेपुरुष आणि स्त्रिया हजारों होऊन गेलेल्या आहेत. पण त्यांचे ग्रंथ किंवा त्यांची माहिती कोणीही

पुढें आणीत नाहीं, हें आमचें मोठें दुर्दैव समजलें पाहिजे. आपल्या देशांत अशा तऱ्हेचीं उत्तम रत्नें निर्माण झालेलीं असून त्यांना कोणींही न विचारतां विलायतेकडील लोकांच्या ग्रंथांचीं हल्लीं भाषांतरें करण्याचा हिंदुस्थानानें मक्ताच घेतला आहे असें मात्र ह्मणावें लागतें.

आपल्या देशांत प्रयत्न करून माहिती मिळविणारे गृहस्थ फार थोडे. हल्लींचे जे कांहीं विद्वान निर्माण होऊं लागले आहेत त्यांस सर्व आयती सामुग्री मिळाल्यास ते एखादें पुस्तक लिहितील. पदरास खार लावून माहिती मिळविण्याकरितां जिवास त्रास देऊन जोखमाचें काम करण्यास ते सहसा धजत नाहींत. आमच्या भारतवर्षांत पूर्वोक्त मंडळीची जशी रेलचेल आहे; तशी दुसऱ्या कोणत्याही देशांत नाहीं. मात्र त्यांच्या जीवनवृत्ताच्या संबंधानें एकवाक्यता जर कोणी पाहूं इच्छील तर ती मिळणें दुरापस्त होईल. या भरतभूमींत जे मोठे मोठे विद्वान कवि, तसेंच महापराक्रमी राजे, मुत्सद्दी त्याचप्रमाणें रणशूर कित्येक अबला होऊन गेल्या त्यांची माहिती त्रोटक त्रोटक अशी पुष्कळ सांपडेल, प्रयत्नशील मनुष्यानें प्रयत्न मात्र झटून केला पाहिजे. पूर्वीचे संस्कृत ग्रंथ, पारशी ग्रंथ, आख्यायिका, जुने कागद, अनेक कवींचे दुसरे ग्रंथ, राजे लोकांच्या वंशावळी, तहनामे, करारनामे, प्रवासवृत्त,

या सर्व गोष्टींची माहिती प्रथमतः करून घेऊन मग या कामाच्या तयारीस लागलें पाहिजे.

**पंडित जगन्नाथराय** या विद्वान व नांवाजलेल्या उत्तम **कवी**ची माहिती मिळविण्याकरितां बऱ्याच ठिकाणीं प्रयत्न करून आह्मी आज ही अत्यंत महत्वाची माहिती वाचकांपुढें मांडीत आहों. आपल्या भरतभूमींत पूर्वी जीं मोठमोठीं विद्वान रत्नें होऊन गेलीं त्या सर्वांत पंडीत **जगंनाथराय** यांची विद्वत्ता फार मोठी आहे असें ह्मणतात. या विद्वानासारखा **पंडित** आजपर्यंत कोणी झालेला नाहीं. **पंडित जगन्नाथराय** हा मोठा निस्पृह असून बाणेदार असा होता. त्याचेठायीं हांजी हांजीपणा जर असता तर त्याची चहूंकडे मोठी भरभराट होऊन गेली असती. व त्याच्या एकंदर अलौकिक गुणाची मोठी कीर्ति होऊन तो देवाप्रमाणें या पिढीस पूज्य होऊन राहिला असता.

**पंडित जगन्नाथराय** हा आपल्या विद्वत्तेच्या जोरावर कोणाचीही पर्वा न बाळगतां स्वच्छंदपणानें वागे. मोठमोठ्या राजेलोकांची सुद्धां या विद्वान कवीनें पर्वा केलीं नाहीं. या कवीबद्दलची बरीच माहिती **मद्रास** इलाख्यांत व **दिल्ली, लाहोर, लखनौ,** या शहरीं मिळते. वर लिहिलेल्या ठिकाणची माहिती आह्मी मि-

ळविली आहे व याशिवाय खालीं लिहिलेल्या जागीं ही आह्मास कांहीं माहिती मिळाली आहे. तीं ठिकाणें येणेंप्रमाणें—

श्रीमंत **आप्पासाहेब जमखिंडीकर** यांच्यासारखा पुस्तक संग्रह दक्षिणेंत कोठेंही नाहीं. पाहिजे तो ग्रंथ यांच्या संग्रहास आहे. यांच्या **लायब्ररींत** या विद्वानाबद्दल पुष्कळ प्रकारची माहिती आह्मांस मिळाली.

कै० श्रीमंत **तात्यासाहेब** रास्ते वांईकर—झुंजुरवाडचे इनामदार यांजकडेही बरीच माहिती मिळाली. कै० **कृष्णराव** गोविंद लिमये, यांनीं पंडित **जगन्नाथरायांचें** चरित्र लिहिलें आहे. त्यांतूनही बरीच माहिती मिळाली. शिवाय नाट्यकथार्णव, कविचरित्र, यांचीही चांगली मदत झाली आहे.

पंडित **जगन्नाथराय** यांची इ. स. १५९६ पासून १६०९ पर्यंत कारकीर्द उत्तम तऱ्हेनें चालल्याचा पुष्कळ ठिकाणीं दाखला मिळतो. या विद्वान पंडिताची बाळपणाची हकीकत विस्तारानें चांगलीशी कुठेंच मिळत नाहीं. साधारण त्रोटक जी माहिती मिळते ती येणेंप्रमाणें-हे **पंडितराय** तेलंगी ब्राह्मण होत. यांचें घराणें त्या प्रांतीं विद्वत्तेच्या संबंधानें फारच प्रसिद्ध आहे. आठ दहा पिढ्या होऊन गेल्या. त्यांत अनेक महा विद्वान रत्नें निर्माण झालीं. या घराण्याचा लौकिक **काशीपासून रामेश्वरापर्यंत** एकसारखा गाजत होता. कित्येक ठिकाणीं राजेरजवा-

ड्यांत अशी चाल आहे कीं, एखाद्या सभेच्या बैठेस किंवा इतर कांहीं समारंभास राजे हजर नसल्यास त्यांची गादी मांडून ठेवून त्या जागेस सर्वांनीं मान देण्याची रीत अद्यापपर्यंत आहे. तशी रीत त्या प्रांतीं या पंडितरायांच्या घराण्याकडे त्यांच्या अलौकिक विद्वत्तेच्या जोरावर त्यांच्या घराण्यांतील कोणी पुरुष एखाद्या वेळीं सभेस गैरहजर असला ह्मणजे त्याचें आसन सर्वांच्या मध्यभागीं मांडून त्या जागेस सर्व नमस्कार करून मग कामास सुरवात करीत, व पुढें हे पंडितराय तो देश सोडून या प्रांतीं आल्यावर सुद्धां पूर्वीची पद्धत चालत होती. कित्येक लोकांचें असें ह्मणणें आहे कीं, ( या ह्मणण्यांस ग्रंथांतरींही पुष्कळ आधार आहे. ) यांच्या घराण्यांतील एकंदर पुरुष मोठे उत्तम पैकीं विद्वान निपजून यांची बरोबरी करणारा विद्वान सगळ्या हिंदुस्थानांत त्या वेळीं नव्हता. या घराण्यास परमेश्वराचें वरदान होतें, असें ह्मणावें लागतें. प्रत्यक्ष सरस्वतीच त्यांना वेदाध्ययन शिकविते कीं काय असें लोक ह्मणत. आठ दहा वर्षांचा मुलगा झाला कीं, तो उत्तमपैकीं विद्वानांत मोडूं लागे. पूर्वापार हें घराणें कोणाचीही हांजी हांजी करून राहणारें नसून कोणाचीही भीड न धरतां जें खरें असेल तें त्यांच्याकडून निघे. या त्यांच्या निस्पृहपणानेंच त्यांचा इतका लौकीक झाला असें ह्मणावें लागतें. इतर

लोकांप्रमाणें या घराण्यांतील मंडळींनें जर राजाश्रय संपादन केला असता तर यांना मोठमोठ्या जाहगिरी मिळाल्या असत्या. पण त्या ऐश्वर्याची, पर्वा न करितां या घराण्यांतील एकंदर पुरुषांनीं पूर्वीचाच कित्ता गिरविला.

पंडित **जगन्नाथराय** यांच्या बापाचें नांव **पेरम** किंवा **पेरूभट्ट** असें होतें. पेरूभट्टाच्या बायकोचें नांव **लक्ष्मीबाई.** यांच्या कुळाचें नांव **वेगीनाडकुल. पंडितराय** वीस वर्षांच्या वयाचा झाला इतक्यांत त्याचे मातापितर वारले. पुढें तीन चार वर्षांनीं **पंडितरायाचें** लग्न झालें व पंडितरायास एक मुलगाही झाला. पण पुढें लवकरच बायको व मुलगा हा मृत्यु पावलीं. यामुळें **पंडितरायास** चैन पडेनासें झालें; व संसारयात्रेचा कंटाळा येऊन त्यानें देशपर्यटनाचा विचार मनांत कायम केला. यावेळीं या **पंडितरायांनीं** आपल्या घराण्याच्या पूर्वापार लौकिकास साजतील असे पंधरा सोळा उत्तम ग्रंथ तयार केले व त्या ग्रंथांची चहूंकडे फारच तारीफ होऊन गेली. या विद्वान पंडितानें जे ग्रंथ तयार केले आहेत त्या ग्रंथांस दुसऱ्या कोणत्याही ग्रंथाचा मुळीच आधार घेतला नाहीं. फार तर काय दुसऱ्या कोणाचा श्लोक सुद्धां दाखल्यासही घेतला नाहीं. कोठें कांहीं दाखला देण्याचा प्रसंग आल्यास स्वतः पद्यें तयार करून पुस्तकें तयार केलीं. आपलें पुस्तक चांगलें झालें

किंवा वाईट झालें हेंही कवीनें कोणास न दाखवितां एकदम मनांतील विचार शिष्यांस सांगून कागदावर लिहिविण्याचा प्रघात ठेविला होता. यांनीं केलेले ग्रंथ येणेंप्रमाणे–

१ **अमृतलहरी**–हींत यमुनानदीची स्तुति आहे.

२ **पीयुषलहरी**–हींत गंगालहरी. हींत गंगेची स्तुति आहे.

३ **लक्ष्मीलहरी**–हींत विष्णूची स्तुति आहे. हिला विष्णुलहरीही ह्मणतात.

४ **करुणालहरी**–हींत लक्ष्मीची स्तुति आहे.

५ **आसफविलास**–यांत नबाब आसफखान याचा वृत्तांत आहे. हा ग्रंथ अद्यापि समग्र मिळाला नाहीं.

६ **भामिनीविलास**–रसगंगाधर ग्रंथांतील बऱ्याच पद्यांचा यांत संग्रह केलेला आहे.

७ **सुधालहरी**–हींत सूर्याची स्तुती आहे.

८ **प्राणाभरण**–यांत कामरूप उर्फ आसाम देशचा राजा प्राणनारायण याचें वर्णन आहे.

९ **जगदाभरण**–यांत शहाजानचा पुत्र दाराशिकोह याचें वर्णन आहे. प्राणाभरण व हें जगदाभरण-काव्य हीं दोन्ही एकच आहेत. प्राणाभरणांतील पद्यांत जेथें प्राणनारायण असें होतें तथें दाराशाह घालून हें काव्य तयार केलें आहे.

१० **चित्रमिमासा खंडण**–यांत आप्पय्या दिक्षित-

कृत चित्रमिमांसा ग्रंथांतील एकंदर दूषणांचा संग्रह केलेला आहे.

११ **मनोरमा कुचमर्दन**—यांत भटोजी दिक्षिताच्या मनोरमा ग्रंथाचें खंडण केलेलें आहे.

१२ **यमुना वर्णन**—हा गद्य ग्रंथ अद्याप उपलब्ध नाहीं.

१३ **रतिमन्मथ नाटक**—सर्व प्रसिद्धच आहे.

१४ **रसगंगाधर**—हा साहित्यशास्त्रावर ग्रंथ आहे. हा पंडित रायांचा मुख्य ग्रंथ होय. गंगाधर ह्मणजे **शिव** याला पांच मुखें आहेत त्या प्रमाणें या ग्रंथाचेही पांच भाग करून त्या प्रत्येकाला " आनन " असें नांव देण्याचा कवीचा उद्देश होता. परंतु हल्लीं उपलब्ध ग्रंथांत पाहिलें " आनन " समग्र असून दुसरें अपुर्तं आहे, इतकेंच नव्हे तर त्यांतील शेवटची आर्याही अपुर्तीच राहिली आहे ती अशी—

**किंकुर्वतेदरिद्राःकासारवतीधराःमनोज्ञतराः।**
**कोपावन त्रिलोक्यां—... ... ... ... ... ... ...**

यावरून हा ग्रंथ पुरा करण्यापूर्वींच **कवि** परलोकीं **गेला** असावा असें वाटतें.

इतके ग्रंथ या कवीचे आहेत. यांशिवाय देवांदिकांवर लहान लहान अशीं बरींच स्तोत्रें यानीं केलेलीं आहेत असें समजतें.

**पंडितरायांची** पत्नी मृत्यु पावल्यावर **भामिनि-**

विलास व **रतिमन्मथ** नाटक हीं दोन पुस्तकें केल्याचें समजतें. **पंडितरायानें** आपल्या आईच्या नांवाची आठवण राहण्याकरितां **लक्ष्मी** या नांवानें देवीची स्तुती करून तिचें **लक्ष्मीलहरी** असें नांव ठेविलें.

नाट्यकथार्णव कर्ते यानीं पंडित **जगन्नाथराय** कवीचें संस्कृत **रतिमन्मथ** नाटक सर्व लोकांस चांगल्या तऱ्हेनें समजून येईल अशा रीतीनें मराठींत त्याचें भाषांतर करून आपल्या मासिकांत प्रसिद्ध केलें आहे या कवीचा हा ग्रंथ फारच बिकट असा आहे. मराठींत कविता करून त्यांची समजून पडण्याकरितां पुष्कळ टिपा दिलेल्या आहेत. व याच नाटकांत उपोद्घात ह्मणून **पंडित** रायाची ऐतिहासिक माहिती सर्वत्रांस समजण्याकरितां **पंडित-रायाच्या** ग्रंथांतील पुष्कळ उतारे घेऊन चांगली माहिती तयार केली आहे. या कामीं ना. क. कर्ते रा. रा. शंकर मोरो रानडे यांनीं पुष्कळ परिश्रम केलेले दिसतात. **रतिमन्मथ** नाटक ज्यावेळीं मराठींत प्रसिद्ध झालें त्यावेळीं या नाटकाबद्दल पुष्कळ तारीफ ऐकूं येत होती. पुढें लोक-रुचि बदलत चालली व लोकरुचीप्रमाणें **रतिमन्मथ** नाट-कास संगीताचें रूप देऊन ‘ संगीत रतिमन्मथ नाटक ’ सात अंकी **कृष्णराव गोविंद** लिमये यांनीं तयार केलें आहें व त्यांतच पंडित रायाचें त्रोटक चरित्रही दिलें आहे.

**पंडित जगन्नाथराय** हे महा रसिक, निस्पृह व निर्भिड होते. हे देशपर्यटन करीत मोठमोठ्या राजांच्या

भेटी घेत निघाले. या **पंडितरायांची** योग्यता न समजतां कित्येक राजेलोक आपल्या डौलांत राहून. यांचा धिःकार करीत यावरून खरोखरी त्यांस विद्वानांची पारख नव्हती असें ह्मणावें लागतें.

> [१]भुजतरुवनच्छायांयेषानिषेव्यमहौजसां ॥
> जलधिरसनामेदिन्यासीदसावकुतोभया ॥
> स्मृतिमपिनतेयान्तिक्ष्मापाविनायदनुग्रहम् ॥
> प्रकृतिमहतेकुर्मस्तस्मैनमःकविकर्मणे ॥ १ ॥
>
> राजतरंगिणी.

**पंडितरायांनीं** पुष्कळ राजांच्या भेटी घेऊन व राजे लोकांच्या उद्दाम वर्तनाबद्दल जेथल्यातेथें भर दरबारांत कविता करून बरीच त्यांची निर्भत्सना केली. ते **जयपुरास** आले. तेथें त्यांच्या मनाप्रमाणें दरबारांतून मानमरातब होऊं लागला व तेथील राजांनीं **पंडित** रायांची विद्वत्तेच्या संबंधानें पुष्कळ दिवस कीर्ति ऐकली होती; व असलें रत्न आपल्या पदरीं सदोदीत असावें असें त्यांस वाटे पण उपयोग काय, **पंडितराय** हे कोणाच्या बोलावण्याप्रमाणे येऊन राहणार नाहींत हें त्यांस माहित होतें. असो.

---

१ ज्या महा पराक्रमी राजांची बाहुरूपी वृक्षच्छाया सेवन करून समुद्रमेखला पृथ्वी निर्भय झाली आहे; ते पराक्रमी राजेंद्र ज्या कवि कर्म कृपा विकाशा वाचून प्रसिद्धीस येत नाहींत, असे जे स्वभावतः मोठे **कविवर्य** त्यांच्या कृतीस आह्मी **नमस्कार** करितों.

पुढें कांहीं दिवसांनीं **पंडितराय** हे जयपुरास येऊन राहिल्यावर तेथील व दुसरीकडील कांहीं विद्वान पंडितानीं **पंडितरायाच्या** विद्वत्तेची परीक्षा करण्याकरितां एके दिवशीं सभा करून पंडितांची धर्मविषयावर चर्चा सुरू झाली व त्या कामीं **पंडितरायांनीं** जमलेल्या सर्व विद्वानास गप्प बसवून आपल्या अलौकिकबुद्धिसामर्थ्यानें सर्वत्रांस थक्क करून सोडलें. त्या दिवसापासून **पंडितरायांच्या** संबंधानें सर्वत्रांच्या मनांत ज्यास्त पूज्यबुद्धि उत्पन्न झाली. **पंडितरायांनीं** या शहरीं एक वेद शाळा स्थापन करून सर्वत्रांस शिक्षण देण्याची सुरवात केली. कोणत्याही ठिकाणीं हिंदुधर्माबद्दल वादविवाद करण्याचा प्रसंग आला असतां **पंडितरायांवांचून** वाद होत नसे. व याच्या सारखा विद्वान व निस्पृह गृहस्थ त्यावेळीं दुसरा कोणी नव्हता असेंच ह्मटलें पाहिजे. त्या वेळच्या कित्येक लेखांवरून असें दिसतें कीं, **पंडितराय** हा एकदां बोलूं लागला ह्मणजे सर्वांचीं अंतःकरणें वेधून टाकीत असे.

दिल्लीच्या तक्तावर त्यावेळीं **अकबर**[१] बादशहा होता व त्यास सर्व धर्ममतें समजून घेण्याचा फार नाद

---

१ हंटर साहेब यांनीं या बादशहाचें इंग्लिश भाषेंत चरित्र लिहिलें आहे त्यांत माहितीच्या संबंधानें पुष्कळ चुका आहेत. आपल्या देशांतील आणखी कांहीं लोकांनीं चरित्रें या गृहस्थांनीं लिहिलीं आहेत पण तीं हीं इंग्लिश लोकांच्या आजपर्यंतच्या वहिवाटीप्रमाणेंच आहेत.

असे व तो पूर्ण होण्याकरितां त्यानें कित्येक पंडित आपल्या पदरीं बाळगिले होते. हा प्रकार जरी खरा होता, तरी मुसलमानी धर्म कांहीं कमी दर्जाचा आहे असें त्याच्या मनानें घेतलें नव्हतें. त्या धर्माचा श्रेष्ठ-पणा सर्व धर्मांच्या विद्वान लोकांसमक्ष सप्रमाण रीतीनें स्थापन करण्याबद्दल त्याचे प्रयत्नही चालू होते. याच बादशहाचे कारकीर्दीत एक विद्वान काजी हिंदुधर्माचें खंडण व मुसलमानी धर्माचें मंडण करणारा निपजला होता व तो देशोदेशीं फिरून विद्वान ब्राह्मण पंडितांस धर्मविषयक वादांत जिंकून मुसलमानी धर्माचा थोर-पणा सिद्धकरून दाखवीत असे. हा काजी मुसलमानी धर्म उत्तम शिकून हिंदुधर्मांतही चांगला प्रवीण झाला होता. त्यास अकबर बादशहाचा चांगला आश्रय होता ह्मणूनच त्याच्याकडून हें काम होत असे. त्यानें हिंदुधर्माचा चांगला अभ्यास केला होता तरी त्याच्या बरोबर वादविवाद पुष्कळ लोकांनी केला असता; पण बादशहाची सर्वांस भीति होती. यामुळें काजीबरोबर कोणीं जास्त वाद वाढवीत नसत. हिंदुधर्माचा श्रेष्ठपणा कायम होऊन मुसलमानी धर्म अनादी नव्हे असें स्थापन झाल्यास बादशहास राग येऊन तो आपल्या राजपदाच्या जोरावर सर्व ब्राह्मण धर्मनष्ट करून टाकील या भीतीनें कोणी जास्त वाद न करतां काजीचें बोलणें ऐकून घेऊन गप्प बसत असत. यामुळें काजीस वाटे कीं, आपण मोठे

विद्वान आहों व आपल्याबरोबर वादविवाद करण्याजोगा दुसरे धर्मात कोणी नाहीं. अशा घमेंडींत असतां पुढें पुढें त्याचें प्रस्थ फारच माजत चाललें. चहुंकडे हिंडून झाल्यावर त्यानें दिल्लींतच आपला तळ दिला होता. आपली विद्वत्ता व आपल्या धर्मांचा श्रेष्ठपणा व इतर धर्मांचा कमीपणा बादशहाच्या समक्ष स्थापित करण्याचें त्यानें योजून त्या करितां **काशी** पासून थेट **रामेश्वरा**पर्यंत सर्व विद्वान पंडितांस **बादशहा**कडून येण्या करितां पत्रें लिहविलीं! त्या पत्रांत इतकेंच लिहीलें होतें कीं, " आमच्या दरबारीं एक विद्वान **काजी** आले आहेत त्यांनीं हिंदूधर्माचें व मुसलमानी धर्माचें चांगलें रहस्य समजून घेतलें असून त्या विद्वान काजीचे मनांतून हिंदुधर्म हा अनादिसिद्ध नसून तो मुसलमानी धर्मानंतर झालेला आहे अशा बद्दल सर्व विद्वान लोकांबरोबर वादविवाद करावा असें आहे. तर आपण सर्व विद्वानांनीं येऊन कोणता धर्म अनादिसिद्ध आहे तें ठरवावें. " असें होतें. हीं पत्रें चहूंकडे गेल्यानंतर सर्व लोकांस मोठी काळजी पडली, त्या विद्वान काजीच्या उभयधर्म निपुणतेबद्दल चोहोंकडे आधींच मोठी कीर्ति झालेली होती. मुख्यत्वें **बादशहाच्या** आश्रयामुळें तो ब्राह्मण पंडितांस धर्मविषयक वादांत जिंकील व आह्मी हिंदुधर्म अनादि आहे असें सिद्ध करूं व दिल्लींत बादशहा समोर मुसलमानी धर्म हिंदुधर्मानंतरचा फार नवाआहे

असेंही कदाचित् बोलूं पण या बोलण्या पासून बादशहास राग येऊन त्यानें सर्व ब्राह्मण लोकांप जेथल्या तेथें सुंता करून मुसलमान केलें तर काय करावें ? अशा विचारांत सर्व लोक राहिले. कित्येक लोक असें ह्मणूं लागले कीं, सर्वांनीं मिऊन उगी राहिल्यास तो विद्वान **काजी** बादशहा समक्ष आपला अनादि हिंदुधर्म खोटा ठरविणार आहे. असें सर्वांस वाटूं लागलें.

**काशी, रामेश्वर, कुंभकोण** वगैरे ठिकाणचे विद्वान पंडित असें ह्मणत कीं, या प्रसंगीं हिंदुधर्माचे पूर्ण अभिमानी व केवळ बृहस्पतीचा अवतार वेदोनारायण **पंडित जगन्नाथराय** या वेळीं जर कोठें असतील तर ते बादशहाची नव्हे प्रत्यक्ष देवाचीही पर्वा न करतां जो धर्म खरा असेल तो उघड रीतीनें राजदरबारीं सिद्ध करून दाखवितील. ह्मणून **पंडितरायांची** स्वारी कोठें आहे याचा तपास करण्यास सर्व लोक लागले. कांहीं दिवसांनीं शोध करितां **पंडितराय** जयपुरास स्वतंत्र वेदांची शाळा स्थापन करून राहिले आहत, असें समजलें. तेव्हां सर्व हिंदुधर्माभिमानी मंडळीस पडलेली काळजी थोडीशी दूर होऊन ते आनंदित झाले. याच सुमारास **पंडितरायानें** हिंदुधर्म अनादि आहे अशाबद्दल जयपुरास सभा करून सर्वांची सप्रमाण रीतीनें खात्री करून दिली होती. एकंदर विद्वान मंडळींनीं **जयपुरास** पंडित **जगन्नाथरायास** एक पत्र पाठवून असें कळविलें कीं " **दिल्लीपति अकबर** बादशहाचे

जोरावर एका काजीनें काशीपासून रामेश्वरापर्यंतच्या एकंदर ब्राह्मणपंडितांस धर्मसंबंधी वाद करण्यासाठीं यावें असें निमंत्रण पाठविलें आहे. तेव्हां विद्वत्तेत नाहीं तरी मुसलमानी राजसत्तेच्या बळावर तो आह्मां-पंडितांस जिंकणार आणि सनातन वैदिक धर्मावर कधीं न आलेला बिकट प्रसंग आणणार, असें सर्वांस वाटूं लागलें आहे. तर आपण पूर्ण हिंदुधर्माभिमानी असून प्रत्यक्ष वेदोनारायण आहां व या प्रसंगीं आपल्या वांचून हा धर्म राखणारा दुसरा कोणी नाहीं असें आह्मांस वाटतें करितां आपण वादविवाद करण्याचे तयारीनें दिल्लीस निघून यावें." असें विनंतीनें सर्वांनीं कळविलें व पंडितरायास पाठवून देण्याबद्दल जयपूरच्या महाराजांसही एक वेगळें पत्र पाठवून विनंति केली. पंडितरायांनीं दिल्लीस जाऊन वाद करावा असें जयपूरच्या महाराजांनीं सांगितल्यावर पंडितराय ह्मणाले कीं, मी वाद करण्यास जाईन पण ज्या धर्मासंबंधानें वाद करावयाचा, त्या धर्माची आपल्यास चांगली माहिती असली पाहिजे. आपला वैदिक धर्म आपण जाणतों पण मुसलमानी धर्मतत्वांची व आपली मुळींच ओळख नाहीं. करितां प्रथम तो धर्म समजून घ्यावा आणि मग वाद करण्यास तयार व्हावें हें चांगलें" यावर महाराज ह्मणाले कीं, हिंदुधर्माचें मंडण होईल अशाबद्दल आपण पाहिजे तो प्रयत्न करा त्यास कांहीं हरकत नाहीं." असें बोलणें झाल्यावर

ज्या मुसलमानी साधूचा आश्रय धरला होता तो संस्कृत भाषेंतही चांगला प्रवीण होता. पंडितरायांची तीव्र बुद्धि आणि आस्थापूर्वक शिक्षण घेण्याची पद्धत पाहून तो वृद्ध फकीर फारच खुष होऊन आपल्या धर्मांतील एकंदर तत्वें चांगल्या प्रकारानें समजावून देऊं लागला. एका वर्षाच्या आंतच पंडितरायानें मुसलमानी धर्म शिकून त्यांतील धर्म पुस्तक जें कुराण तें चांगल्या प्रकारानें समजावून घेतलें.

पंडितरायास पाठवून देण्याबद्दल दिल्लीच्या बादशहाकडून जयपूरच्या महाराजास जीं ३।४ पत्रें आलेलीं आहेत तीं व फकिरानें पंडितरायाच्या विद्वत्तेबद्दल एक पुस्तक उरदु भाषेंत लिहिलें आहे. तेंही जयपूरच्या दफतरांत अद्यापपर्यंत आहे. असो;

मुदत संपत येण्याचे अगोदरच पंडितरायांनीं आपली सर्व तयारी करून जयपूरच्या महाराजांचा निरोप घेऊन वाद करण्यासाठीं दिल्लीस प्रयाण केलें. त्यावेळीं सर्व शहरांतील लोकांनी पंडितरायावर फुलें उडवून मोठ्याआनंदानें सर्वांनीं हिंदुधर्माचें रक्षण करा, असा चोहोंकडून एकच गजर केला. इकडे पंडितरायाचें शिक्षण पुरें झाल्यावर त्या वृद्ध फकीरानें पंडितरायास चांगला आशीर्वाद देऊन आपल्या आल्लाचीं प्रार्थना करून तो कोणीकडे निघून गेला त्याचा पत्ता नाहीं. या विद्वान फकिराचा जयपूरच्या राजांनीं

पुष्कळ शोध केला पण कोठेंच पत्ता लागला नाहीं. दिल्लीस मुदत संपण्याचे आंतच काशीपासून रामेश्वरापर्यंतचे सर्व विद्वान शास्त्री पंडित जमा होऊं लागले होते. या एकंदर समुहाची संख्या तीन हजारांवर होती. या सर्व ब्राह्मण लोकांची व्यवस्था नीट राहण्याकरितां दिल्लीच्या बाहेर मोठमोठे तंबू देऊन चांगला बंदोबस्त केला होता. व त्यांना कोणत्याही प्रकारचा त्रास न पोहचतां आपल्या धर्माप्रमाणें यांनीं वागावें व त्यांस मुसलमान लोकांकडून त्रास पोहचूं नये असा दरबारी मंडळीस सक्तीचा हुकूम देऊन चांगले हुषार लोक त्यांच्या व्यवस्थेकरितां ठेविले होते. हीं सर्व व्यवस्था पाहून वाद करणाऱ्या काजीस फार वाईट वाटलें व त्यानें बादशहास असें केल्याबद्दल मोठा दोष दिला. त्यावर बादशहानें त्या काजीस असें सांगितलें कीं, "वाद करण्यास आलेले लोक वादांत हरले व आपली सरसी झाली तरी त्या लोकांस कांहीं वाईट न वाटेल अशा तऱ्हेनें त्यांच्याशीं वागणूक ठेवून त्यांचा बहुमान केला पाहिजे. यांतच आपला मोठेपणा आहे." असें भाषण ऐकतांच तो काजी निरुत्तर होऊन गप्प बसला.

पंडितराय ज्या दिवशीं दिल्ली शहरांत आले त्या वेळीं तेथें त्यांचा बादशहाकडून चांगला बहुमान झाला. व हें करणें मुसलमान लोकांस चांगलें वाटलें

नाहीं. पण बादशहापुढें कोणाचें चालेना. तेव्हां सर्व लोक गप्प बसले. नेमलेल्या दिवशीं राजदरबारांत वाद करण्याची सर्व व्यवस्था करून ५।६ हजार मनुष्यें बसतील अशी विस्तीर्ण जागा तयार केलेली होती. बादशहाच्या सिंहासनाशेजारीं एके बाजूस काजीस व दुसरे बाजूस पंडितरायांस उंच अशी जागा तयार केली होती. या जाग्याच्यापुढें सर्व समुदाय बसण्याची व्यवस्था करून एका बाजूस ब्राह्मण मंडळी व दुसरे बाजूस एकंदर सरदार व मानकरी लोक होते. दररोज वादास आरंभ बारा वाजतां होऊन सायंकाळचे पांच वाजेपर्यंत चाले. सकाळीं राजकीय काम चालण्याची व्यवस्था केलेली होती. हा धर्मविषयक वाद एकसारखा पंधरा दिवस फार व्यवस्थेशीर रीतीनें चालत होता. प्रथमतः काजीनें आपल्या धर्माची थोरवी एकसारखी तीन दिवस सांगितली. यावेळीं सर्व प्रेक्षक समुदाय एकचित्तानें ऐकत होता. हा काजी उरदूमध्यें बोलत असल्यामुळें एकंदर मुसलमान लोक वरचेवर आनंदोत्सवानें टाळ्यांचा गजर करीत होते. ही भाषा ज्यांस येत होती त्या हिंदु लोकांस हें बोलणें मात्र पसंत पडलें नाहीं. कारण आपल्या धर्माची वारंवार स्तुति करून हिंदुधर्माची नालस्ती करणें यापलीकडे त्या बोलण्यांत कांहीं नव्हतें. हल्लीं मिशनरी लोक जसे आपल्या राज्यकर्त्यां जातभाईच्या जोरावर हिंदु

धर्माची पाहिजे तशी नालस्ती व आपल्या धर्माची स्तुति करितात तसा प्रकार यावेळीं होता. चवथे दिवशीं **जगन्नाथराय** यांनीं बोलण्यास सुरवात केल्यावर प्रथमतः **बादशहास** असें सांगितलें कीं, या ठिकाणीं मी जो कांहीं वादविवाद करणार आहें तो निव्वळ धर्माकरितां आहे. मी जातीनें ब्राम्हण आहें म्हणून उगाच वितंडवाद उपस्थित करून विनाकारण दुसऱ्या धर्माची निंदा न करितां जें कांहीं खरें व सप्रमाण असेल तेंच मी या ठिकाणीं सिद्ध करून दाखवीन. या बोलण्यांत मजकडून कांहीं कमजास्त शब्द निघाल्यास हिंदुधर्माभिमानी व मुसलमान धर्माभिमानी यांनीं त्याबद्दल मजवर राग धरूं नये. खरें बोलतांना मी कोणाचीही पर्वा करणारा गृहस्थ नाहीं. मला कोणत्याही पक्षाची स्तुति करून कांहीं मिळवायाचें नाहीं. इ. इ. ' यावर **बादशहा** म्हणाला कीं, तुमची आजपर्यंतची वागणूक आम्हांस पूर्ण माहित आहे. आपण निस्पृह असून खरें तेंच बोलणारे आहां याबद्दल सर्व जग कबूल करील. तसेंच या विद्वान **काजीसही** आपल्याबद्दल चांगली माहिती असून मी जें काय आतां म्हटलें तें सर्व **यांना** कबूल आहे. "

**पंडितरायानें** हिंदुधर्माची थोरवी व तो अनादिसिद्ध असल्याबद्दल कागदोपत्रीं पुरावा हीं सर्व दाखवून मुसलमानी धर्म अनादि नव्हे अशाबद्दल **काजीचा** **१**

**पंडितरायाचा** बराच वाद झाला. पंडितराय प्रथमतः संस्कृतमध्यें बोलत होते. व **काजीही** संस्कृतमध्येंच उत्तर देत होते. पण जमलेल्या एकंदर बादशाही सरदार मंडळीस तें समजेना तेव्हां **पंडिरायास** उरदूमध्यें वाद करता येईल कीं नाहीं याबद्दल **बादशहानें** प्रश्न केला. तेव्हां पंडितरायानें सांगितलें कीं, मला उरदु चांगलें येतें आपली मर्जी असल्यास उरदूमध्यें वाद करण्यास सुरवात करितों." असें ऐकतांच **बादशहानें** उरदूमध्यें वाद करण्यास सांगितलें. **बादशहाच्या** हुकमाप्रमाणें वाद सुरू झाला. पंडितराय जेव्हां त्या भाषेंत अस्सखलीत भाषण करूं लागले तेव्हां **बादशहास** फारच आनंद झाला. राजसभेंत बसलेले मोठमोठाले मुसलमान सरदार व दुसरे विद्वान लोक व शास्त्री पंडित हे लोक **पंडितरायाचें** बोलणें ऐकून फारच आनंदित होऊन वाहवा वाहवा ह्मणूं लागले. **पंडितराय** जेव्हां युक्तिपूर्वक काजीचें बोलणें खोडून काढूं लागले तेव्हां काजी स्वस्थ बसलेला पाहून **बादशहानें** सांगितलें कीं, **पंडितरायांनीं** आपलं बोलणें सप्रमाण कागदोपत्रांनीं जसें खोडून काढलें आहे तसेंच उत्तर आपण त्यांस दिलें पाहिजे. यावर त्या काजीनें कांहीं एक भाषण केलें नाहीं. **काजीनें** काढिलेल्या सर्व शंका पंडितांनीं निवारण करून दिल्या. **पंडितरायानें** आपलाधर्म सिद्ध करून दाखविला व विरुद्ध पक्षाचें चांगलेंच खंडण झालें.

ह्मणून जमलेल्या मुसलमान मंडळीस फार राग आला. व पंडितरायास पाहून जो तो आपला तिरस्कार दाखवूं लागला. पण त्याकडे पंडितरायांनीं मुळींच लक्ष दिलें नाहीं. उलट आवेशयुक्त भाषणास पुनः सुरवात केली. तेव्हां दरबारांत बसलेल्या एकंदर मुसलमान धर्माभिमान्यांनीं आपापल्या तरवारीचे सळ सोडिले व पंडितरायाकडे क्रुद्ध दृष्टीनें निरीक्षण चालविलें. तो प्रकार पंडितरायांनीं धूर्ततेनें जाणून ते ह्मणाले कीं, ' जे कोणी मुसलमानी अवलादिपासून उत्पन्न झाले आहेत त्यांनींच तो आचरावयास योग्य आहे. इतरांनीं मात्र त्याचें आचरण करणें ' फार भयप्रद होय. पंडितरायाचें हें निस्पृह बोलणें ऐकून बादशहासही फार आनंद झाला. पंडितरायांनीं सयुक्तिक कारणें दाखवून काजीस निरुत्तर केलें तेव्हां बादशहानें वाद करण्याचें संपवून भरलेल्या दरबारांत पंडितरायास बहुमोल वस्त्रें व अलंकार देऊन त्यांचा गौरव केला. त्याचप्रमाणें जमलेल्या एकंदर ब्राह्मण समुदायास वस्त्रालंकारांनीं गौरविलें. या कामीं बादशहाच्या दरबारांतून ब्राह्मणांचा असा मान कधींच झाला नाहीं. असें पुष्कळ लोकांचें ह्मणणें आहे. या वादविवादासंबंधानें फारच उत्तम असे लेख विद्वानांनीं लिहिलेले दोन आहेत. त्यांचीं नावें १ अबुलफझल, आणि असोफ. पंडितरायांची अलौकिक विद्वत्ता पाहून बादशहास असला विद्वान आपले पदरीं असावा,

**अशी** इच्छा उत्पन्न झाली व लगेच त्यानें **पंडितरायास** दिल्ली येथें आपल्या पदरीं राहण्याद्दलचा हेतु कळविला. त्यावर **पंडितराय** ह्मणाले " मला जयपूरच्या राजाची परवानगी मिळाल्यास मी राहीन " असें उत्तर येतांच **पंडितरायास** आह्मीं ठेवून घेतलें अशाबद्दल **बादशहानें** जयपूरच्या महाराजांस कळविलें. बादशहाच्या ह्मणण्यास जयपूरच्या महाराजांनीं आपली कांहीं हरकत नाहीं. **पंडितराय** स्वतंत्र आहेत. असें लिहून कळविलें पण महाराजांसह सर्व लोकांस **पंडितराय** आपणास सोडून गेले ह्मणून फार वाईट वाटलें, पण उपाय काय?

**पंडितराय** हा सदोदित **बादशहा** सन्निध असे. **पंडिरायांवांचून** बादशहाही कधीं एकटा राहिला नाहीं. **पंडितराय** यावेळीं ऐन तारुण्याच्या भरांत होता व तो स्वरूपवानही तसाच होता. पूर्वीपासून **बादशहा** रजपूत लोकांच्या मुलींबरोबर लग्न लावीत होते. रजपूत आणि मुसलमान यांचा शरीर संबंध कसा होईल अशी कित्येकांस शंका उत्पन्न होईल त्यास एवढेंच उत्तर कीं, **बादशहाच्या** सार्वभौम सत्तेच्या जोरावर त्यानें मागणी केल्यास रजपूतराजे आपापल्या मुली त्यास देत. **जोधपूरच्या** राजाची कन्या **भानुमती,** बिकानेरची **चंद्रावती** अशा रजपूत मुली बादशहानें वरल्या होत्या. भानूमतीपासून **बादशहास**

एक मुलगी झाली होती, तिचें नांव **लवंगी** होय, या मुलीनें **जगन्नाथराय** पंडिताची कीर्ति ऐकून व स्वतः त्यास पाहून मनांत असा पक्का निश्चय केला कीं, वरीन तर पंडितरायांसच वरीन. इतर पुरुषांबरोबर कधींही लग्न करणार नाहीं. **लवंगीनें** पंडितरायास विवाहविधीपूर्वक कसकसें वरलें व लग्नाच्या संबंधानें कायकाय प्रकार झाला तो भाग पुढें आहे. **लवंगी** व **पंडितराय** यांच्या संबंधानें कागदोपत्रीं चांगला बळकट पुरावा आहे. कित्येक विद्वानांचें असें ह्मणणें आहे कीं, ही गोष्ट **अकबराचे** कारकीर्दींत घडली नसून **शहाजहान** बादशहाचे कारकीर्दींत घडली आहे." असल कागदपत्रांत नुस्तें **बादशहा** असें आहे. कोणत्याही **बादशहाच्या** कारकीर्दींत असो हा सर्व प्रकार घडलेला खरा. आह्मी **अकबर** याच **बादशहाची** कारकीर्द धरून हा लेख लिहिला आहे.

यावेळीं **लवंगी** ऐन तारुण्याच्या भरांत होती व आपल्या मनांतील हेतु तिनें आपल्या आईजवळ कळविला. प्रथम ही गोष्ट लवंगीच्या आईस पसंत पडली नाहीं. पण **लवंगीच्या** अत्याग्रहामुळें हें ह्मणणें तिला कबूल करावें लागलें. " ही गोष्ट योग्यसंधी पाहून बादशहाच्या कानावर घालतें. " असें **लवंगीस** सांगितलें तेव्हां तिच्या मनाला थोडासा धीर आला.

**बादशहास** बुद्धिबळें खेळण्याचा नाद फार असे.

या खेळांत **पंडितराय**ही चांगला प्रवीण होता. **पंडित-रायाची** समयसूचकता व निस्पृहपणा याची सर्वत्र प्रसिद्धी होती त्याचप्रमाणें विलंब न लावतां कविता करणें हाही गुण यांच्या अंगीं मोठा अलौकिक होता. **पंडितरायांनीं** आपल्या एका ग्रंथांत कवितेच्या संबंधानें इतर कविवर्गास अगदीं तुच्छ करून सोडलें आहे ती कविता अशीः—

> **कवयति पंडितराजः कवयंत्यन्येऽपि विद्वांसः ॥**
> **नृत्यति पिनाकपाणौ नृत्यंत्यन्येऽपि भूतवेतालाः ॥**

एके दिवशीं उष्ण काळचे दिवसांत बादशहा व पंडित **जगन्नाथराय** असे उभयतां बुद्धिबळें खेळत बसले होते व ही खेळण्याची जागा जनानखान्या शेजारीं होती. पंडितरायांवर सर्वांची प्रीति होती. **पंडितराय** खेळत असतां अनेक विषयांवर विनोदानें बोलून **बादशहास** वारंवार हंसवीत असत. **बादशहास** या वेळीं तृषा लागली व पडद्याचे आड आपली लाडकी मुलगी **लवंगी** बोलत आहे, असें ऐकतांच त्यानें तिला "पिण्यासाठीं चांगलें गार पाणी घेऊन ये" असा हुकूम केला. आपण राजरोष **पंडितराया**

---

* पंडितराय कविता करितात व दुसरे विद्वान कविही काव्यादि (कविता) करितात पण तें कशाप्रमाणें? तर जसें पिनाकपाणी **शिव** तांडव नृत्य करूं लागले असतां इतर भूतवेतालादि **गण** नाचूं लागतात त्याप्रमाणें होय असें समजावें.

समोर कशी जाऊं असें लवंगीस वारंवार वाटत असे. पण तिला योग्य संधी मुळींच मिळेना तेव्हां तिचा नाइलाज झालेला होता. आपल्या मनांतील हेतु आज परमेश्वर पूर्ण करणार असें लवंगीस वाटूं लागलें. उत्तमोत्तम वस्त्रालंकार परिधान करून एका लहानशा सुवर्ण कलशांत बादशहास प्राशन करण्यासाठीं उदक भरून घेतलें आणि तो कलश डोईवर घेऊन मोठ्या नखऱ्यानें ठुमकत मुरडत बादशहा व पंडितराय हे दोघे खेळत बसले होते त्या ठिकाणीं त्यांच्यासमोर येऊन उभी राहिली. हा सर्व देखावा जनानखान्यांतील सर्व स्त्रिया पडद्याआड उभ्या राहून पाहत होत्या. लवंगीचा तो त्या वेळेचा थाट व यौवनैश्वर्य पाहून बादशहा खुष होऊन लवंगीच्या गुणाची तारीफ करूं लागला. लवंगीनें आणलेलें उदक आपल्या हातीं घेऊन पिण्याचे आधीं पंडितरायास बादशहा ह्मणाला “ पंडितराय ही माझी मुलगी आली आहे, हिच्याकडे पाहा आणि हिच्यावर कविता करा. असें बादशहाचें भाषण ऐकतांच पंडितरायानें लवंगीकडे पाहून आनंदानें एक श्लोक केला! पाणी पिण्याचे अगोदर पंडितरायास श्लोक करण्यास सांगितला व पाणी पिऊन भांडें खालीं ठेवित आहे इतक्यांत पंडितरायानें श्लोक तयार केला. तेव्हां ही अलौकिक विद्वत्ता पाहून बादशहा फारच आनंदित झाला. पंडितरायांनीं श्लोक तयार केला तो—

इयं सुस्तनी मस्तकन्यस्तकुंभा
कुसुंबारुणं चारुचेलं दधाना ॥
समस्तस्य लोकस्य चेतःप्रवृत्तिं
गृहीत्वाघटेस्थाप्ययातीवभाति ॥

ही उत्तम स्तनवती तुझी कन्या, कुसुंब्यानें रंगविलेलें बहुमोल वस्त्र नेसली आहे आणि मस्तकावर कुंभ घेऊन उभी आहे. यावेळीं मला वाटतें कीं, जणूं ही सर्व लोकांच्या चित्तवृत्ति आकर्षण करून व त्या या घटांत भरून घेऊन जात आहे.

याप्रमाणें अलंकार परिपूरित व तावडतोब केलेली कविता ऐकतांच बादशहाचें चित्त प्रसन्न झालें, आणि "या वेळेस जें तुझ्या इच्छेस येईल तें माग" असें त्यानें पंडितरायास सांगितलें. तें ऐकतांच त्या निर्भीड व महारसिक पंडितानें आणखी कविता करून तींतच बादशहाच्या आज्ञेप्रमाणें मागणें मागितलें.

न याचे गजालिं न वा वाजिराजिं ॥
न वित्तेषु चित्तं मदीयं कदाचित् ॥
इयं सुस्तनी मस्तकन्यस्त कुंभा ॥
लवंगी कुरंगी मदंगीकरोतु ॥ १ ॥
यवनी नवनीत कोमलांगी ॥
शयनीये यदिलभ्यते कदाचित् ॥
अवनीतल मेव साधु मन्ये ॥
नवनी माधवनी विनोद हेतुः ॥ २ ॥

हे राजा, मी तुझ्या गजाश्व समुदायांबद्दल याचना करितों असें नाहीं. त्याचप्रमाणें द्रव्याचे ठिकाणींही

माझें चित्त नाहीं. परंतु ही मस्तकावर कुंभ धारण करणारी तुझी हरिणलोचना कन्या आनंदेंकरून माझा अंगीकार करो. १ ॥

नवनीताप्रमाणें मृदु अंग आहे जिचें अशी ही यवनी कदाचित् मला प्राप्त झाली तर स्वर्गांतील इंद्राच्या नंदनवनापेक्षां या भूलोकींच विशेष सुख आहे असें मी मानीन. ॥ २ ॥

याप्रमाणें पंडितरायाचें स्पष्ट भाषण ऐकतांच बादशहास मोठा विस्मय उत्पन्न झाला. परंतु वचन गेलेलें असल्यामुळें त्याच्या बोलण्या विरुद्ध त्याच्यानें एक शब्दही उच्चारवेना! तरी आपल्या मनाची चलबिचल झालेली उघड न दाखवितां त्यानें पंडितरायास अडविण्याजोगी युक्ति सहज योजिली, आणि सांगितलें कीं, “ आह्मीं आपणास काय पाहिजे तें मागा असें सांगितलें व त्याप्रमाणें आपण आमची मुलगी मागितली. तुह्मी मागितल्याप्रमाणें आह्मी आमची मुलगी तुह्माला देतों. पण आपण आमच्याबरोबर एका ताटांत बसून भोजन केलें पाहिजे, असें ऐकतांच पंडितराय बादशहास ह्मणाले, तुह्मी कबूल केल्या प्रमाणें मी मागितलें आहे, या कामीं भलतेच आडे-वेडे घेण्याचें कांहीं एक कारण नाहीं. माझा प्राण गेला तरी मी माझ्या धर्माला कधींही सोडणार नाहीं. तुमचें बोलणें तुह्मास खरें करण्याचें असेल तर तुह्मी करा. लवंगीवर तर माझें मन बसलें आहे.

माझी विवाहित पत्नी व एक दोन मुलें मृत्युमुखीं पडल्या मुळें मी संसारास वैतागून सर्व मायाजाल तोडून परमेश्वराच्या अवकृपेमुळें असा एकटा फिरत आहें. तरी पण ही तरुण नवयौवना पाहिल्यापासून मला हिच्याबरोबर पुनः संसार करावा असें वाटूं लागलें आहे, तर आपण बोलल्याप्रमाणें देण्याचें असल्यास लवंगीसच मला द्या. माझ्या मनांत लग्न करावें असें असल्यास आमच्या जातींत पाहिजे तितक्या मुली मला मिळतील, पण मला तें करणें नको आहे; माझ्या किंवा माझ्या पूर्वपुण्याईच्या जोरावर मी लवंगीस हिंदु बनवीन; किंवा लवंगीची पूर्वपुण्याई मजपेक्षां जास्त असल्यास तिनें मला मुसलमान करावें. लवंगीबरोबर लग्न केलें तरी मी माझ्या चालत आलेल्या धर्मा विरुद्ध कधींही वागणार नाहीं. तुमचें बोलणें सत्य करणार असाल तर लवंगी मला द्या." हें पंडितरायाचें बोलणें ऐकून सर्व लोक मोठे चकित झाले, याबद्दल कायतें तुह्मास उद्यां सांगूं असें ह्मणून त्यावेळीं बादशहा जनानखान्यांत निघून गेला. व तेथें ही घडलेली सर्व हकिकत राणीस ह्मणजे लवंगीचे आईस कळविली. तेव्हां राणी ह्मणाली कीं, " लवंगीच्या मनांतून पंडितरायाशिवाय दुसऱ्याबरोबर लग्न करण्याचें नाहीं. तर पंडितरायानें आपण होऊन जेव्हां लवंगीबद्दल मागणी केली आहे तेव्हां त्याच्या मागणीप्रमाणें

उभयतांचें लग्न करून द्यावें." अशें लवंगीचें भाषण ऐकतांच दुसरे दिवशीं पंडितरायास त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें कबूल केल्याचें बादशहानें सांगितलें, व राजवाड्यांत लग्नाची तयारी जारीनें सुरू केली, पुढें योग्य मुहूर्त पाहून लवंगीबरोबर पंडितरायाचें लग्न झालें. हा विवाहविधि हिंदुधर्माप्रमाणें झाला. बादशहानें जांवयास वरदक्षणेंत काशी नजीकचा मिर्झापूर हा गांव वंशपरंपरा बक्षिस दिला. ( यास कागदोपत्रींही पुरावा आहे. ) लग्न झाल्यावर लवंगी व पंडितराय हीं दोघें एकमेकांच्या विचारानें आनंदांत काळ घालवूं लागलीं. या लग्नसमारंभाची हकिकत ब्राह्मण समुदायांत वेगळ्या तऱ्हेनें अशी समजली कीं, पंडितरायांनीं ब्राह्मणी धर्म सोडून मुसलमानी धर्म स्वीकारला, व बादशहाची कन्या लवंगी इजबरोबर मुसलमानी रीतीप्रमाणें लग्न लाविलें" अशी बातमी समजतांच सर्व ब्रह्मसमुदायास फार वाईट वाटलें. ब्राह्मण धर्माचा मोठा अभिमानी पुरुष आपल्यांतून नाहींसा झाल्याबद्दल प्रत्येक जण फार हळहळूं लागला. पण दिल्लीस झालेला खरा प्रकार कोणासही न समजतां जो तो उडत बातम्यावर विश्वास ठेवून पाहिजे तसे तर्क लढवूं लागला होता. पूर्वापार आपल्या लोकांत ही चाल फार वाईट आहे. खरा शोध न करितां उडत बातम्यांवर विश्वास ठेवून पाहिजे तसा तर्क करित बसतात. असो; सर्व ब्राह्मण लोकांनीं एक कट करून पंडित-

रायांनीं ब्राह्मणी धर्म टाकून यवनीशीं विवाहविधि केल्याबद्दल शके १९०० मध्यें ग्रामण्य करून त्यांस बहिष्कृत केलें.

बादशहाचा पंडितरायास चांगला आश्रय असल्यामुळें पंडितरायांनीं त्या बहिष्काराकडे मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. ब्राह्मण मंडळींनीं पंडितरायास पत्रें पाठविलीं कीं, तुमचेवर ग्रामण्य करून तुह्मांस बहिष्कार घातलेला आहे. याजबद्दल तुह्मीं समक्ष हजर होऊन काय तें सांगा. अशीं पत्रें आलीं तरी त्यांकडेही पंडितरायांनीं लक्ष्य दिलें नाहीं. बादशहाची मुलगी लवंगी व पंडितराय यांचा विवाह झाला तरी पंडितरायांनीं आपली जात किंवा धर्म मुळींच न सोडतां पूर्वींप्रमाणेंच वागणूक ठेविली होती. पहाटे उठून स्नान, संध्या, जपजाप्य इत्यादिक ब्रह्मकर्म करण्याकरितां एकांतीं बसत, तेथें कोणीही परका मनुष्य जात नसे. आपल्या धर्मास बाध न येईल अशाबद्दल पंडितराय फार खबरदारी घेत होते. बादशहाची मुलगी लवंगी हीं आपल्या बापाच्या घरचा सर्व परिवार एकीकडे ठेवून पंडितरायाच्या मनाप्रमाणें सर्व हिंदु तऱ्हेची वागणूक ठेवूं लागली. या विवाहामुळें सर्व ठिकाणचे ब्राह्मण लोक पंडितरायाचा द्वेष व निंदा करूं लागले.

लवंगी व पंडितराय यांचें लग्न झाल्यापासून उभयतां आनंदानें कालक्रमणा करित असतां कित्येक

वर्षें गेलीं. दोघांचेंही तारुण्य कमी होऊन वयातीत व पोक्तपणा या संबंधाची जी वागणूक त्या वागणकीस तीं लागलीं. तरी त्यांच्यांतील प्रेमबंधन शिथिल झालें नव्हतें. त्याचप्रमाणें त्या उभयतांचा शरीरसंबंध झाल्यामुळें त्यांचा द्वेष करणारी जी मंडळी होती, त्या पिशुनवृत्तीच्या लोकांच्या मनांतील द्वेषभाव कांहीं-अंशीं तरी कमी झाला असेल असें ही कोणी समजूं नये. उभय जातींत याबद्दल फार लोक या दंपत्याचा मनांतून मोठा तिरस्कार करीत होते. सार्वभौम बादशहाची यांच्यावर पूर्ण कृपा असल्यामुळें कोणा-कडूनही या दंपत्यास कांहीं एक भीति नव्हती. मनां-तले मनांत सर्वांचे विचार रहात. लवंगीही लग्न झाल्या-पासून कट्टी हिंदुधर्माभिमानी झाली. वैदिक धर्मांत सांगि-तलेल्या स्त्री नीतीप्रमाणें वागण्याचा ती प्रयत्न करीत होती. एकंदरींत नवऱ्याच्या मनाप्रमाणें वागण्याचा तिचा मुख्य हेतु होता. पतीच्या विरुद्ध विचार जरी कोणी कोणत्याही प्रकारानें सांगण्याचा प्रयत्न केला तरी ती तो विचार मनांतसुद्धां आणीत नसे. पतीची आज्ञा पालन करणें व त्याचा संतोष होईल असें वागणें एवढें मात्र तिला चांगलें समजत असे; व त्यास अनु-रूप असें आचरण ती मोठ्या आनंदानें करीतही असे. यामुळें त्यांचा द्वेष करणारे यवन किंवा ब्राह्मण आपला प्रयत्न चालत नाहीं ह्मणून पुष्कळ चडफडत असत.

**पंडितराय** पोक्तवयांत व वार्धक्याच्या सीमेवर येईतोंपर्यंत दिल्लींतच बादशहाच्या पूर्ण कृपावलोकनामुळें **लवंगी**सह आनंदानुभव घेत कालक्रमण करीत होते. **लवंगीनें** नित्य ब्राह्मणी धर्माप्रमाणें शुचिर्भूत होऊन पूजाअर्चा करावी, व इकडे **पंडितरायांनेंही** स्नान, संध्या, देवपूजा वगैरे आन्हिक कर्म आटोपून स्वतः पाकनिष्पत्ति करून पंचमहायज्ञ आणि जगज्जनक भगवंतास नैवेद्य समर्पण करून उभयतांनीं एके पंक्तीस बसून भोजन करावें, याप्रमाणें परिपाठ होता. **पंडितराय** प्रातःस्नानकरून दोन तासपर्यंत एकांतीं बसून जपजाप्य करीत असत, त्या ठिकाणीं कोणीही येऊं नये अशी सर्वांस ताकीद दिली होती. असें असतां कांहीं लबाड लोकांनीं **पंडितरायांस** राग यावा ह्मणून एक युक्ति योजून काढिली.

**पंडितराय** ज्या ठिकाणीं एकांतांत बसून आपलें ब्रह्मकर्म करीत असत तेथें जवळच **लवंगी** व तिच्या सख्या बसल्या होत्या; त्यांनीं एक मतकरून सहज बोलतां बोलतां ज्या ठिकाणीं **पंडितराय** बसले होते त्या ठिकाणीं **लवंगीस** नेवून सहज ढकलाढकली करतांना तिला **पंडितरायांच्या** अंगावर लोटून आपण चालत्या झाल्या. इकडे **पंडितराय** ध्यानस्थ असले असतां **लवंगी** त्यांच्या अंगावर पडली त्या वेळीं तिला आपण एखाद्या अग्नीच्या तप्त गोळ्यावर पडल्याप्रमाणें होऊन कांहींच सुचेनासें झालें. जेवढा

आग पंडितरायाच्या अंगास लागला होता तेवढ्यावर दरदरून एका क्षणांत मोठमोठाले फोड उठले. ती एकसारखी गयावया तळमळूं लागली. ही सर्व हकिकत बादशहास व त्याच्या जनानखान्यांत समजतांच सर्व लोक धांवून आले, व लवंगीची त्या वेळची ती भयंकर स्थिती पाहून त्यांनीं लागलेंच औषधोपचार सुरू केले, पण गुण मुळींच आला नाहीं. इकडे इतका प्रकार झाला तरी पंडितराय ध्यानस्थ बसले होते ते कांहीं हालले नाहींत. आपल्या रोजच्या नियमाप्रमाणें ध्यानविसर्जनकरून बघतात तों बाहेर गडबड चालली आहे, सर्व हकिकत समजतांच त्यांनीं असें कृत्य करविणारांचा फार फार धिःकार केला आणि लवंगी तळमळ करीत होती तेथें गेले, व आपल्या स्नानसंध्येच्या अवशिष्ट उदकापैकीं थोडें उदक तिच्या अंगावर ओतून आगीचें पूर्ण शांतवन केलें. हा सर्व प्रकार तेथें जमलेल्या एकंदर लोकांनीं पाहून त्यांस मोठें आश्चर्य वाटलें. मोठमोठ्या हकिमांच्या हातून जी आग बंद झाली नाहीं ती पंडितरायांनीं ताह्मणांतील उदक शिंपडतांच बंद होऊन फोडही नाहींसे झाले! सर्वांस असा भास होऊं लागला कीं, हा कांहीं परमेश्वरी आवतार तर नाहींना! या वेळेपासून सर्व यवनीधर्माचे लोक पंडितरायांस फारच पूज्य मानूं लागले. पण उपयोग काय! याचवेळीं पंडितरायांनीं बादशहास सांगितलें कीं, " मी आता

पुण्यक्षेत्रें व तीर्थें पाहण्यास जाणार आहें " तर मला आज्ञा व्हावी. यावर बादशहा ह्मणाले कीं, " तुह्मी एकटेच जाणार कीं, सहकुटुंब जाणार " मी तर जाण्यास तयार आहेंच, तिला वाटलें तर ती येईल, नाहींतर येथें राहील, असें पंडितराय ह्मणाले. पंडितरायास सोडून लवंगी एक क्षणही राहत नसे. पंडितरायाचा जाण्याचा बेत लवंगीस समजतांच लवंगीनें आईबापांचा विचार घेऊन आपण आपल्या पतीबरोबर प्रवासास जाणार ह्मणून अगोदरच सर्व तयारी केली. व पंडितराय निघण्याची वाट पहात राहिली.

पंडितराय व लवंगी यांनीं दिल्ली सोडून बाहेर पडतांच शहरचे सर्व लोक एकसारखे हळहळूं लागले. पंडितराय व लवंगी यांनीं अयोध्या, मथुरा, हरिद्वार, काशी, प्रयाग, बद्रीकेदार, गंगोत्री, वगैरे पुण्यक्षेत्रें व तीर्थें पाहून झाल्यावर बादशहानें बक्षीस दिलेला गांव मिर्झापूर येथें येऊन कांहीं दिवस विश्रांती घेतली. व आतां आपण कायम काशीस राहवें असें मनांत आणून मिर्झापूर हा गांव एका देवास इनाम करून दिला. या इनामाच्या संबंधानें खात्रीलायख आधार मिळत नाहीं.

पंडितरायांनीं प्रायःश्चित घेऊन आपल्या जातींत यावें. अशाबद्दल लोकांनीं फारच आग्रह केल्यावरून पंडितरायांनीं प्रायःश्चित घेण्याचें कबूल केलें. या

वेळीं पंडितराय मिर्झापुरास होते. पुढें ते काशीस आल्याबरोबर तेथील ब्राह्मणांनीं प्रायःश्चित्ताची गोष्ट काढिली व त्या वेळेसही पूर्वींप्रमाणें त्यांना पंडितरायांकडून होकार मिळाला.

" बहिष्कारास मूळ कारण जो यवनीपरिग्रह तो प्रायःश्चित्तानंतर उपयोगाचा नाहीं. यासाठीं तुह्मी यवनीचा त्याग करा ह्मणजे तुह्मास एकल्यास प्रायःश्चित देऊन आह्मी पावन करितों " याप्रमाणें ब्राह्मणांचें ह्मणणें ऐकून विवाहित व सर्वस्वी मताप्रमाणें वागणारी जी स्त्री लवंगी तिचा त्याग करण्यास हे ब्राह्मण सांगतात तेव्हां हे महामूर्ख तर नाहींत ना? माझा प्राण गेला तरी बेहत्तर आहे, पण एकवार ज्या स्त्रीबरोबर मी विवाहविधीकरून आपली ह्मटली तिला कदापि सोडून देणार नाहीं. असा विचार करून सर्व ब्राह्मणसमुदायास पंडितरायांनीं असें कळविलें कीं, " अहो ब्राह्मणश्रेष्ठहो, माझी स्त्री जरी यवनराजाची कन्या आहे तरी जेव्हां मी ब्राह्मणानें तिचें पाणीग्रहण केलें आहे तेव्हांपासूनच ती ब्राह्मणी झाली हें निर्विवाद आहे, दुसरें जरी ती यवनरायाची आवडती व लाडकी मुलगी होती तरी मला वरल्यादिवसापासून आजपर्यंत ती कधींही हिंदुधर्माविरुद्ध वागली नाहीं. हा प्रकार जर मी पूर्वींपासून पाहत आहें तर आतां या वृद्धपणीं तिचा त्याग करून तिला अनिवार्य दुःखांत लोटावें आणि

ग्यां एकट्यानें मात्र प्रायःचित् घेऊन तुमच्या मंडळींत येऊन राहावें, हें माझ्या मनाला आणि अनादिसिद्ध न्यायाला तरी योग्य होईल काय? यासाठीं तुह्मा सर्वांस मी अशी विज्ञापना करितों कीं, माझ्याबरोबर माझ्या स्त्रीसही कृपा करून व तुमचीं शास्त्रें पाहून शुद्ध करून घ्याल तर मला प्रायःश्चित घेऊन तुमच्यांत येण्याची सोय आहे. नाहींपेक्षां प्रायःश्चित् घेऊन तुमच्यांत येण्याची मला जरूर नाहीं. अनादिवर्णव्यवस्थेविषयीं जर अभिमान सोडून विचार केला तर भगवद्वाक्य असें आहे. भगवान् **श्रीकृष्ण** आपला प्रीय छात्र जो अर्जुन त्यास वर्णव्यवस्थेच्या संबंधानें उपदेश करीत असतां " चातुर्वर्ण्यं मयासृष्टंगुणकर्म विभागशः " असें गीतेंत स्पष्ट सांगतो. तर माझ्या स्त्रीच्या गुणाकडे व कर्माकडे जो प्रांजलदृष्टीनें अवलोकन करील, तो ही ब्राह्मणी आहे, हें संतोषानें कबूल करील; तर मजबरोबर माझ्या अर्धांगीलाही शुद्ध करून घ्या, असें मी तुह्मांस सांगतों.

**पंडितराय** प्रायःश्चित् घेऊन पुनः ब्राह्मणधर्मांत येणार याबद्दल सर्वांस आनंद झाला होता. पण ऐन तयारीचे वेळीं यवनींसह मला शुद्ध करून घ्या असें जेव्हां ह्मणूं लागला तेव्हां कधींही न होणारी गोष्ट व्हावी कशी? अशी सर्वांस मोठी पंचाईत पडून गेली. लवंगीच्या शुद्धाचरणाबद्दल काशींतील एकंदर मोठमोठ्या विद्वानांची जरी पक्की खात्री झालेली होती तरी

यवनीला ब्राह्मणधर्मांत कशी घ्यावी, याजबद्दल त्यांस मोठी चिंता पडली. अखेर सर्व शास्त्री पंडितांनीं विचार करून जगन्नाथरायास असें कळविलें कीं, " तुमच्या यवनी स्त्रीस कोणत्याही शास्त्राधारें पावन करून ब्राह्मणांत घेतां येत नाहीं; यासाठीं तुह्मीही विशेष आग्रहांत न पडतां प्रायःश्चित् घेऊन शुद्ध व्हावें हें चांगलें. आपण वार्धक्य प्राप्त होईपर्यंत तिच्या सहवासांत राहून संसार विचार केलात तितका पुष्कळ झाला. आतां तो नाद सोडा " याप्रमाणें ब्राम्हण मंडळीनें लवंगीस धर्मांत घेण्याचें नाकबूल करितांच पंडितरायानें एकट्यानें प्रायःश्चित् घेण्याचें नाकारिलें " मला प्रायःश्चित् देऊन ब्राम्हणमंडळींत घ्या असें पंडिरायानें ब्राम्हणमंडळीस कधींही सांगितलें नव्हतें. प्रत्येक ठिकाणच्या ब्राह्मणमंडळीकडूनच प्रायःश्चित् घेण्याबद्दल पंडितरायास आग्रह होत होता. एकेवेळीं काशींतील विद्वान आणि कर्मनिष्ठ ब्राह्मण आप्पयादीक्षित हे स्वतः पंडितरायास प्रायःश्चित घेऊन ब्राह्मणधर्मांत यावें अशाबद्दल आग्रहपूर्वक सांगत होते त्यावर पंडितराय ह्मणाले मी एकटाच प्रायःश्चित घेऊन कधींही शुद्ध होणार नाहीं. खरोखर विचारपूर्वक पाहिलें तर आह्मी उभयतां आपल्या मानसिक वृत्तीनें शुद्धच आहों. आणि अनादिवेदप्रतिपाद्य धर्माप्रमाणें वागत आहों. केवळ लोकाचारासाठीं आह्मांस प्रायःश्चित घ्यावयाचें आहे तर मी माझ्या अर्धांगीला सोडून

कधींही प्रायःश्चित घेणार नाहीं. त्रैलोक्यांतील एकंदर महापातकी जनांस शुद्ध करून त्यांचा उद्धार करणारी भगवती–भागीरथी आम्हां उभयतांस पाहिजे तेव्हां शुद्ध करून घेण्यास व आमचा उद्धार करण्यास तयार आहे. तुम्हीं मनुष्यांनीं जरी नाहीं म्हटलें तरी ती जगज्जननी माझी व माझ्या अर्धांगीची कधींही उपेक्षा करणार नाहीं. याप्रमाणें पंडितरायांचें स्पष्ट भाषण ऐकून आपय्यादिक्षित स्वस्थ बसले.

नंतर कित्येक दिवसांनीं पुनः एकेवेळीं आपय्यादिक्षित हे पंडितरायांची आणखी एक वेळ भेट घ्यावी व त्यांचा विचार पूर्वी सारखाच आहे किंवा कांहीं बदलला आहे तें पाहण्याच्या हेतूनें व मोठ्या कळकळीनें पंडितराय यवनीसह ज्या राजवाड्यांत राहत होते तेथें बरोबर आणखी कांहीं विद्वान घेऊन गेले. आणि पाहूं लागले तों पंडितराय दिवसाढवळ्या यवनीसह पलंगावर पडलेला आहे. आणि त्यांतही विशेष प्रकार असा कीं, दिवस असतां पंडितराय निर्धास्त निद्रा घेत आहेत. असें पाहतांच आपय्यादिक्षितांनीं पंडितरायास जरी ओळखलें होतें तरी न ओळखल्या सारखें करून—

किं निःशंकं शेषे शेषे वयसि त्वमागते मृत्यौः ॥

" तूं आपल्या अवशिष्ट आयुष्यांत मृत्युसमय सन्निध आला असतां निःशंक होत्साता निजतोस हें काय ? "

असें ऐकतांच पंडितराय जागृत होऊन लगबगीनें पलंगावरून खालीं उतरले. तेव्हां ीस पाहून व ओळखल्यासारखें करून दिक्षित ह्मणतात. " महापंडित जगन्नाथराय तो तूंच आहेस काय ? " अथवा–

**अथवा सुखं शयीथाः निकटे जार्गात जान्हवी भवतः ।।**

" पंडितराया तूं आनंदानें निजून राहा. कारण तुझ्यासाठीं ( तुझा उद्धार करण्यास्तव ) ही भागीरथी सर्वदा जागृत आहे. "

याप्रमाणें दिक्षितांचें खोंचदार भाषण ऐकतांच पंडितराय त्यांस ह्मणाले " अहो दिक्षित तुह्मी आपल्या विद्वत्तेच्या जोरावर उगीच भलभलतें बोलूं नका. माझ्यासाठीं भगवती भागीरथी जागृत आहे. व ती माझा उद्धार करील, अशी मा ी पक्की खात्री आहे. आपण अभिमान धरून माझ्या अर्धांगीसह मला शुद्ध करून घेतलें नाहीं, तरी त्याबद्दल मला कांहींच वाईट वाटत नाहीं. " असें अभिमानयुक्त पंडितरायांचें भ षण ऐकतांच दिक्षित ह्मणाले " जगन्नाथा ज्या प्रमाणें तुला कांहींएक काळजी करण्याचें कारण नाहीं त्याचप्रमाणें ती भगवती–भागीरथी आह्मां ब्राह्मणांच्या मताविरुद्ध तुला व तुझ्या त्या यवनोदरोत्पन्न स्त्रीला पावन करून कशी, केव्हां व कधीं घेणार आहे ? हें हीं आह्मां सर्व ब्रह्मवृंदांस अवश्यमेव पाहणें आहे. तर अतःपर तूं आह्मां ब्राह्मणांजवळ यवनीसह शुद्ध करून

घेण्याबद्दल खटपट न करितां त्या जगपावनीचीच प्रार्थना कर आणि ती केव्हां तुमचा उद्धार करणार आहे तें कृपा करून आह्मांस अगोदर सांग. ह्मणजे तुह्मांस शुद्ध करण्याचें पाहून आह्मां सर्वांचे नेत्र तरी पवित्र होतील"

याप्रमाणें बोलण्यावरून बोलणें वाढत चाललें असतां दोघेही ईर्षेस पडल्याप्रमाणें झाले. त्यांतही त्या बाबतींत **पंडितरायांस** जास्त ईर्षा उत्पन्न झाली आणि ते **आपय्या दिक्षितास** ह्मणाले "**दिक्षित, भगवती** भागीरथी मला शुद्ध करून घेईल कीं नाहीं याबद्दल तुमच्या मनांत शंका आहे तर याच वेळेस मजबरोबर चला आणि पाहा, ती माझ्या प्रिय पत्नीसह मला कशी पावन करून घेते ती" असें बोलून **पंडितरायानें लवंगीस** हातीं धरून, राजवाड्यांतील एकंदर लोकांस **दिल्लीस** जाण्यास सांगितलें व आपण **लवंगीसह** अक्षय **भागीरथी** वास करण्यासाठीं **भागीरथी**चे उदरांत प्रवेश केला असें बादशहादिकांस कळविण्यास सांगितलें. हा सर्व प्रकार पाहून एकंदर मंडळी चकीत झाली. असो; याप्रमाणें सांगून व त्यांस दिल्लीस जाण्याचा निरोप देऊन लवंगीसह पंडित आणि त्यांच्याबरोबर गांवांतील हजारों मनुष्यें हा अलौकिक प्रकार पाहण्यासाठीं भागीरथी तटाकीं आलीं. "**पंडितराय** भागीरथीकडून आपली शुद्धी करून घेणार आहेत" ही बातमी सर्व गांवभर हां हां ह्मणतां पसरली व गंगे

च्या कांठीं इतकी गर्दी झाली कीं, मनुष्यास उभें राहण्यास सुद्धां जागा मिळेना.

**लवंगीसह पंडितराय** व **आपय्या**दीक्षित वगैरे लोक भागीरथीच्या घांटावर येऊन उभे राहिले. ते ज्या ठिकाणीं उभे राहिले होते त्या ठिकाणापासून गंगाप्रवाह बावन्न पायऱ्यांच्या खालीं होता. **पंडितराय** आपल्या पत्नीसह बावन्न पायऱ्यांच्यावर जेथें उभे राहिले होते, तेथून **गंगेचा** निर्मळ प्रवाह मात्र स्पष्ट दिसत होता. नदीचें पात्र दृष्टीस पडतांच सपत्निक **पंडितरायानें भागीरथीस** साष्टांग नमस्कार घातला. आणि आपल्या प्रौढ, मनोरम व रसिक अशा कोमल वाणीनें **विश्वेश्वर** घांटावर बसून तिची ( भागीरथीची ) स्तुती करण्यास आरंभ केला. प्रथमतः **पंडितराय** भागीरथीस नमस्कार करून असें ह्मणाले कीं, मी पूर्वीं गंधर्व होतों व ही **लवंगी** अप्सरा होती. तेव्हां आह्मां दोघांकडून कांहीं अपराध घडल्यामुळें उभयतांस **शंकरानें** असा शाप दिला कीं, " तुह्मी उभयतां मृत्युलोकीं जन्म घेऊन कांहीं दिवस वास करा. ही अप्सरा यवन बादशहाचे पोटीं उत्पन्न होईल व तूं ब्राह्मण कुळामध्यें उत्पन्न होऊन बृहस्पतीसारखें आपलें नांव गाजवशील. यवनीबरोबर तूं विवाह करून राहिल्यावर तुजवर महापंडित रागावून तुझा छल करितील व तुझा शाप पूर्ण झाल्यावर तुला प्रत्यक्ष **भागीरथी**

यवनीसह आपल्या उदरांत घेईल" असा उःशाप आहे. तर मातोश्री मला पावन कर. असें ह्मणून पंडितरायानें एकाग्र चित्तानें व अनन्यभावानें गंगास्तवनास आरंभ करि- तांच ती कोमल वर्ण रचना व सहेतुक स्तवन ऐकतांच भगवती भागीरथीस अतोनात आनंद झाला. आणि प्रत्येक श्लोकास एकेक लाट येऊन एकेक पायरी पाणी वर चढूं लागलें. त्या वेळेस पंडित रायांनीं प्रथमारंभीं जो श्लोक म्हटला तो येणेंप्रमाणें—

## शिखरिणीवृत्त.

समृद्धं सौभाग्यं सकलवसुधायाः किमपि तन् ॥
महैश्वर्यं लीलाजनितजगतः खंडपरशोः ॥
श्रुतीनां सर्वस्वंसुकृतमथमूर्तं सुमनसां ॥
सुधासौंदर्यं ते सलिलमाशिवं नः शमयतु ॥ १ ॥

## वामनी टीका.

अशेषां भूमीचें विपुलतर सौभाग्य मिरवी ॥
जगातें लीलेनें करि शिव तया भूति पदवी ॥
श्रुतींची तत्त्वोक्ति सुकृत विबुधांचेंचि अथवा ॥
सुधा बंधू तूझें सलिल असुच्या नासुं आशिवा ॥ १ ॥

"हे गंगे, या सकल पृथ्वीला शोभा देणारें व जें लीलेनें चतुर्दश भुवनें उत्पन्न करणाऱ्या महेश्वराचें महदैश्वर्यच, जें वेदांचें केवळ सारच, इंद्रादि देवांचें मूर्तिमंत पुण्यच व अमृता सारखें गोड असें तुझें उदक आमच्या पापाचा नाश करो."

व शेवटीं बावन्नावा जो श्लोक ह्मटला तो असा—

विभूषितानंगरिपूत्तमांगा ।
सद्यःकृतानेकजनार्तिभंगा ॥
मनोहरोत्तुंगचलत्तरंगा ।
गंगा ममांगा न्यमली करोतु ॥ ५२ ॥

## वामनीटीका

करी अलंकार शिवोत्तमांगीं ।
स्नानें जगाचे अघ शैल भंगी ॥
अपूर्व शोभा जिचिया तरंगा ।
गंगा अशी पूत करूं ममांगा ॥ ५२ ॥

" आपल्या सतत वस्तीनें महादेवाचें मस्तक निरंतर शोभविलें आहे व जी दर्शन देतांच तात्काल सर्वजनांचीं दुःखें घालविते आणि जिचे तरंग सुंदर, उंच व चंचल आहेत अशी गंगा माझे देहास पवित्र करो."

जगन्नाथरायांच्या गंगालहरीपैकीं १।२ ष श्लोक वर दाखविले आहेत. ज्यांत सर्व श्लोक आहेत असें म्हणजे ५२ मूळ श्लोक आणि त्यांवर बावन्न वामन पंडितांचे श्लोक व शेवटीं सरळ मराठी अर्थ आहे असें पुस्तक आम्हीं छापविलें असून तें यंदा जीं लोकमित्र मा. पु. घेणारांस तीनरुपयांचीं पुस्तकें बक्षीस आहेत त्यांतच मिळणार आहे. त्याकरितां जास्त श्लोक येथें देत नाहीं. असो.

सर्वां समक्ष भागीरथीनें यवनीसह आपला उद्धार करावा ह्मणून जगन्नाथराय पंडितानें जें गंगेचें स्तवन केलें त्यास सांप्रत गंगालहरी असें ह्मणतात. पंडित-

राय लवंगीसह घाटावर बावन्न पायऱ्यांच्यावर उभे होते. म्हणून बरोबर बावन्न श्लोकांनीं त्यांस गंगेचें स्तवन करावें लागलें. प्रत्येक श्लोकास लाट येऊन एकेक पायरी पाणी चढतां चढतां स्त्रीसह पंडितराय जेथें उभे राहिले होते, तेथपर्यंत बावन्न पायऱ्या तो गंगेचा अमोघ प्रवाह येऊन स्थिर झाला आणि प्रत्यक्ष जान्हवीनें पंडितरायांस दर्शन दिलें.

अहाहा, त्या वेळच्या त्या मनोहर तेजाचें किती म्हणून वर्णन करावें. पंडितराय डोळेभर त्या मूर्तीचें निरीक्षण करून म्हणतात "हे जगन्मोहिनी माते गंगे, शरदतूंतल्या चंद्रासारखी शुभ्रवर्ण अशा मस्तकावर धारण केलेल्या चंद्रकलेनें अतिशुभ्र, चारही हस्तांत अमृत कलश, कमल, वर व अभय हीं धारण केलीं आहेत, अमृताच्या धारेसारखीं जिचीं स्वच्छ वस्त्रें आणि भूषणें आहेत. व जी शुभ्र मकरावर बसली आहे अशा तुझ्या मूर्तीचें जे ध्यान करितात त्यांचा तुजकडून कधींही अनादर होत नाहीं मग मी जर प्रत्यक्ष तुझें दर्शन घेत आहें तर माझा तूं धिःकार करणार काय? आई, मला प्रेमालिंगन दे. असें म्हणतांच भागीरथीनें आपला एक हात पुढें केला तो पाहतांच पंडितरायांनें अत्यंत नम्रपणानें म्हटलें " मातोश्री मला एकट्याला हे ब्राम्हणलोकसुद्धां शुद्ध करून घेण्यास राजी आहेत. पण माझ्याबरोबर माझ्या अर्धांगीचाही

उद्धार झाला पाहिजे, असें मनांत धरून मी आपल्या या स्वज्ञातीबांधवांस धिःकारिलें आणि तुझ्या चरणीं भाव ठेवून मुद्दाम तुला इतकें वर चढून येण्याचे श्रम करावयास लाविले, तर कृपा कर आणि आमचा दोघां-चाही उद्धार कर, म्हणजे आम्ही मुक्त होऊं व जगांत जन्म घेऊन आजपर्यंत संसार केल्याचें सार्थक्य झालें असें समजूं " या प्रमाणें **पंडितरायानें गंगेची** प्रार्थना कारितांच त्या त्रैलोक्यपावनी **गंगेनें** आपले दोन्ही हात पुढें केले आणि " वत्सा भिऊं नकोस ये " असें सर्व ऐकतील इतक्या मोठ्यानें अभय वचन दिलें. हा विलक्षण पण लोकोत्तर चम-त्कार होत असतां **दीक्षित** व काशींतील ब्राह्मणलोक तटस्थ होऊन एकमेकांकडे पहात उभे राहिले होते. गंगेनें दोन्ही हात पुढें करतांच **जगन्नाथराय लवंगीचा** हात-धरून त्या गंगेच्या दोन्ही हातांच्या मध्यभागीं जाऊन उभे राहिले त्या बरोबर माता मुलास ज्याप्रमाणें प्रेमानें हृदयासीं धरिते, त्याप्रमाणें **गंगेनें** त्या दोघांसही एक क्षणांत आप-ल्यांत मिळवून घेतलें. अर्थात तीं दोघेंही लोकांच्या नेत्रांस दिसेनातशीं झालीं. आणि गंगेचा प्रवाह जो क्रमशः वाढून वर आला होता तोही तेव्हांच उतरून जागच्याजागीं गेला. हा चमत्कारपाहून **आपय्या-दीक्षित**, व त्यांच्याबरोबर जमलेले, दुसरे विद्वान लो-यांस **पंडितराय** गेल्याचें महत् दुःख झालें. हा लो-

खरी परमेश्वरी अवतार होता. यास आपण उगीच त्रास दिला असें सर्वांस वाटून त्यांस फार पश्चाताप झाला. पंडितरायाची अलोट विद्वत्ता आठवून आपय्या-दीक्षितादि लोक फारफार दुःख करूं लागले. पण आतां त्याचें काय? गोष्ट होऊन गेली ही घडलेली सर्व बातमी दिल्लीदरबारांत कळली तेव्हां बादशाहानें व त्याच्या जनानखान्यांतील स्त्रियांनीं पुष्कळ शोक केला. लवंगी व पंडितराय यांच्या नांवानें, बादशहानें लाखोंरुपयांचा दानधर्म केला. पंडितराय परमेश्वरी अवतार होता व त्यानें आपल्यास दर्शन दिलें हेंच आपलें महत्पुण्य असें मानून बादशहादि सर्वजण दुःखाचें शांतवन करूं लागले. बादशाही नवरत्नांचें एकेठिकाणीं वर्णन केलें आहे त्यांत आमचे चरित्र नायक जगन्नाथ-राय पंडित ह्यांस श्रेष्टत्व दिलें आहे. असो.

याप्रमाणें पंडितरायांच्या संबंधानें शोध करितां करितां जी कागदोपत्रीं माहिती आह्मास मिळाली ती येथें दिली आहे. एकंदरींत जगन्नाथराय पंडित हा महासिद्ध पुरुष होता व त्यानें वरलेली लवंगी ही महा पतिव्रता स्त्री होती यांत संशय नाहीं. इतकें सांगून आतां वाचकांची रजा घेतों.



श्री.

# अथ गंगालहरी प्रारंभ.

## श्लोक.

समृद्धं सौभाग्यं सकलवसुधायाः किमपितन् ॥
महैश्वर्यं लीला जनितजगतःखंडपरशोः ॥
श्रुतीनां सर्वस्वं सुकृतमथमूर्तं सुमनसां ॥
सुधासौंदर्यं ते सलिलमशिवं नःशमयतु ॥ १ ॥

## मंगलम्.

गुरुंप्रणम्य पीयूष लहर्याःप्राकृतैःपदैः ॥
भावार्थ दीपिकेयंहितन्यतेबुधतुष्टये ॥ १ ॥

## टी० वा०

आशेषां भूतींचें विपुलतर सौभाग्य भिरवी ॥
जगातें लीलेनें करि शिव तया भूतिपदवी ॥
श्रुतीचीं तत्वोक्ति सुकृतविबुधांकीचि अथवा ॥
सुधा बंधू तूझें सलिल आमुच्या नाशु अशिवा ॥१॥

अर्थ—हे गंगे, या सकळ पृथ्वीला शोभा देणारें व जें लीलेनें चतुर्दश भुवनें उत्पन्न करणाऱ्या महेश्वराचें महदैश्वर्यच, जें वेदांचें केवळ सारच, इंद्रादि देवांचें मूर्तिमंत पुण्यच व अमृतासारखें गोड अमरत्व देणारें असें तुझें उदक आमच्या पापाचा नाश करो.

## श्लोक.

दारिद्राणां दैन्यं दुरितमथ दुर्वासनहृदां ॥
द्रुतं दूरीकुर्वन्सकृदपिगतो दृष्टिसरणिम् ॥
अपिद्रागाविद्याद्रुमदलन दीक्षा गुरु रिह ॥
प्रवाहस्ते वारां श्रियमयपारां दिशतु नः ॥२॥

## टी० वा०

दरिद्रांच्या दैन्या मलिनहृदयांच्या अघबला ॥
हरी एक्यावारीं त्वरित पडतां नेत्रकमला ॥
अविद्यावृक्षाचा हनन करि दीक्षा गुरुच हा ॥
तुझा देवोतोय प्रवह आम्हुतें भूतिनिवहा ॥ २ ॥

अर्थ—हे गंगे, जो दरिद्री पुरुषांच्या एकवार नजरेस पडला असतां तत्काळ त्यांच्या दारिद्राचा नाश करितो व जो दर्शनमात्रेंच दुष्टचित्त पुरुषांचें पातक हरण करितो व जो या मायामय अविद्यारूप संसार वृक्षाचें छेदन करावयास उपदेश करणारा गुरूच असा हा तुझा जलप्रवाह आह्मांला अपार संपत्ति देवो.

## श्लोक.

उदंचन्मार्तंडस्फुटकपटहेरंबजननी ॥
कटाक्षव्याक्षेपक्षणजनितसंक्षोभनिवहाः ॥
भवंतु त्वंगंतो हरशिरसि गंगातनुभुवः ॥
तरंगाःप्रोतुंगादुरितभयभंगाय भवतां ॥ ३ ॥

## टी० वा०

उदेला मात्सर्यें गजवदनमातास्वकपटें ॥

कटाक्षानें पाहे तरि मनि महाक्रोध झगटे ॥
अशा आविर्भावें पृथुलहरी तूज उठती ॥
शिरीं शंभूच्या त्या जनकलुषंमूत निगुती ॥ ३ ॥

अर्थ–नुकताच उदय पावलेल्या सूर्याप्रमाणें सापत्न-भावामुळें आरक्त असे पार्वतीचे नेत्रकटाक्ष त्याच्या भयानेच जणु निरंतर कांपणारे असे शंकराच्या मस्तकीं नृत्य करीत आहेत, असे हे तुझे तरंग, भक्त जनांच्या पापाचा व भयाचा नाश करोत.

## श्लोक.

तवालंबादंब स्फुरदलघुगर्वेण सहसा ॥
मया सर्वेवज्ञासरणिमथनीताः सुरगणाः ॥
इदानीमौदास्यं भजसियदि भागीरथि तदा ॥
निराधारोहारोदिमि कथय कपामिहपुरः ॥ ४ ॥

टी०वा०

बळें आलंबाच्या तव जननि गर्वोद्धतमनें ॥
अवज्ञेचे पंथीं सकळ सुर मी पावविदिनें ॥
अतां गंगे माझे विषयिं जरि चित्तीं उगवसी ॥
रडुं तेव्हां कोणा जवळिमज सांगे गति कशी ॥ ४ ॥

अर्थ–हे माते भागिरथि मी आपल्या उद्धाराविषयीं सर्वथैव तुझा आश्रय केला आणि त्या आश्रयाच्या बला-नें गर्वित होऊन सर्व देवांची अवज्ञा केली. आतां तूं जर माझा उद्धार करण्याविषयीं उदासीन होशील तर मी हाय हाय करीत कोणाजवळ जाऊन रहावें बरें ? हें तूं सांग.

## श्लोक.

स्मृतिंयाता पुंसामकृतसुकृतानामपिचया ॥
हरत्यंतस्तंद्रांतिमिरमिवचंद्रांशुसरणिः ॥
इयंसातेमूर्तिःसकलसुरसंसेव्यसलिला ॥
ममांतःसंतापंत्रिविधमपिपापंचहरताम् ॥ ५ ॥

### टी० वा०

नकेलें सत्कर्माचरण जरित्यांनीं हि स्मरतां ॥
तयांच्या चाड्यातें हरसि तिमिरा जेंवि सविता ॥
अशी तूझी ते हे तनु सुरगणां सेव्य सकलां ॥
त्रिधा माझ्यापापा आणिक हरु संताप सगळा ॥५॥

अर्थ—ज्यांनीं सत्कर्म आचरण केलें नाहीं अशा पुरुषांनीं जिचें स्मरण केलें असतां ती तत्काळ त्यांच्या अंतःकरणांतील अज्ञान जसे चंद्र किरण अंधकाराचा नाश करितात तद्वत नाहींसें करिते, जी देवादिकांनां पूज्य अशी तुझी प्रवाहरूप मूर्ति माझें कायिक वाचिक व मानसिक पातक व त्या पातकांपासून झालेला त्रिविध संताप ( आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक ) यांचा नाश करो.

## श्लोक.

अपि प्राज्यं राज्यं तृणमिव परित्याज्य सहसा ॥
विलोलद्वानीरं तव जननि तीरं श्रितवताम् ॥
सुधातः स्वादीयः सलिलभरमातृप्ति पिबतां ॥
जनानामानंदः परिहसति निर्वाण पदवीम् ॥ ६ ॥

टी० वा०

त्यजूनी साम्राज्या तृण सदृश जे कां शुभमति ॥
तुझ्या तीरीं वेता वलिललितनीरांत वसती ॥
सुधेहूनि स्वादू सलिल पिउनी तृप्त जन जे ।
तयांच्या आनंदं गुण रहित मोक्षासि हासिजे ॥ ६ ॥

अर्थ–मोठ मोठे सार्वभौम राजे सर्व पृथ्वीचें राज्यही तृणवत् तुच्छ मानून व त्याचा त्याग करून ज्यावर वेत वृक्षांची दाट छाया पडली आहे व जे वाऱ्यानें हालतात अशा तुझ्या तीराचा आश्रय करितात व अमृतापेक्षां गोड असें तुझें उदक तृप्ति होईपर्यंत पितात व त्यापासून त्यानां जो कांहीं आनंद होतो त्यापुढें ते मोक्षसुखा लाही कमी मानतात.

श्लोक.

प्रभाते स्नातीनां नृपतिरमणीनां कुच तटी ॥
गतो यावन्मात मिलति तव तोयै मृगमदः ॥
मृगास्तावद्वैमा निक शत सहस्रैः परिवृता ॥
विशंति स्वच्छंदं विमलवपुषो नंदनवनम् ॥ ७ ॥

टी० वा०

नृपस्त्रीवक्षोजीं मृगमद विभूषार्थ असतां ॥
प्रभातस्नानेंतो जननि तव तोयांत मिळतां ॥
क्षणें देवश्रेणीसह मृग तया नंदनवनीं ॥
स्वइच्छेनें जाती अति विमळ देहासी धरुनी ॥ ७ ॥

अर्थ–प्रभात काळीं ज्या राजस्त्रिया तुझ्या उदकांत येऊन स्नान करितात व ज्यानीं रात्रीं विलासार्थ स्तनप्र-

देशीं लावलेली कस्तुरी तुझ्या उदकांत मिळतांच तत्काळ ( ज्यापासून ती कस्तुरी उत्पन्न होते असे ) ते हरिण देखील निर्मल देहधारी व निष्पाप होऊन हजारों विमानस्थ देवांबरोबर विमानांत असून इंद्राच्या नंदनवनांत स्वच्छंदपणें क्रीडा करण्यास जातात. तेव्हां प्रत्यक्ष तुझें सेवन करणारास मोक्ष प्राप्त होईल, यांत आश्चर्य तें काय?

## श्लोक.

**स्मृतःसद्यःस्वांतं विरचयति शांतं सकृदपि ॥**
**प्रगीत यत्पापं झटिति भवतापं च हरति ॥**
**इदं तद्गंगेति श्रवणरमणीयं खलुपदं ॥**
**ममप्राणप्रांते वदन कमलांत विलसतु ॥ ८ ॥**

टी० वा०

**मना आणी शांती स्मरण करितां तें क्षणभरी ॥**
**गिती गातां पापा त्वरित भवतापाप्रतिहरी ॥**
**अहो तें हें कर्णा मधुरतर गंगापद असें ॥**
**असो प्राणत्यागी मुखकमळीं माझ्या समरसें ।८।**

अर्थ—ज्याचें एकदांच स्मरण केलें तर मनाला तत्काल शांतता आणितें व जें एकदां भक्तीयुक्त अंतःकरणानें उच्चारिलें असतां, पातकासह संसारदुःखाचा नाश करितें. व कर्णास मधुर लागणारें असें हें गंगापद मरणसमयीं माझ्या तोंडांत ( विलसतु ) पडो.

## श्लोक.

**यदंतःखेलंतो बहुलतरसंतोष भरिता ॥**
**न काका नाकाधीश्वरनगरसाकांक्षमनसः ॥**

निवासाल्लोकानां जनिमरणशोकापहरणं ॥
तदेतत्ते तीरं श्रमशमनधीरं भवतु नः ॥ ९ ॥

टी० वा०

जळामध्यें क्रीडा करुनि बहु तोषेंचि असती ॥
तया काकांचे ही सुरपतिपुरीं काम नसती ॥
निवासें लोकांचें हरि जनिमृती दुःख मनिचें ॥
असें तूझें तीर श्रम परिहरूं सर्व अमुचे ॥ ९ ॥

अर्थ—ज्यावर क्रीडा करणारे कावळे देखील इतके आनंदित होतात कीं, त्यांना इंद्राचे नंदन वनांत सुद्धां क्रीडा करण्याची इच्छा होत नाहीं, व जें आश्रयें करूनच लोकांचे जन्म मरणाचा व दुःखांचा नाश करणारें असें हें तुझें तीर आमच्या श्रमाचा व दुःखांचा समूळ परिहार करो.

श्लोक.

न यत्साक्षाद्वेदैरपि गलितभेदैरवसितं ॥
न यस्मिन् जीवानां प्रसरति मनोवागवसरः ॥
निराकारं नित्यं निजमहिमनिर्वासिततमो ॥
विशुद्धं यत्तत्वं तवजननि तत्त्वं न विषयः ॥ १० ॥

टी० वा०

दिसेना जें वेदां गतनिखिलभेदांसि नयनीं ॥
न जेथें जीवाची प्रसरती मनो वाक्य सरणी ॥
अकारा नाशातें त्यजुनि निजरूपीं च वसणें ॥
जया तत्वांतें तूं विषय ह्मणती मूढ मतिने । १० ।

अर्थ—हे जननी, अद्वैत प्रतिपादक वेदांनाही, प्रत्यक्ष

ज्याचें वर्णन करितां येत नाहीं, व जेथें व्यासादिकांच्या मनाची आणि वाणीची ही गति कुंठित होते, तें निराकार असून नेहमीं असणारें, ज्याला उत्पत्ति व नाश नाहीं व जें आपल्या प्रकाशानें अंधःकाराचा नाश करितें व ज्याला मायेचा स्पर्श मुळींच नाहीं. असें जें ब्रह्म तें तूंच आहेस. तूं कांहीं इंद्रिय विषय नाहींस.

## श्लोक.

महादानैर्ध्यानैर्बहुविधवितानैरपिच यन् ॥
नलभ्यं घोराभिः सुविमलतपोराशिभिरपि ॥
अचिंत्यं तद्विष्णोः पदमखिलसाधारणतया ॥
ददाना केनासि त्वमिह तुलनीया कथय नः ॥११॥

टी० वा०

महादानें ध्यानें व्रतनियम यज्ञादिक विधी ॥
इहींजें लाभेना विमल तपकर्त्यासहि कधीं ॥
असें तें विष्णूचें पद सहज तूं देसी ललिते ॥
समत्वीं त्या तूतें कवण तुळिजे सांग अमुतें ॥ ११ ॥

अर्थ--मोठमोठ्या दानांनीं अगर ध्यानांनीं किंवा वाजपेयादि यज्ञांनीं किंवा कष्टसाध्य तपाचरणांनीं जें प्राप्त होण्यास कठीण असें अचिंत्य विष्णुपद कमी जास्ती भाव न धरतां सारखे प्रमाणानें देणारी जी तूं त्या तुझी या लोकीं अन्य कोणाशीं तुलना करावी बरें ? हें तूंच आह्मांस सांग.

## श्लोक.

तृणामीक्षामात्रादपि परिहरंत्या भवभयं ॥

शिवायास्ते मूर्तेः क इह महिमानं निगदतु ॥
अमर्षम्लानायाः परमनुरोधं गिरिभुवो ॥
विहाय श्रीकंठः शिरसि नियतं धारयति यां ॥ १२ ॥

टी० वा०

विलोकीतां जोतें भवभय जनांचें परिहरी ॥
तया त्वन्मूर्तीचा अतुलमहिमा कोण विवरी ॥
अतिक्रोधें खिन्नें करि हट उमा तो न गणनीं ॥
प्रयत्नें श्रीशंभू तुज निजशिरीं ठेवि जननी । १२ ।

अर्थ—दर्शनमात्रेंच लोकांचें संसारभय नाश करणाऱ्या तुझ्या कल्याणकारक प्रवाह रूप मूर्तीचा महिमा या लोकीं कोण बरें वर्णन करण्यास समर्थ आहे. तुझी थोरवी किती आहे ह्मणशील तर शंकर रागावलेल्या पार्वतीचें शांतवन करण्याचें सोडून नेहमीं तुलाच मस्तकीं धारण कारितो.

श्लोक.

विनिंद्यान्युन्मत्तैरपि च परिहार्याणि पतितै ॥
रवाच्यानि व्रात्यैः सपुलकमपास्यानि पिशुनैः ॥
हरंती लोकानामनवरतमेनांसि कियतां ॥
कदाप्यश्रांता त्वं जगति पुनरेका विजयते ॥ १३ ॥

टी० वा०

मदोन्मत्तव्रात्याधमपतितपैशून्यनिकरीं ॥
इहीं ही जीं त्रासेंत्यजियलि सकंपें अतिदुरी ॥
जनांचीं तीं पापें सतत शमवीतां न शिणली ॥
अशी तूंची एक प्रगट विभवें नांदासि भली । १३ ।

अर्थ–मदोन्मत्त पुरुषांनासुद्धां जीं फार निंद्य वाटतात. जीं जातिभ्रष्ट लोकांच्यानेंही आचरण करवणार नाहींत. धर्म भ्रष्टांना देखील ज्यांचा तोंडावाटे उच्चार करूं नयेसा वाटतो, जीं ऐकतांच दुर्जनांचेही सर्वांगावर रोमांच उभे राहतात. याप्रकारचीं हजारों लोकांचीं पातकें तुला कोणी सहाय्य नसतां यत्किंचित्‌ही श्रम न पावतां नाश करितेस अशी तूंच या भूमंडळावर एक आहेस.

## श्लोक.

स्खलंती स्वर्लोकादवनितलशोकापहृतये ॥
जटाजूटग्रंथौ यदसि विनिबद्धा पुरभिदा ॥
अयेनिर्लोभानामपि मनसि लोभं जनयतां ॥
गुणानामेवायं तव जननि दोषः परिणतः ॥ १४ ॥

टी० वा०

अलीसी स्वर्लोकाहुनि अवनिच्या शोक हरणीं ॥
अशा तूतें बांधी शिव निजकपर्दी निशिदिनीं ॥
अयी निर्लोभाला उपजविति लोभा गुण असे ॥
तुझे त्यांचा प्रादुर्भव जननि ऐसा फळतसे ।१४।

अर्थ–हे माते, स्वर्गलोकापासून सर्व जनांच्या दुःखांचा नाश करण्याकरितां तूं या पृथ्वीवर प्राप्त झालीस असें असून, शंकरानें आपल्या जटेंत तुला बांधून ठेविलें हा शिवासारख्या पुरुषांना तुझा लोभ उत्पन्न करणाऱ्या तुझ्या पवित्र गुणाचाच दोष फळास आला असें ह्मटलें पाहिजे.

## श्लोक.

जडानंधान् पंगून् प्रकृति बधिरानुक्तिविकलान् ॥

ग्रहग्रस्तानस्ताखिलदुरितनिस्तार सरणीन् ॥
निलिंपैर्निर्मुक्तानपि च निरयांतर्निपततो ॥
नरानेव त्रातुं त्वमिह परमं भेषजमसि ॥ १५ ॥

टी० वा०

जडांधा पंगूलें बहु बधिरवाणी विकळ जे ॥
ग्रहछेपा ज्यांचें अघहनन यत्नें न घडिजे ॥
सुरींही सोडीले कुनर नरकाचेचि गमनीं ॥
अशांतें रक्षाया पटु जननी तूं औषधगुणी । १५ ।

अर्थ--जन्मास येऊन काय करावयाचें व काय न करावयाचें हें ज्यांना समजत नाहीं अशा मूर्खांना, तसेच आंधळे, पंगू, जन्मबधिर, मुके व नवग्रहपीडित अथवा पिशाच, राक्षसादिकांनीं ग्रासलेले आणि ज्यांचे घोर पातकास शास्त्रांत प्रायश्चित्त सांगितलें नाहीं व देवांनींही आपल्या हातून रक्षण होत नाहीं ह्मणून टाकिले व जे नरकयातना भोगण्यास तयार झाले अशा घोर पातक्यांची पातकें घालविण्यास तूंच एक उत्कृष्ट औषध आहेस.

श्लोक.

स्वभावस्वच्छानां सहजशिशिराणामयमपा ॥
मपारस्तेमातर्जगति महिमा कोपि जयती ॥
मुदायद्गायंति द्युतलमनवद्यद्युतिभृतः ॥
समासाद्याद्यापि स्फुटपुलकसांद्राः सगरजाः ॥१६॥

टी० वा०

स्वभावे जीं स्वच्छें सहज अतिशीतें तव जळें ॥
तयांच्या उत्कर्षें यश सकळ लोकांत उजळे ॥
जया गाती तोषें सगरसुत रोमांच धरुनी ॥

गति स्वर्लोकीं त्यां तव विभवयोगेंचि जननी।१६

अर्थ—स्वभावताच जें स्वच्छ ( पवित्र ), यत्नांवांचून शीतल, ज्याच्या स्पर्शानें सगर राजाचे पुत्र दिव्य देही होऊन विमानारूढ होऊन स्वर्गास जाऊन रोमांचित तनूनें अद्यापही ज्याचे महात्म्याचें वर्णन करीत आहेत अशा तुझ्या उदकाचा महिमा जय पावला आहे.

## श्लोक.

कृतक्षुद्रैनस्कानथ झटिति संतप्तमनसः ॥
समुद्धर्तुं संति त्रिभुवनतले तीर्थनिवहा ॥
अपि प्रायश्चित्तप्रसरणपथातीतचरितान् ॥
नरांदूरीकर्तुं त्वमिव जननि त्वं विजयसे॥ १७॥

टी० भा०

घडे दैवें किंचित कलुष परि संतापति मनीं ॥
अशांतें ताराया असति बहु तीर्थे त्रिभुवनीं ॥
जया प्रायश्चित्तें नसति दुसरी दे गति अशी ॥
समर्था या लोकीं तुजसम अघी तूंचि असशी ।१७।

अर्थ—हे माते, हलकीं पातकें करून ज्यांना लागलीच पश्चाताप झाला आहे, अशांना मुक्त करावयास या त्रैलोक्यांत अनेक तीर्थें समर्थ आहेत; परंतु ब्रह्महत्ये सारखीं घोर पातकें मुद्दाम करणारे व तीं एकदांच न करणारे ह्मणजे रात्रंदिवस करणारे व ज्यांना प्रायाश्चितसुद्धां नाहीं, अशा पुरुषांनासुद्धां त्या घोर पातकांपासून मुक्त करावयास तूंच आहेस.

## श्लोक

निधानं धर्माणां किमपि च विधानं नवमुदां ॥
प्रधानं तीर्थानाममलपरिधानं त्रिजगतः ॥
समाधानं बुद्धेरथ खलु तिरोधानमधियां ॥
श्रियामाधानं नः परिहरतु तापं तव वपुः ॥ १८ ॥

टी० वा०

अगार श्रेयांचें सकळजनसंतोष अवनीं ॥
अशेषां तीर्थांची गुरुरुचिर जीची त्रिभुवनीं ॥
मतीसीं सौख्याद मलिन मतिला दुर्लभ रुची ॥
असें धाम श्रीचें तववपु हरू आग अमुची ॥ १८ ॥

अर्थ–जें सर्व धर्मांचें व नूतन हर्षाचें स्थान, जें सर्व तिर्थांमध्यें मुख्य, जें तिन्ही जगांचें पारधान वस्त्र, जें बुद्धीचें समाधान, दुर्बुद्धि पुरुषांना आच्छादक (आदृश्य) आणि मोक्षादि संपत्तींचें संपादक असें तुझें प्रवाहरूप शरीर आमच्या दुःखातें दूर करो.

## श्लोक.

पुरो धावंधावं द्रविणमदिराघूर्णितदृशां ॥
महीपानां नानातरुणतरखेदस्य नियतम् ॥
ममैवायं मंतुः स्वहितशतहंतु र्जडधियो ॥
वियोगस्ते मात र्यदिह करुणातःक्षणमपि ॥ १९ ॥

टी० वा०

मदें श्रीच्या अंधप्रभु ह्मणविती मद्यपि जसे ॥
पुढें त्यांच्या धांवें श्रमसहित मी लोभविवशें ॥

**मतीच्या मंदत्वें त्यजुनि तुज नाशी हितशता ।।**
**अयी हा माझाची अनय करुणा तूज उचिता । १९ ।**

**अर्थ**–मदानें ज्यांचे नेत्र अंध झाले आहेत. अशा राजांजवळ द्रव्याचे आशेनें पुढें पुढें करून ते बोलावतील तेव्हां मी अगदीं नियमित वेळीं धांवत धांवत गेलों पण मला त्यापासून द्रव्याची प्राप्ती न झाल्यामुळें मी फार दुःखी झालों. व खऱ्या हिताचा शत्रु बनलों असा जो मी मूर्ख हा माझाच अपराध आहे. याजवर तूं क्षणमात्र तरी दया करावीस अशी माझी प्रार्थना आहे.

## श्लोक.

**मरुल्लीलालोलल्लहरिलुलितां भोजपटली ।।**
**स्खलत्पांसुव्रातच्छुरणविलसत्कौंकुमरुचि ।।**
**सुरस्त्रीवक्षोजक्षरदगरुजंबालजटिलं ।।**
**जलंतेजबालं मम जननजालं जरयतु ।। २० ।।**

टी० वा०

**स्फुरे वायु तेणें उठती लहरी तैं कमळींच्या ।।**
**गळे रेणू तेणें सलिल विलसे कुंकुमरुचा ।**
**जया देवस्त्रीच्या स्तनअगरुचा पंक मिसळे ।।**
**बहु धांवे ऐसें तव जळ हरु जन्म सगळें ।। २० ।।**

**अर्थ**–वायूनें चंचल झालेल्या लाटांच्या योगानें हालणारा जो कमळांचा समुदाय त्यापासून गळणाऱ्या मकरंद कणाचे मिश्रणानें केशरासारखें शोभिवंत दिसणारें तसेंच इंद्रादि देवांच्या स्त्रियांच्या स्तनावरून स्रवणाऱ्या चंदन पंकानें मिश्रित होणारें, व शेवाळानें युक्त असें हें

तुझें उदक मला पुनर्जन्म न मिळेल असें करो.

## श्लोक.

**समुत्पत्तिः पद्मारमणपदपद्मामलनखात् ॥**
**निवासः कंदर्पप्रतिभटजटाजूटभवनं ॥**
**अथायं व्यासंगो हतपतितनिस्तारण विधौ ॥**
**न कस्मादुत्कर्षस्तवजननि जागर्तु जगति ॥ २१ ॥**

## टी० वा०

**बरी उत्पत्ती श्रीरमणचरणाच्या नखिंहुनी ॥**
**असावें शंभूच्या निशिदिनिं जटाजूटभवनीं ॥**
**जगावें सर्वस्वें सतत पतितोद्धार करणीं ॥**
**नसावें कां मातें तरि मग तुझें गौरव जनीं । २१ ।**

**अर्थ**—लक्ष्मीपती जो विष्णू त्याचे पवित्र चरणकमलापासून तुझी उत्पत्ति, मदनाला जिंकणारा जो शिव त्याचे जटेंत निरंतर तुझें वास्तव्य आणि हताश ( विष शस्त्रघातादिकांनीं मेलेले ), व पतित ( प्रायश्चिताई ), जन्मांध यांस उद्धाराविषयीं तुझा सतत उद्योग, अशी जी तूं त्या तुला सर्व लोक कशी बरें मोठी मानणार नाहींत ? मानतीलच.

## श्लोक.

**नगेभ्यो यांतीनां कथय तटिनीनां कतमया ॥**
**पुराणां संहर्तुः सुरधुनि कपर्दोऽधिरुरुहे ॥**
**कया वा श्रीभर्तुः पदकमलमक्षालि सलिलैः ॥**
**स्तुलालेशो यस्यां तव जननि दीतत काविभिः । २२ ।.**

टी० वा०

नद्या शैलाहूनी क्षिति न निघती त्या भुमितळीं ॥
वदावें शंभूच्या शिरिं गुरुपणें कोण जडली ॥
स्वतोयें कोणं श्रीदयितचरणालागिं धुतलें ॥
जियेतें योजावें जव तुज न लेशाप्रति मिळे । २२ ।

अर्थ—पर्वतांपासून वाहणाऱ्या नद्यांमध्यें कोणत्या नदीनें त्रिपुराचा नाशकर्ता जो शंकर त्याच्या जटेंत निवासस्थान केलें आहे ? तसेंच कोणत्या नदीनें विष्णूचे चरणकमल आपल्या उदकानें धुतले आहेत हें तूंच सांग ? तेंव्हा या दोन गुणाच्या अभावामुळेंच कवींना तुला लेश तरी जिची उपमा देतां येईल अशी एक तरी नदी मिळेल काय ? नाहीं.

## श्लोक.

विधत्तां निःशंकं निरवधिसमाधिं विधिरहो ॥
सुखं शेषे शेतां हरिरविरतं नृत्यतु हरः ॥
कृतं प्रायश्चित्तैरलमथ तपोदानयजनैः ॥
सवित्रि कामानां यदि जगति जागर्ति जननी ॥ २३ ॥

टी० वा०

अनुष्ठीं एकांतीं निरवधिसमाधीप्रति विधी ॥
निजे शेषीं सौख्यें हरिहर करो तांडवविधि ॥
तपें कृच्छ्रें दानें उगलि यजमाना सि नपवे ॥
प्रदात्री कामांची जरि जगिं तुझी मूर्ति मिरवे । २३ ।

अर्थ—प्राणिमात्रांचे इच्छित मनोरथ पूर्ण करणारी तूं जर त्रिजगतांत जागृत आहेस तर, त्या ब्रह्मदेवानें

हा सृष्टि उत्पन्न करण्याचा व्यापार मी सोडला तर पुढें सृष्टि कशी चालेल याची काळजी न करितां निःशंक समाधी लावून बसावें. विष्णूनें, जगाचें रक्षण कोण करील याची काळजी न करितां शेषावर गाढ निद्रा घ्यावी शंकरानें सृष्टीचा संहार कसा होणार याचा विचार न करितां स्वस्थ तांडव करावें. तूं जागृत असतां धर्मशास्त्रांतील प्रायश्चित, तप, दान इत्यादि कांहीं एक नकोत तेव्हां काय आश्चर्य तिघां देवांचें व प्रायश्चितादिकांचे काम एकटी तूं ( भागीरथी ) करितेस.

## श्लोक.

अनाथ स्नेहार्द्रां विगलितगतिः पुण्यगतिदां ॥
पतन्निश्वोत्धर्त्रीं गदविगलितः सिद्धभिषजं ॥
सुधासिंधुं तृष्णाकुलितहृदयोमातरमयं ॥
शिशुः संप्राप्तस्त्वामहमिहविदध्याः समुचितं ॥ २४॥

## टी० वा०

अनाथ स्नेहाळे गति विहिन मी तूं सुगतिदा ॥
जगोद्धारा तूं मी पतित गद मी तूं अरिगदा ॥
सुधाब्धी तूं मी जो तृषित अयि तूझा शिसु असा
तसा तूतें आलों शरण पथ योजी उचितसा ।२४।

अर्थ—मी अनाथ, तूं दयाळू; मी नष्टगती; तूं उत्तम गति देणारी; मी पतित, तूं सर्वांचा उद्धार करणारी, मी रोग ग्रस्त, तूं उत्तम वैद्य; मी तृषाक्रांत, तूं आमृताचा सिंधु, मी अर्भक तूं आई; अशीं आहें

याजकरितां मी तुला शरण आलों आहे तर तुला जें योग्य वाटेल तें माझें कर.

## श्लोक.

विलीनो वै वैवस्वतनगरकोलाहलभरो ॥
गतादूतादूरं क्वचिदपि परेतान्मृगयितुं ॥
विमानानां व्रातो विदलयति वीथीर्दिविषदां ॥
कथा ते कल्याणी यदवधि महीमंडलमगात् ॥ २५ ॥

### टी० वा०

विराले निःशेषें यमनगरिंचे जे गलबले ॥
पहाया प्रेतांचें अवनि फिरती दूत उगले ॥
विमानाच्या संघें विबुधपथ सोडी स्वनियमा ॥
जसा आला भूमीं सुखकर तुझा कीर्तिमहिमा । २५

अर्थ—जेव्हांपासून तुझी कल्याणकारक कथा या भूमंडलावर प्राप्त झाली, त्या दिवसापासून यमाच्या नगरांतील पूर्वीचा तो दुःखीत जनांचा गोंगाट अजिबात बंद झाला. त्या दिवसापासून यमदूतही तुझी कथा ज्या ठिकाणीं ऐकूं येत नाहीं. अशा दूरदूरच्या प्रदेशीं मेलेल्या प्राण्यास सोधावयास भटकूं लागले व त्याच दिवसापासून तुझ्या सेवनानें पवित्र होऊन दिव्य देही झालेले लोक विमानांत बसून स्वर्गलोकीं जात असतां त्या विमानांनी देवांचे आकाशांतील मार्ग रोधून टाकले

## श्लोक.

स्फुरत्कामक्रोधप्रबलतरसंजातजटिल ॥

ज्वलज्वालाजालज्वलितवपुषां नः प्रतिदिनम् ॥
हरंतां संतापं कमपि मरुदुल्लासलहरी ॥
छटाचंचत्पाथःकणसरणयो दिव्यसरितः ॥ २६ ॥

टी० वा०

स्फुरे कामक्रोध ज्वर बहुकरालार्चिक वनीं ॥
जळे तेणें काया जननि अमुची ही प्रतिदिनीं ॥
महोर्मीच्यायोगें उसळति तुझे तोयकण ते ॥
तया संतापातें शमवुत अहो देवसरिते ॥ २६ ॥

अर्थ—जो प्रत्येक दिवशीं काम क्रोधादिकांपासून उत्पन्न झालेला, ज्याचे योगानें आमचें शरीर जळून गेलें आहे. व जो औषधादि उपायांनीं किमपीही कमी न होणारा. असा जो संतापज्वर त्यास गंगेचा आकाश-वायु वेगानें सतत वर उचंबळणाऱ्या उदकांचे तुषार दूर करोत.

श्लोक.

इदं हि ब्रह्मांडं सकलभुवनाभोगभुवनं ॥
तरंगैर्यस्यांतर्लुठति परितस्तिंदुकमिव ॥
स एषः श्रीकंठःप्रपितजटाजूटजटिलो ॥
जलानां संघातस्तव जननि तापं हरतु नः ॥२७॥

टी० वा०

अहो हें ब्रह्मांडाकृति सकल लोकांसह वरी ॥
रुळे जेथें उर्मी भ्रमणविवशैंतिंदुकपरी ॥
असा तो हा मृत्यंजय पृथु कपर्दी जाडिनला ॥
तुझा श्रीतोयौघप्रशमन करू पाववाहिला । २७ ।

अर्थ—ज्याच्या पोटांत चवदा भुवनें असें जें अवाढव्य ब्रह्मांड तें सुद्धां ज्यामध्यें लाटांच्या योगानें टेंभुरणीच्या फळाप्रमाणें गटांगळ्या खातें व जो शंकराच्या जटाजूटांत राहणारा असा तुझा उदकाचा समूह आमच्या दुःखाचें हरण करो.

## श्लोक.

त्रपंते तीर्थानि त्वरितमिह यस्योद्धृतिविधौ ॥
करं कर्णे कुर्वंत्यपि किल कपालिप्रभुतयः ॥
इमं त्वं मामंब त्वमियमनुकंपार्द्रहृदये ॥
पुनाना सर्वेषामघमथनदर्पं दलहसि ॥ २८ ॥

टी० वा०

जयाच्या उद्धाराविषयीं बहुतीर्थेंहि पळता ॥
त्वकांनीं हस्तांतें मग विधि शिवादीक धरिती ॥
असा मी त्या मातें पुनित करिशी तूं जननिये ॥
जनीं पापघ्नाच्या हरिसि गुरुगर्वास सदये । २८ ।

अर्थ—हे सदयहृदय माते, आपला उद्धार व्हावा ह्मणून मी अनेक तीर्थें हिंडलों; परंतु तींही मला पाहतांच लज्जित होतात इतकेंच नव्हे तर महादेवासारखे मोठमोठे देव सुद्धां आपल्या कानावर हात ठेवतात असा जो मी महा पातकी याचा जर तूं उद्धार करशील तरच त्या सर्व तीर्थांचा व देवांचा गर्व परिहार होणार आहे.

## श्लोक.

श्वपाकानां व्रातैरमितविचिकित्साविचलितैः ॥

विमुक्तानामेकं किल सदनमेनःपरिषदां ॥
अहो मामुद्धर्तुं जननि घटयंत्याः परिकरं ॥
तव श्लाघां कर्तुं कथमिव समर्थो नरपशुः ॥ २९ ॥

टी० वा०

श्वपाकांच्या श्रेणीहुनि बहुत नीचांत गणणा ॥
न मर्यादा पापा अघसदन मी एकचि ह्मणा ॥
अशाला ताराया कटि कसुनि होसी निज सखे ॥
कशी तूझी श्लाघा द्विपदपशु जो तो करूं शके ।२९।

अर्थ—हे माते, असंख्य पातकें करावीं, अथवा न करावीं अशी शंका येऊन शेवटीं न करण्याविषयीं निश्चय केलेल्या महाचांडालांनीं देखील टाकून दिलेल्या पापाचें मी केवळ घर, अशाच्या उद्धाराकरितां तूं कंबर बांध. त्या तुझी स्तुति करावयास मी केवळ दोन पायांचा नर पशूच आहें. तर हें काम करण्यास मी असमर्थ आहें.

## श्लोक.

नकोप्येतावंतं खलु समयमारभ्य मिलितो ॥
युदुद्धारादाराद्भवति जगतोविस्मयभरः ॥
इती मामीहां ते मनसि चिरकालं स्थितवती ॥
मयं संप्राप्ताहं सफलयितुमंब प्रणय नः ॥ ३० ॥

टी० वा०

न कोणी हे ऐसा अजिवरि मला प्राप्त जन कीं ॥
जयाच्या उद्धारें अखिल अवनी मस्तक तुकी ॥
अशी इच्छा पोटीं बहु दिवस होती तुज तिला ॥

करायामी आलों सफळ समजा भाव तुजला । ३० ।

अर्थ—हे माते ह्या कालपर्यंत तुझा असा कोणीही महापापी मिळाला नाहीं कीं, ज्याचा उद्धार केला असतां सर्व जग मानच डोलवितील ह्मणजे लोकांमध्यें गंगा ही महापातकी जनांचा तेंव्हांच उद्धार करिते अशी जी ख्याती ती केंव्हां होईल. अशी जी तुझी इच्छा ती पूर्ण करण्याकरितां मी तुझ्या पुढें उभा राहिलों आहे तर माझा उद्धार कर.

## श्लोक.

श्ववृत्तिव्यासंगोनियतमथ मिथ्याप्रलपनं ॥
कुतर्केष्वभ्यासः सततपरपैशून्यमननम् ॥
अपिश्रावंश्रावं मम तु पुनर्गेवं गुणगणा ॥
नृतंत्वत्कोनामक्षणमपि निरीक्षेत वदनम् ॥ ३१ ॥

### टी० वा०

स्वभाव श्वानाचा तदुपरि असत्यार्थ वदनीं ॥
कुतर्का घोकावें अवदि परपैशून्यमननीं ॥
असे माझे दोष प्रचुर गुग कानीं पारखुनी ॥
मुखा पाहे कोण क्षणहि तुजवांचूनि जननी ॥ ३१ ॥

अर्थ—निरंतर गांवोगांव वरोवर फिरणें, उच्छिष्ठ खाणे अशा प्रकारची जी श्वान वृत्ती त्याचा मी स्वीकार केला. खोटें बोण्याचें व्रतच आचरण केलें आहे. तसेंच परस्त्री गमन या कर्माचा केवळ अभ्यासच केला. व कावळयाप्रमाणें दुसऱ्याच्या आचरण रूप क्षतावर माझी दृष्टि, असे जे माझे गुण हे ऐकून माझें

कोणी तोंड तरी पाहील काय ? मग उद्धार करण्या-
ची गोष्टच नको.

## श्लोक.

विशालाभ्यामाभ्यां किमिहनयनाभ्यां खलु फलं॥
नयाभ्यामालीढा परमरमणीया तव तनुः ॥
अयं हि न्युत्कारो जननि मनुजस्य श्रवणयोः ॥
ययो र्नांतर्यास्तव जननिलीलाकलकलः ॥ ३२ ॥

टी० वा०

वृथा ते मोठे ही नयन तुझ्ज ज्यांहीं तनु कधीं ॥
विलोकीली नाहीं जरि जननि लावण्य उदधी ॥
न वर्णावे त्यांला अधम नरकर्णाकृति बिळा ॥
न ऐकीला जींहिं मधुर तव लीला गलबला । ३२ ।

अर्थ—हे आई, इहलोकीं जन्मास येऊन ज्यांचे डोळे मोठे आहेत, अशांनीं तुझी प्रवाह मूर्ति एक वेळही पाहिली नाहीं. व कानानीं तुझ्या लाटांचा मधुर ध्वनीही ऐकिला नाहीं अशांस कान व डोळे असणें वं नसणें सारखेंच.

## श्लोक.

विमानैः स्वच्छंदं सुरपुरमयंते सुकृतिनः ॥
पतंति द्राक्पापाजननि नरकांतः परवशाः ॥
विभागोयं तस्मिन्नशुभमयमूर्तौ जनपदे ॥
न यत्र त्वल्लिलादलितमनुजाशेषकलुषा ॥ ३३ ॥

टी० वा०

घडे ज्याला पुण्याचरण तिहिं जावें सुरपुरीं ॥

पडावें पापिष्टीं विषम नरकीं घोर विवरीं ॥
व्यवस्था ऐशी हे अशुभ शुभ देशांताचे असे ॥
तुझी लीला जेथें सकल अघहर्त्री न विलसे। ३३।

अर्थ—हे माते, पुण्यवान् पुरुष स्वर्गांचे ठायीं स्वच्छंदपणानें जातात व पापी लोक यमदूतांचे स्वाधीन होऊन नरकांत पडतात ही व्यवस्था जेथें तूं लीलामात्रें करून नाहींस ह्मणजे जेथें तुझा प्रवाह नाहीं त्या देशांत असो.

## श्लोक.

अपि घ्नंतोविप्रानविरतमुशंतोगुरुसतीः ॥
पिबंतोमैरेयं पुनरपि हरंतश्चकनकम् ॥
विहाय त्वय्यंते तनुमतनुदानाध्वरजुषा ॥
मुपर्यंब क्रीडंत्यखिलसुरसं भावितपदाः ॥ ३४ ॥

टी० वा०

वधीती विप्रांतें सतत गुरुदारा निरत जे ॥
हरावें स्वर्णांतें मलिन मदिरा पानहि किजे ॥
महत्पापी ऐसे त्याजिति निज देहां तव तिरीं ॥
करीती क्रीडा ते क्रत मख नराहुनि उपरी । ३४ ।

अर्थ—हे माते, ब्राह्मण वध करणारे, गुरुस्त्रियांचा अभिलाष करणारे, सुरापान करणारे, सुवर्ण चोरणारे असे जे महान् पापी, जर मरणसमयीं तुझ्या प्रवाहांत आपला देह टाकतील, तर ते मोठमोठे यज्ञ करणाराहीपेक्षां वरच्या लोकों जातील.

## श्लोक.

अलभ्यं सौरभ्यं हरति नियतं यः सुमनसां ॥
क्षणादेव प्राणानपि विरहशस्त्रक्षतभृताम् ॥
त्वदीयानां लीलाचलितलहरीणां व्यतिकरात् ॥
पुनीते सोपि द्रागहह पवमानस्त्रिभुवनं ॥ ३५ ॥

### टी० वा०

सुगंधा पुष्पांचें हरण नियमें संतत किजे ॥
वियोगाख्या शस्त्रें क्षत हरितो तत्प्राण सुखि जे ॥
असा वायू तूझा चालित लहरी योग मिळवें ॥
स्वसंचारें मातें करि भुवनहि शुद्ध अजवें ॥ ३५ ॥

अर्थ--हे माते, दुसऱ्यास प्राप्त न होणारें असें जें पुष्पांचें सुगंधत्व हरण करणारा व वियोगरूप शस्त्रानें भिन्न हृदय झालेल्यांचें प्राणाचेंही हरण करणारा असा जो पापी वायू तो तुझ्या लाटांच्या स्पर्शानेंच पवित्र होऊन संपूर्ण त्रैलोक्यासही पवित्र करितो.

## श्लोक.

कियंतः संत्येके नियतमिह लोकार्थघटकः ॥
परे पुतात्मानः कति च परलोकप्रणयिन ॥
सुखं शेते मातस्तव खलु कृपातः पुनरयं ॥
जगन्नाथः शश्वत्त्वयि निहितलोकद्वयभरः । ३६ ।

### टी० वा०

किती या लोकांच्या स्थितिवसुमतो सांग करिती ।
पवित्रात्मे कोणी सतत परलोकांस जपती ।
कृपापांगें तूझ्या सुखरुप निजे मी धणिवरी ॥

**समर्पूनी लोक द्वय जननि चिंता तुजवरी । ३६ ।**

**अर्थ**—हे माते, किती एक लोक या जगांत परहितासाठीं झटत आहेत व कितीएक तपादी साधनांनीं पवित्र होऊन उभयलोकीं कीर्ति संपादितात आणि हे आई, हा जगन्नाथ तुजवर दोन्ही लोकींचा भार ठेऊन स्वस्थ झोप घेत आहे.

## श्लोक.

**भवत्या हि व्रात्याधमपतितपाखंडपरिषत् ॥**
**परित्राणस्नेहः श्लथयितुमशक्यः खलु यथा ॥**
**ममाप्येवं प्रेमा दुरितनिवहेष्वंब जगति ॥**
**स्वभावोयं सर्वैरपि खलु यतो दुष्प्रतिहरः । ३७ ।**

टी० वृ०

**जगीं जेका व्रात्यादिक अधम जे हे प्रगटले ।**
**तयां रक्षावें ही अविरत करुणा तूज न टळे ॥**
**सुटेना तैसेंचि दुरित विषयीं प्रेम मज तीं ॥**
**स्वभावातें कोणी त्यजि जनि अशी गोष्ट लटकी । ३७ ।**

अर्थ—हे माते जसा तुला पातकी जनांचीं पातकें हरण करण्याविषयींचा स्नेह टाकणें फारच अशक्य आहे तसेंच मलाही पातक न करणें हें फारच अशक्य आहे. कारण प्रत्येक प्राणीमात्राला चांगला किंवा वाईट स्वभाव जडलेला फारच अशक्य आहे.

## श्लोक.

**प्रदोषांतर्नृत्यत्पुरमथनलीलोत्धृतजटा ॥**

तटाभोगप्रेंखल्लहरिभुजसंतानविधुतैः ॥
बिलक्रोडक्रीडज्जलडमरुटंकारसुभगः ॥
स्तिरोधत्तां तापं त्रिदशतटिनीतांडवविधिः ।३८।

टी० वा०

जटा शंभू नृत्यें हलु न हलती वीचिहि मधिं ॥
तुझ्या ते जों जाणों भुज करिति लास्योचित विधि ॥
महा दोलें वाजे जळ निघरतो तोचि डमरू ॥
असा तुझा नृत्योत्सव जननी तापाप्रति हरू ।३८।

अर्थ—प्रदोषकाळीं नृत्य करणाऱ्या शंकरानें लीलेनें मस्तकावर पसरलेल्या जटांचे आघातानें चंचल झालेल्या लहरीरूप हस्तांचे ज्यांत हावभाव होत आहेत व तीरावरील दरीच्या बिळांत पाणी शिरून जो शब्द होतो तोच जणूं डमरूचा मधुर ध्वनी असें जें देवनदीचें प्रवाहरूप आल्हादकारक नृत्य तें माझा संताप दूर करो.

श्लोक

सदैव त्वय्येवार्पितकुशलचिंताभरमिमं ॥
यदि त्वं मामंब त्यजसि समयेऽस्मिन्सुविषमे ॥
तदा विश्वासोऽयं त्रिभुवनतलादस्तमयते ॥
निराधारा चेयं भजति खलु निर्व्याजकरुणा ।३९।

वा० टी०

तुझे ठायीं ठेवी निजकलुष चिंता निशिदिनिं ॥
तया मातें तेव्हां त्यजिसि विषमीं विश्व जननी ॥
अनाथ स्नेहाळे त्रिजगिं तयिं विश्वासचि बुडे ॥

निराधारें झालें सहज मग कारुण्य उघडें । ३९ ।

अर्थ—हे माते, रात्रंदिवस तुझ्यावरच आपल्या कल्याणरूप चिंतेचा भार अर्पण करणाऱ्या मला संकटप्रसंगीं जर तूं सोडशील तर गंगा शरणागताचा उद्धार करिते असा जो सर्व लोकांचा विश्वास आहे तो आज त्रैलोक्यांतून निघून जा असें म्हणावें लागेल आणि ही तुझी निष्कपट दया तीही निराधार होईल.

श्लोक.

कपर्दादुल्लस्य प्रण[illegible]मिलद्वामयुवते ॥
पुरारेः प्रेखंत्यो मृदुतलसीमंतसरणौ ॥
भवान्या सापत्न्यस्फुरितनयनं कोमलरुचा ॥
करेणाक्षिप्तास्ते [illegible]नि विजयंतां लहरयः ॥ ४० ॥

टी० वा०

अलिंगी जे ऐसें गिरिश शिरिं जैशी न तशि रे ॥
शिरीं अंबेच्या तें [illegible] [illegible]गिंचे नीर उतरे ॥
तयातें हस्तानें असुडि [illegible]रक्तनयना ॥
अशी सापत्नांची विदित तव लीला त्रिभुवना ।४०।

अर्थ—हे माते निरंतर प्रीतीनें आलिंगन करून राहणारी शिवाच्या वामभागीं दुसरी कोण युवती बसली आहे, हें पाहण्याकरितां तुझ्या लहरी जटाजूटांतुन अति मृदुल अशा भालतलीं आल्या तेव्हां पार्वतीनें सापत्न्य भावामुळें क्रोधानें लाल झालेल्या नेत्रांनीं पाहून आपल्या कोमल हस्तानें ज्यांचें निवारण केलें अशा तुझ्या लहरी जय पावोत.

## श्लोक.

प्रपद्यंते लोकाःकति न भवती मत्रभवती ॥
मुपाधिस्तत्रायं स्फुरति यदभीष्टं वितरसि ॥
शपेतुभ्यंमातर्ममतु पुनरात्मा सुरधुने ॥
स्वभावादेव त्वय्यमितमनुरागं विधृतवान । ४१ ॥

टी० वा०

शरण्यें लोकांला शरण तुज येथेंच करणें ॥
उपाधि व्यासंगास्तव परअभीष्टा वितरणें ॥
महात्मा हा माते शपिल तुज निर्व्याज वदतों ॥
स्वभावें तद्रूपीं अतुल अनुरागासि धरितों ॥४१॥

**अर्थ**—हे माते, तूं अभिष्ट मनोरथ पूर्ण करणारी असून त्रैलोक्याला पूज्य आहेस त्या तुझा आश्रय करणार नाहीं असा कोण येथें मिळेल ? कोणीच नाहीं. कारण तूं त्यांस जें इच्छित असेल तेंच देतेस आणि माझा जीवात्मा तर तुझे ठायीं अपरीमित प्रेम धारण करीत आहे हें मी तुझ्याजवळ शपथेवर सांगतों कारितां तूं माझा हेतु लवकर पूर्ण कर.

## श्लोक.

ललाटे या लोकैरिह खलु सलीलं तिलकिता ॥
तमोहंतुं धत्ते तरुणतरमार्तंडतुलनाम् ॥
विलूंपंती सद्यो विधिलिखितदुर्वर्णसरणिं ॥
त्वदीया सा मृत्स्ना मम हरतु कृत्स्नामपि शुचं । ४२ ।

टी० वा०

जिला एके काळीं जन निज कपाळीं तिलकितां ॥

हरे दुर्वर्णांची लिपि जिसविधी सूत्र लिहितां ॥
तमाच्या जे नाशा विषयिं धरि मार्तंड उपमा ॥
अशी तूझी माती मम परिहरू शोकगरिमा ॥ ४२ ॥

अर्थ–हे माते, जी मृत्तिका मृत्यू लोकीं मनुष्यानें त्रिपुंड रूपानें धारण केली असतां माध्यान्हकालचे सूर्याप्रमाणें पापरूप अंधकाराचा नाश करिते व ब्रह्म देवानें लिहिलेल्या वाईट सूचक अशा चिन्हाचा तत्काल लोप करिते अशी जी तुझ्या कांठची मृत्तिका ती माझा शोक नाहींसा करो.

श्लोक.

नरान्मूढांस्तत्तज्जनपदसमासक्तमनसो ॥
हसंतः सोल्लासं विकचकुसुमव्रातमिषतः ॥
पुनानाः सौरभ्यैः सततमलिनो नित्य मलिनान् ॥
सखायो नः संतु त्रिदशतटिनी तीरतरवः ॥ ४३ ॥

टी० भा०

सुजन्मापासोनी न [illegible] कुदेशांत मरती ॥
तयां पुष्प व्याजें हसुनि अगतीतें सुचविती ॥
स्वसौगंधें नित्य भ्रमर कुलमालिन्य हरिते ॥
घडे पेशा तूझ्या पुलिन तरुचें सख्य अमुतें । ४३ ।

अर्थ–हे माते, ज्या ठिकाणीं तुझा प्रवाह नाहीं, अशा देशांत राहणारे, आपण ज्या देशांत राहतों तोच देश आपणाला सुखदायक आहे असें मानून राहणारे, मूर्ख लोकांचा आपल्या प्रफुल्लीत पुष्पांच्या मिषानें हर्ष पूर्वक उपहास करणारे व आपल्या पुष्प

सुगंधाच्या योगानें जन्मतःच मळीन अशा भ्रमराना पवित्र करणारे तुझ्या काठचे वृक्ष माझे मित्र असोत.

## श्लोक.

यजंत्येके देवान्कठिणतरसेवांस्तदपरे ॥
वितानव्यासक्ता यमनियमरक्ता कतिपये ॥
अहं तु त्वन्नामस्मरणकृतकामास्त्रिपथगे ॥
जगज्जालं जाने जननि तृणजालेन सदृशम् ॥४४॥

टी० या०

महाकष्टें सेवा करुनि कितिदेवांसि यजिति ॥
दुजे यज्ञी निष्ठा कितिक मनयोगें दमविती ॥
असा मी तो तूझ्या स्मरणपरितोषांच फुगुनी ॥
जगातें या लेखीं तृणसम अगे विश्वजननी । ४४

अर्थ—हे माते नानाप्रकारच्या कष्टरूप सेवा करून व कित्येक यज्ञ यागामध्यें आसक्त आहेत, तसेंच कित्यक यम नियमादि अष्टांग योग साधनाविषयीं निरंतर झटले आहेत, व मी तर तुझ्या नाम स्मरणानेंच सर्व मनोरथ पूर्ण होऊन सर्व जगाला तृणासमान मानीत आहें.

## श्लोक.

अविश्रांतं जन्मावधि सुकृतजन्मार्जनकृतां ॥
सतां श्रेयः कर्तुं कतिच कृतिनः संति विबुधाः ॥
निरस्तालंबानामकृतसुकृतानां तु भवती ॥
विनामुष्मिँल्लोके न परमवलोके हितकरम् ॥४५॥

### टी० वा०

**सुकर्मै जे जन्मप्रभृति विधिनें नित्य करिती ॥**
**तयां संरक्षाया कितिक सुरहे दक्ष असती ॥**
**परंतू जो पापी सततहि अनाचार कुमती ॥**
**अशाला ताराया तुजविण दिसेना परगती ।४५।**

**अर्थ**–हे मात, ज्यांनीं आपणाला चांगले लोकीं व चांगले कुलामध्यें जन्म यावा ह्मणून मोठीं सुकर्मा-चरण केलें व त्याचें संरक्षण करण्यास कितीक देव तत्पर आहेत; परंतु पुण्य न करणार असे जे पापी त्यांचा उद्धार करणारा तुजवांचून दुसरें कोणीच मला दिसत नाहीं.

### श्लोक.

**पयः पीत्वा मातस्तव सपदि यातः सहचरैः ॥**
**विमुढैः संरंतुं क्वचिदपि न विश्रांतिमगमम् ॥**
**इदानीं मुत्संगे मृदुपवनसंचारशिशिरे ॥**
**चिरादुन्निद्रं मां सदयहृदये शायय चिरं ॥ ४६ ॥**

### टी० वा०

**पया तूझ्या माते पिउनि शिशुभावें रतिहिना ॥**
**सवें क्रीडे गेलों अधिक बडलें दुःखचि मला ॥**
**निजोत्संगीं आतां निजवी मजला स्वस्थ जननीं ॥**
**मुखस्पर्शै तापा हरि पवन जेथें अनुदिनीं ।४६।**

**अर्थ**–हे माते, तुझें उदक प्राशन करून मजप्रमाणें मूर्ख अशा मित्रांबरोबर नानाप्रकारच्या क्रीडा करण्यास गेलों पण त्यांत मला कांहींच विश्रांती होईना ह्मणून

तूं मंद वायूच्या संचारानें शीतल अशा आपल्या तीर-रूप मांडीवर मला चिरकाल निजीव.

## श्लोक.

बधान द्रागेव द्रढिमरमणीयं परिकरं ॥
किरीटे बालेंदुं नियमय पुनः पन्नगगणैः ॥
न कुर्यास्त्वं हेलामितरजनसाधारणतया ॥
जगन्नाथस्यायं सुरधुनि समुद्धारसमयः ॥ ४७ ॥

## टी० वा०

कटींबांधीं आधीं गाढ अति वेगें परिकरा ॥
ललाटीं संरक्षीं [illegible] ॥
नकोजे त्वां हेळा इतर जन साधारण धरूनी ॥
जगन्नाथाचा हा गति समय सांभाळि जननी ॥४७॥

**अर्थ**—हे मात, तूं आपल्या सुंदर अशा कटीप्रदेशाचें बंधन कर. आणि शिरोभागीं ठाई सर्पांच्या समुदायानीं चंद्रकलेचें बद्ध स्थापन कर. कारण हा जगन्नाथ महापातकी आहे तर साधारण मनुष्याप्रमाणें या माझी तूं अवज्ञा करूं नको.

## श्लोक.

शरच्चंद्रश्वेतां शशिशकलश्वेतालमुकुटां ॥
करैः कुंभांभोजे वरभयनिरासौ च दधतीम् ॥
सुधाधाराकाराभरणवसनां शुभ्रकमर ॥
स्थितांये त्वां ध्यायंसुदयति न तेषां परिभवः॥४८॥

टी० वा०

शरीरीं चंद्राभा विशद शशिशोभा सुमुकुटीं ॥
धरी कुंभा पद्मा वर अभय जारी करपुटीं ॥
पटी पीयूषाची रुचि रुचिरसंस्थान मकरीं ॥
अशा तूतें ध्याती नर वर नाल्यां दुर्गति करीं ॥४८

अर्थ—हे गंगे शरद्दतुंतल्या चंद्रासारखी शुभ्रवर्ण, मस्तकावर धारण केलेल्या चंद्रकलेनें जिचा मुगुट अतिशुभ्र दिसत आहे. आणि चार हातांत अमृत, कलश, कमल, वर, व अभयहीं धारण केलीं आहेत. व जिचीं अमृताच्या धारेसारखीं स्वच्छ वस्त्रें आणि भूषणें आहेत, व जी शुभ्र मकरावर बसली अशा तुझ्या मूर्तीचें जे ध्यान करितात त्यांचा कांहींही अनादर होत नाहीं.

श्लोक.

दरस्मितसमुल्लसद्वदनकांतिपूराधृतै ॥
भवज्वलनभर्जितानानिशमूर्जयंती नरान् ॥
चिदेकमयचंद्रिकाचयचमत्कृतिं तन्वती ॥
तनोतु मम शंतनोः सपादि शतनोरंगजा ॥ ४९ ॥

टी० वा०

सुमंदहसिते स्फुरे वदन दीप्ति पीयूषसि ॥
तिनेंनिववि मानवा भवदवाग्नि तप्ता करी ॥
धरीं विशद चित्प्रभामय अपूर्व रूपातया ॥
करू ममसुखी तनू त्वरित शंतनूची प्रिया ॥४९।

अर्थ—किंचित् हास्यानें विकास पावलेल्या मुखावर कांतिरूप अमृतानें संसाररूप अग्नीनें दग्ध झालेल्या

मनुष्याचें पुनरुज्जीवन करिते, आणि चैतन्यरूप चंद्रकांतीच्या योगानें लोकाना चमत्कार व आनंद उत्पन्न करिते अशी शंतनुराजाची स्त्री जी गंगा ती माझें नेहमीं कल्याण करो,

श्लोक.

मंत्रैर्मीलितमौषधैर्मुकुलितं त्रस्तं सुराणां गणैः ॥
स्रस्तंसांद्र सुधारसैर्विदलितं गारुत्मतैर्ग्रावभिः ॥
वीचीक्षालितकालियाहितपदे स्वर्लोककल्लोलिनि॥
त्वंतापं निरयाधुना मम भव ज्वालावलीढात्मनः॥५०

टी० का०

मंत्रां मौन्यपडे महौषधिगती संकोचल्या देव ही॥
स्रस्त स्रस्त सुधारसास्यगरुडग्रावाखी मौनिमही
हे मंदाकिनि कालिय.सद्रिपु जो त्याचे पद त्याचिया
आतां तू भवनागदंश जननी तापास दे प्रक्रिया।५०।

अर्थ—आपल्या लहरींनीं विष्णुपदाचें क्षालन करि हें सुरनदी तूं संसाररूप अग्नीच्या ज्वाळांनीं दग्ध असा माझा संताप लवकर दूर कर, कारण मला पहातांच गायत्र्यादि मंत्रांनीं आपल्या शक्तीचा संकोच केला. औषधें निर्वीर्य झालीं, देव भ्याले, पुनरुज्जीवन करणारे अमृतरस गळाले, गरुड ज्यांचा स्वामी आहे असे विषहारी पाषाण फुटले तेव्हां तुजवांचून माझा उद्धार करणारा दुसरा कोणी नाहीं.

श्लोक.

धूतं नागेंद्रकात्तिप्रमथगणमणीश्रेणिनंदीन्दुमुख्यं ॥

सर्वस्वं हारयित्वा स्वमथपुरभिदि द्राक् पणीकर्तुकामे।
साकूतं हैमवत्या मृदुलहसितया वीक्षिता यास्तवांब॥
व्यालोलोल्लासि वल्गाल्लहरि नटघटी तांडवं नः
पुनातु ॥ ९१ ॥

टी० वा०

द्यूतीं चर्मांद्विपाच्या प्रथम गणमणी नंदि चंद्रादि सारीं।
हारीं सामांग्रअंबा मगपणि अपणा आत्मइच्छी पुरारी ।
ऐशा संधीस तूतें विहसुनि निरखी जी धरी गूढभावें ।
क्रोधोर्मी नित्यलीला नटघटि तांडव रक्षु आह्मां प्रभावें।

अर्थ—पार्वतीनें द्यूतामध्यें महादेवाकडून सर्प, गज-चर्म, प्रथमगण, रुद्राक्ष, नंदी आणि चंद्रकला इत्यादि सर्व धन हरण करून घेतलें तेव्हां महादेवानें आपणा स्वतःलाच पणास लावावें असा विचार केला तेव्हां मंद हास्य करणाऱ्या पार्वतीनें ह्या गंगेला पणामध्यें जिंकून घ्यावी अशा हेतूनें तुजकडे पाहिलें असतां तुझें सर्वांग कांपूं लागल्यामुळें चंचल झालेल्या लहरींचें जें तांडव तें आमचा संताप दूर करो.

## श्लोक.

विभूषिता नंगरिपूत्तमांगा ।
सद्यःकृतानेकजनार्तिभंगा ॥
मनोहरोतुंगचलत्तरंगा ।
गंगाममांगान्यमलीकरोतु ॥ ९२ ॥

टी० वा०

करी अलंकार शिवोत्तमांगीं ॥
स्नानेंजगाचें अघ शैल भंगी ॥
अपूर्व शोभा जिचिया तरंगा ॥
गंगा अशी पूत करूं ममांगा ॥ ५२

अर्थ–आपल्या सतत वस्तीनें महादेवाचें मस्तक निरंतर शोभविलें आहे. व जी दर्शन होतांच तात्काळ सर्व जनांचीं दुःखें घालवित आणि जिचे तरंग सुंदर उच व चंचल आहेत अशी गंगा माझे देहास पवित्र करो

श्लोक.

इमां पीयूष लहरीं जगन्नाथेन निर्मिताम् ॥
यः पठेतस्य सर्वत्र जायंते जय संपदा ॥ ५३

टी० वा०

अमृताची लहरि हे जगन्नाथ कवीकृती ॥
जो पठे त्यासिं सर्वत्र होतील जय संपदा ॥ ५३

अर्थ–ही जगन्नाथ पंडितानें केलेली गंगा लहरिचें जो पठण करील त्यास इहपर लोकीं संपत्ती सुखहीं प्राप्त होतील.

समाप्त

# सार्थ गंगाष्टक.



मातः शैलसुतासपत्नि वसुधाशृंगारहारावली ।
स्वर्गारोहण वैजयंति भवतीं भागीरथीं प्रार्थये ॥
त्वत्तीरे वसतस्त्वदंबु पिबतस्त्वद्वीचिषु प्रेंखत ।
स्त्वन्नामस्मरतस्त्वदर्पितदृशः स्यान्मे शरीरव्ययः १।

अर्थ–हिमाचलकन्या जी पार्वती तिची सवत, पृथ्वीची अलंकाररूप हारपंक्ति, आणि स्वर्गावर जाण्याविषयीं उभारलेली जणुं पताकाच अशा हे माते, मी तुझी ( भागीरथीची ) प्रार्थना करितों कीं, तुझ्या तीरीं वास घडत असतां, तुझ्या उदकाचें प्राशन घडत असतां, तुझ्या लहरीमध्यें पोंहत असतां, तुझें नामस्मरण करींत असतां किंवा तुझ्याकडे पाहत असतां माझ्या देहाचा अंतकाळ होवो.

त्वत्तीरे तरुकोटरांतरगतो गंगे विहंगो वरं।
त्वन्नीरे नरकांतकारिणि वरं मत्स्योऽथवा कच्छपः ॥
नैवान्यत्र मदांधसिंधुरघटासंघट्टघंटारणत्कार त्रस्त
समस्त वैरिवनितालब्धस्तुतिर्भूपतिः ॥ २ ॥

अर्थ–हे नरकगति चुकविणारे गंगे, तुझ्या तीरीं वृक्षांच्या ढोलीमध्यें राहणारा पक्षी, किंवा तुझ्या जळामध्यें राहणारे मत्स्य अथवा कांसव हे जसे श्रेष्ठ आहेत, तसा दुसरे ठिकाणीं मदांध हत्तीच्या समुदायाचें जें संघट्टण त्यामध्यें होणाऱ्या घांटांच्या घणघणाट

शब्दानें भय पावलेल्या सर्व शत्रूंच्या स्त्रियांपासून प्राप्त झाली आहे स्तुति ज्यास असा राजाही श्रेष्ठ नाहीं.

उक्षापक्षी तुरगउरगःकोऽपि वा वारणो वा
वाराणस्यां जननमरण क्लेशदुःखासहिष्णुः ॥
नत्वन्यत्र प्रविरलरणत्किंकिणीक्काण मिश्रं
वारस्त्रीभिश्चमरमरुता वीजितो भूमिपालः ॥ ३ ॥

अर्थ—वाराणसी क्षेत्रांमध्यें राहणारा वृषभ, पक्षी, अश्व, सर्प अथवा हत्ती कोणीही असो, तो जन्ममरणरूप क्लेशदुःखांपासून मुक्त होतो, तसा दुसरे ठिकाणीं मंजूळ शब्द करणाऱ्या पायांतील ज्या घागऱ्या त्यांच्या शब्दानें मिश्र अशा चवरीच्या वाऱ्यानें वेश्या स्त्रियांनीं सेवन केलेला राजाही ( जन्म मरणापासून ) मुक्त होत नाहीं.

काकैर्निष्कुषितं श्वभिःकवलितं गोमायुलिर्लुंठितं
स्रोतोभिश्चलितं तटांबुलुलितं वीचीभिरांदोलितं ॥
दिव्यस्त्रीकरचारुचामरमरूसंवीज्यमानः कदा
द्रक्ष्येऽहं परमेश्वरि त्रिपथगे भागीरथि स्वं वपुः॥४॥

अर्थ—हे परमेश्वरी, त्रिमार्गगामिनि भागीरथी, ( तुझ्या तीरीं मरण पावतांच दिव्यदेही होऊन ) दिव्य स्त्रियांच्या हातांतील सुंदर ज्या चंवऱ्या त्यांच्या वाऱ्यानें सेवन केलेला असा मी; आपल्या मृतशरीरास, कावळ्यांनीं तोडलेलें, कुतऱ्यांनीं चावलेलें, कोल्ह्यांनीं लोळिवलेलें प्रवाहांनीं वाहविलेलें, कडेच्या थोड्या पाण्यानें हालविलेलें आणि लहरींनीं लेलकावलेलें ( आंदोळलेलें ) केव्हां बरें पाहीन !

अभिनवबिसवल्ली पादपद्मस्यविष्णोर्मदनमथनमौ लेमालतीपुष्पमाला ॥ जयतिजय पताका काप्य सौमोक्ष लक्ष्म्याः क्षपित कलिकलंका जान्हवीनः पुनातु ॥ ५ ॥

अर्थ—विष्णूच्या चरणकमलाची नवी मृणाल तंतूंची देठी, शिवाच्या मस्तकावरची जाईच्या फुलांची माळ, आणि मोक्षसंपत्तीची जणुं एक जयपताकाच अशी कलिसंबंधीं पापाचा नाश करणारी ही भागीरथी, आह्मांस पवित्र करो.

एतत्तालतमाल शालसरलव्यालोलवल्लीलता। छन्नंसूर्यकरप्रतापरहितं शंखेंदुकुंदोज्वलम् ॥ गंधर्वामर सिद्ध किन्नरवधुत्तुंगस्तनास्फालितं। स्नानाय प्रतिवासरं भवतु मे गांगजलं निर्मलं ॥ ६ ॥

अर्थ—तालवृक्ष, तमालवृक्ष, शालवृक्ष ( सागवान ) सरलवृक्ष ( देवदारु ) यावरून खालीं लोंबत असणाऱ्या ज्या वेली या वृक्षांच्या ढाळ्या त्यांनीं आच्छादन केलेलें, सूर्यकिरणाच्या तापानें रहित, शंख, चंद्र आणि कुंदपुष्प यांसारखें शुभ्रवर्ण, गंधर्व देव, सिद्ध आणि किन्नर यांच्या स्त्रियांचे जे उंच स्तन त्यांच्या आघातानें खळबळलेलें परंतु स्वच्छ असें जें हें गंगेचें जळ, तें प्रतिदिवशीं मला स्नान करावयास मिळो.

गंगावारि मनोहारि मुरारिचरणच्युतम् ॥ त्रिपुरारि शिरश्चारि पापहारि पुनातु माम् ॥ ७ ॥

अर्थ—मनोहर विष्णूच्या चरणापासून गळित झाले-

णें, महादेव [illegible] संचार करणारें आणि पापा-
चा नाश करणारें असें जें गंगेचें उदक तें मला पवित्र
करो.

पापापहारि दुरितारि तरंगधारि शैलप्रचारि गिरि
राजगुहा विदारि ॥ झंकारकारि हरिपादरजोपहा
रि गांगं पुनातु सततं शुभकारि वारि ॥ ८ ॥

अर्थ—पापाचा नाश करणारें, दुष्ट वासना घालवि
णारें, मोठमोठे तरंग धारण करणारें, वेगानें जा
असतां भ्रमरांसारखा झंकार शब्द करणारें, विष्णू
चरणरज घेऊन येणारें आणि कल्याणकारक असें
गंगेचें उदक, तें निरंतर आह्मांस पवित्र करो.

गंगाष्टकं पठति यः प्रयतः प्रभाते वाल्मीकिना
रचितं शुभदं मनुष्यः ॥ प्रक्षाल्य गात्र कलिकल
ष पंकमाशु मोक्षं लभेत्पतति नैवनरोभवाब्धौ ॥९

अर्थ—जो पुरुष एकाग्रचित्त होऊन वाल्मीकि ऋ
षीनें केलेल्या कल्याणकारक गंगाष्टकाचें प्रातःका
पठण करितो; तो पुरुष, देहास कलिसंबंधानें प्रा
झालेल्या पापकर्दमाचें तत्काळ क्षालन करून मो
पावतो, पुनः संसारसमुद्रांत कधींही पडत नाहीं.



# संगीत शुकचरित

अथवा

## शृंगारविभवपूर्वक वैराग्यविजय नाटक.

---

हें नाटक

**अनंत वामन बरवे**

याणीं तयार केलें.

---

मुंबईत

"तत्त्वविवेचक" छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

---

किंमत सहा आणे.

## विशेष सूचना.

---

सर्व नाटककार मंडळ्यांस या नाटकाचा प्रयोग कर-ण्यास मोकळीक ठेवलेली आहे.

# संगीत शुकचरित

अथवा

## शृंगारविभवपूर्वक वैराग्यविजय नाटक.



( "मुला सांग नृपती०" ही चाल. )

सदां आत्मसुखतृप्त या नियतकामा ॥ तुच्छ बघ विषय हे सर्व आह्मा ॥ सदां० ॥ ध्रु० ॥ ऐक तूं रे स्मरा ॥ आंवरी या शरा ॥ कासया श्रम वृथा घेसि तूं हे ॥ ओरडुनियां पिका शोषविसि कां मुखा ॥ हे स्त्रिये जाइं तूंही स्वधामा ॥ सदां आ० ॥ १ ॥

—अंक ३ रा. पान ४० वें.

# पुरवणी.

पुढें दिलेलीं पद्यें या नाटकांत जास्त घातलीं आहेत. तीं पुढें सांगितलेल्या ठिकाणीं वाचावीं.

---

( **पान ४०;** यांत रंभेचें भाषण, "महाराज, तारुण्याच्या भरांत आलेल्या०" अशा प्रकारचें आहे. त्या भाषणाचे ऐवजीं हें पद्य समजावें. )

"रंभा—महाराज—

( लावणी. "सोडासोडा जाऊंद्या म०" ही चाल. )

**पहा वसंतऋतु या वनीं ॥ बहार उडवीतो ॥ युवा युवतिजनमनें ॥ स्मरशरहत करितो ॥ १ ॥ या विकसित नवमंजरी ॥ भ्रमर सेवीती ॥ कामुकजणुं युवतिचा ॥ यौवनभर लुटिती ॥ २ ॥ मानिनी स्त्रिया स्वपतिशीं ॥ रुसुनि जरि बसती ॥ हा कोकिलरव ऐकुनी । झडकरि वश होती—"**

---

( **पान ४३;** यांत रंभेचें भाषण, "महाराज, मर्त्यस्त्रियांप्रमाणें मला०" अशा प्रकारचें आहे, त्या भाषणाचे ऐवजीं हें पद्य समजावें. )

"रंभा—महाराज,—

( "तुम दुरसें बोलोबात" ही चाल. )

**कां वदतां यापरी ॥ मर्त्य अशा सामान्य स्त्रीसह करून माझी बरोबरी ॥ ध्रु० ॥ दिव्यस्त्री अप्सरा असें मी ॥ निर्मल बाह्याभ्यंतरीं ॥ हृदय दावितें पहा विदारुनि ॥ मृषा नसे ही वैखरी ॥ १ ॥**

( पान ३९; यांत शुकाचें भाषण, "पण हा काय चमत्कार बरें?" असें आहे; त्यांत या वाक्याच्या पुढें पुढील मजकुर जास्त वाचावा. )

"—मी पूर्वीं ज्यावेळीं या वनांत आलों त्यावेळीं—

( "जयश्रीरमणा भवभयह॰" ही चाल. )

जिकडे तिकडे तपोवनीं या पुण्याश्रम मज आढळले ॥
शिष्यजनांसह कुठें मुनींचे श्रवणीं संवादहि पडले ॥
करितां करितां श्रवण वाद ते हृदयीं बोधांकुर फुटले ॥
प्रबोध होतां होतां सहजच साक्षात्कारें मन धालें ॥ १ ॥

—परंतु आतां—"

---

( पान २७; यांत अप्सरांचें पद एकच आहे, त्याच्या ऐवजीं-किंवा त्याच्याबरोबर पाहिजे तर आणखीहि एक-म्हणण्याकरितां हें पुढील पद्य जास्त घातलें आहे. )

( "श्री रघुकुलनायका भव॰" ही चाल. )

जय सुरनरपालका शचीनायका असुरांतका पूर्व दिग्पति शतमखा ॥ जय ॥ पाकशासन वृत्रारि वज्र-पाणि श्रीहरि संवलित कीं अमरनिकरीं ॥ जय ॥ भव-च्चरणा करुनि नमन नृत्य तैसें मधुर गायन सिद्ध सेवे होय हा जन ॥ जय ॥ १ ॥

---

**चुकीची दुरुस्ती**-पहिल्या पानावरील पहिल्याच पद्यांत "निरुत्प्रेक्ष्यमहता" या पदाऐवजीं "अतुल कीं महंता" हें वाचावें. तसेंच शेवटच्या पानावरील शेवटच्या पद्यांत "धर्मनीति-शालीनता" या पदाऐवजीं "धर्मनीतितत्परता" हें वाचावें.

# प्रस्तावना.

---

मनोरंजन हा नाटकाचा उद्देश सुप्रसिद्धच आहे; आणि त्यांत अलीकडील संगीताच्या संमेलनानें तो उद्देश चांगलाच साधला जात असतो. तथापि अशी मनोरंजकता त्यांत असूनहि तें विशेष कांहीं बोधपर व्हावें, असा आणखी एक उद्देश त्यांत साधल्यास, हल्लीं **स्वीडन** देशांत आहे, असें ह्मणतात, त्याप्रमाणें आपल्याहि देशांतल्या नाटकगृहांवर "केवळ मनोरंजन नव्हे, तर सन्मार्गप्रवर्तन करण्याचेंहि हें स्थान होय," असें प्रतिष्ठित वचन लिहिण्याची सुंदर संधि येईल; तेव्हां असें मनांत आणून त्याप्रकारचा हा एक अल्प यत्न करून पाहिला आहे. यांत गीतनृत्यादि नाट्यगुणांच्या योजनेनें मनोरंजकता तर आहेच; तथापि यांतील मूळकथाभागांतच शुकाच्या रूपानें मूर्तिमंत आत्मसुख आणि रंभेच्या रूपानें मूर्तिमंत विषयसुख ह्यांच्या-चढाओढींत शेवटीं आत्मसुखाची योग्यता ज्यास्त आहे असें सिद्ध केलेलें असल्यामुळें, मनुष्याला, केवळ जरी नाहीं पण अवश्य तरी, तें आत्मसुखच स्पृहणीय असावें, आणि त्यानें आपल्या शाश्वत खऱ्या कल्याणाकरितां धर्मनीतिपर राहून अगत्यपूर्वक त्याच सुखाची प्राप्ति करून घ्यावी; असा यापासून एक विशेष प्रकारचा बोध वाचकांच्या किंवा प्रेक्षकांच्या अंतःकरणावर ठसेल अशी उमेद आहे.

या नाटकाची मूळ कथा पौराणिक आहे. तथापि निरनिराळ्या ठिकाणीं या कथेचें एकासएक न जुळतें स्वरूप आढळल्यामुळें एकाच विशेष पुराणग्रंथाचा आधार न घेतां नाट्यप्रसंगास साजेल त्या रीतीनें याचें स्वतंत्र संविधानक योजलें आहे; तथापि विचारसरणी मात्र देवीभागवताच्या प्रथम स्कंधांतील शेवटल्या सहा सात अध्यायांत जें शुकचरित आहे त्याच्या आधारानें ठेविली आहे.

या कथेसंबंधानें कांहीं पौराणिक माहिती रा. रा. **श्रीधर गणेश जिनसीवाले** एम्. ए. या विद्वान गृहस्थांनीं अगत्यपूर्वक आपला वेळ मोडून मला दिली, याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. तसेंच हें नाटक रचून तयार झाल्यावर रा. रा. **रावजी भवानराव पावगी** यांनीं तें मार्मिकपणानें तपासून पाहिलें याबद्दल त्यांचे मी आभार मानतों. शेवटीं हें छापून लोकांच्या पुढें ठेवतां येण्याच्या कामीं माझे मित्र रा. रा. **रंगनाथ महादेव केतकर** यांनीं साह्य केलें त्याबद्दल त्यांचे आभार मानून ही प्रस्तावना संपवितों.

मुंबई,
तारीख १ माहे जुलई
सन १८९१ इसवी.

**अनंत वामन बरवे.**

## जाहिरात.

---

**पारिभाषिक भूगोलज्ञान**—भूगोल शास्त्रासंबंधीं अनेक पारिभाषिक शब्दांच्या व्याख्या व त्यांजविषयीं इतरहि उपयुक्त आणि मनोरंजक सचित्र माहिती. पुस्तक मराठी विद्यार्थ्यांच्या फारच उपयोगीं आहे. किंमत सहा आणे, ट. ह. अर्धा आणा.

**चार पैशांत एक धंदा!**—(कोरींव चित्रपाट.) छापण्यासाठीं लांकडावर चित्रें कोरण्याच्या सचित्र माहितीचें पुस्तक. या पुस्तकाच्या आधारानें हा एक स्वतंत्र धंदा करतां येण्यासारखें काम शिकतां येतें. किंमत एक आणा. ट. ह. अर्धा आणा.

**वाचनमंदिर**—माझे 'कटाक्ष' पत्रांत आलेले बोधपर असून मौजेचे निबंध. किंमत चार आणे, ट. ह. अर्धा आणा.

**करमणूक**—'कटाक्ष' पत्रांतील विनोदपर चुटके, गमतीच्या कविता, मार्मिक लेख यांचा संग्रह या पुस्तकांत आहे. नांवाप्रमाणें हें खरोखरच करमणूक करतें. किंमत सात आणे, ट. ह. एक आणा.

**चित्रें**—पुस्तकांत छापतां येण्यासारखीं शिशाचीं व तांब्याचें पाणी चढविलेलीं अशीं तऱ्हेतऱ्हेचीं सुंदर चित्रें आमच्या पाशीं आहेत. ०॥- पाठवावा ह्मणजे कॅटलॉग पाठवूं.

**अनंत वामन बरवे,**
गिरगांव पोष्ट, मुंबई.

# संगीत शुकचरित

## अथवा

## शृंगारविभवपूर्वक वैराग्यविजय नाटक.

### मंगलाचरण.

( "सांब सुराभरणा" या चालीवर. )

श्रीभगवत्-चरणीं ॥ आदौ ॥ अभिवंदन करुनी ॥ अर्पितसें हा नव कुसुमांजलि ॥ भरुनि यथामति कविता-सुमनीं ॥ ध्रु० ॥ ज्याची विभु सत्ता ॥ अघटित ॥ विश्वघटनपटुता ॥ निरुत्प्रेक्ष्यमहता ॥ केवल ॥ अनुभवावगतता ॥ वस्तु-काल-दिक्-अप-रिच्छिन्नचि ॥ विश्वंभर जो पूर्ण षड्गुणी ॥ १ ॥ अनागतविधाता ॥ स्वयंभू ॥ स्थिरच्चरवस्तुगता॥ दुर्जनांसि शास्ता ॥ सज्जन-॥ परिपालनकर्ता ॥ कर्तुमकर्तुंसमर्थ जो प्रभु ॥ नटतो ॥ सर्ग-स्थिति-संहरणीं ॥ श्री० ॥ २ ॥

( "ऐसी होरी खिलाई" ही चाल. )

मंगल स्तवन प्रभूचें ॥ आरंभीं करूं निर्मल वाचें॥ ॥ ध्रु० ॥ यदिच्छेवांचुनि पर्ण न हाले ॥ यत्सत्तेनें विश्व नियमिलें ॥ चिन्मय रूप जयाचें ॥ हृदयस्थानां ध्याऊं अमुचे ॥ १ ॥ माला काव्य सु कुसुमग्रथिता ॥ अर्पूं ही त्या शांत अनंता ॥ अभिवंदन [illegible] ॥ करुनी मागूं शिव सर्वांचें ॥ २ ॥ यानंतर [illegible] ॥ पितरां ॥ स्मरुनी तैसा कविजन सारा ॥ अनुशा-सन शिष्टांचें ॥ घेऊं आशीर्वचन तयांचें ॥ ३ ॥

( दिंडी. )

अखिल विश्वाचा असे सूत्रधार ॥ सगुणनिर्गुण जो मूर्त-निराकार ॥ व्यापुनीयां स्थिरजंगमासि राहे ॥ तया श्रीशा हें स्वकृतिपुष्प वाहे ॥ १ ॥

**सूत्रधार**—अहाहा! भगवच्चिंतनासारखा चित्तास क्षणभर शांतिसुख देणारा सुकर आणि निर्मल असा अन्य व्यापार नाहीं. आह्मा विषयीजनांच्या मागें इतर प्रापंचिक व्यवसाय अनेक असल्यानें अशाच व्यापारांत नेहमीं काल घालविण्यास आह्माला सांपडत नाहीं. परंतु सर्वसंगपरित्याग करून नेहमीं यांतच दंग असणारे जे महात्मे सत्पुरुष, त्यांची एतद्विषयक सुखस्थिति काय वर्णन करावी!—

( "अष्टमूर्ति परम॰" ही चाल. )

धन्य धन्य ते योगीजन जे परमात्मीं रमती ॥ त्यांच्या निर्मल चरित-श्रवणें जन हे उद्धरती ॥ ध्रु० ॥ असुनि संसृतित्यक्त तसे ते महातपोवृत्ति ॥ परी आपल्या वैराग्यांतहि भाग्यवंत दिसती ॥ विश्रामति ते स्वस्थ कुठें ही भूशय्येवरती ॥ दिशा वसन, नभ वितान, विधु तो दीप, काय कमती ॥ कांतेसम ती रमवी त्यांना सदां स्वानुभूति ॥ अशा वैभवें निजानंदरत सदां तृप्त असती ॥ १ ॥

—असो, मला वाटतें, आतां चित्तरंजनाच्या निमित्तानें कां होईना, पण क्षणभर अशाच एखाद्या महात्म्यानें चरित्र गायन केलें, तरी देखील त्यापासून अंतःक-

रणास जो एक प्रकारचा बोधप्रद सुखानंदानुभव होईल, तो सुद्धां त्या भगवच्चिंतनानंदाहून कमीसा वाटणार नाहीं. (विचार करीत इकडे तिकडे फिरतो.)

. **नटी**---(पुढील पद्य ह्मणत नटी प्रवेश करते.)

("मनातळमळसी०" ही चाल.)

**हेतु हा चित्तीं ॥ कळविल्यें पतिस एकांतीं ॥**
**करून विनंति ॥ हेतु० ॥ ध्रु० ॥ दुःसह ऐशा या**
**ऋतुकालीं ॥ तळमळ किति अंगाची झाली ॥**
**पतिसह वाटतसे जलकेलि करूं सुखदा ती ॥ १ ॥**

**सूत्रधार**—(नटीस पाहून) वाहवा प्रिये, तूं इतक्यांत आलीस, फार चांगलें झालें. तुला आपला एक मनोदय कळविण्यासाठीं मी आतांच तिकडे येणार होतों.

**नटी**---(लाडानें) पण प्राणनाथ, मी देखील मनांत एक हेतु धरूनच आपणास विनंती करण्यासाठीं आल्यें आहें.

**सूत्रधार**—हं असें काय! तर मग अगोदर तुझाच हेतु कळूं दे.

**नटी**—ऐकावं—

("मनमोहन बजावत" ही चाल.)

**हा ऋतु ग्रीष्म कीं प्रखर ताप दे भारी ॥**
**शीतोपचार सुख घेति पहा नरनारी ॥ ध्रु० ॥**
**अति उष्ण धूलिमय कसा चालतो वारा ॥ रवि-**
**किरण तीव्र भूभाग रूक्ष करि सारा ॥ तळमळे**
**देह बहु सुटति घर्म-जल-धारा ॥ उत्साह अल्पहि**
**न राहि कसा व्यवहारा ॥ घेऊन करीं वाळयाचे ॥**

विंझणे ॥ चर्चून सुवासिक अंगा ॥ चंदनें ॥
टाकून देति जड वस्त्रें ॥ भूषणें ॥ व्यवसाय सो-
डुनी हीं जनवृंदें सारीं ॥ विहरती उष्ण या कालीं
जलमंदीरीं ॥ १ ॥ अति शुभ्र विरल पातळें स्त्रिया
नेसूनी ॥ कंचुकी फुलांची सुंदर वरि घालूनी ॥
भूषिती उरःस्थल-वेणि हार-गजऱ्यांनीं ॥ पतिमना
प्रफुल्लित करिति अशा थाटांनीं ॥—

**सूत्रधार**–( मध्येंच ) प्रिये, हें तर तूं सध्यांच्या ऋतूचें केवळ शृंगारिक असें तुमतें वर्णनच आरंभिलें आहेस. तुझा यांत हेतु काय आहे तो सांगशील कीं नाहीं ?

**नटी**—प्राणनाथ,—

—यापरी करुनि शृंगारा ॥ वाटतें ॥ उभयतां
जाउं गंगेला ॥ वाटतें ॥ मनसोक्त करूं जलकेलि ॥
वाटतें ॥—

**सूत्रधार**—छेछेछे, प्रिये, हा तुझा हेतु माझ्या सध्यांच्या मनोदयास अगदींच विपरीत आहे. अगे, माझ्या मनांत ह्यावेळीं एखाद्या महात्म्या सत्पुरुषाचें चरित्र गाऊन क्षणभर तज्जन्य पवित्र आणि शांत अशा आनंदाचा अनुभव घ्यावा असें आहे; तेव्हां त्या माझ्या मनोदयास ही तुझी इच्छा किती तरी प्रतिकूल ! छेछे, अगदीं असलें भाषण करूं नकोस.

**नटी**—पण प्राणनाथ, आपल्या त्याहि मनोदयास मी अनुकूल आहेंच. सांगावं आपण कोणत्या महात्म्याचं चरित्र गायन करणार तें. त्यांत देखील आपलं

मनोभावानं साह्य करण्यास मी तत्पर आहें. आपण त्या सत्पुरुषाचे गुणानुवाद गायन करीत करीतच गंगेवर जाऊं मग तर झालें ना? हें पहा प्राणनाथ, आजच्या गंगास्नानाचा आग्रह आपल्यास मी केवळ शृंगारिक हेतूनेंच करीत नाहीं, बरं कां! हा ज्येष्ठ महिना असून आज दहा दिवस गंगोत्सव चालला आहे, याचं आपणास विस्मरण झालं वाटतं? ऐकलं कां, माझा हेतु पुरविल्यास एकांत एक दोन गोष्टी साधणार आहेत—

—हो उदासीनता जाय ऋतूद्भव सारी ॥ दशहरा-
निमित्त स्नानपुण्य ये पदरीं ॥ २ ॥ हा ऋतु० ॥

**सूत्रधार**—शाबास प्रिये शाबास! येवेळीं तूं मला फार योग्य स्मरण दिलेंस. खरेंच, काय त्या गंगाजलाचें माहात्म्य सांगावें—

("आरती भुवनसुंदरा०" ही चाल.)

**खरें सौभाग्य मेदिनीचें ॥ महदैश्वर्य शंकराचें ॥
सुसारचि जणुं वेदान्ताचें ॥ सुकृत इंद्रादिदेवतांचें ॥
असें प्रतिरूपचि अमृताचें ॥ किती तरि विमल ॥ असें
बहु तरल ॥ कांतिनें धवल ॥ मलापह सलिल जान्ह-
वीचें ॥ होय भवमुक्तिप्रद साचें ॥ खरें सौ० ॥ १ ॥**

—चल तर प्रिये, तुझ्या हेतुप्रमाणें या दशहरानिमित्त आपण गंगास्नानास जाऊं.

**नटी**—पण प्राणनाथ, आपल्या मनोदयाप्रमाणं आपण कोण्या माहात्म्याचं चरित्र गायन करण्याचं योजलं आहे, तें नाहीं कळिवलं?

**सूत्रधार**—हें बघ—

( साकी. )

अयोनिसंभव जातज्ञानी पुत्र श्री व्यासाचा ॥
मूर्तिमंत जणुं विरक्ति, ऐशा श्री शुकयोगींद्राचा ॥
वर्णू इतिहास ॥ साधन सत्पथगमनास ॥ १ ॥

( जातात. )

---

# अंक पहिला.

## प्रवेश १ ला.

( खालीं गंगा प्रवाह वाहत असून अंतरिक्षांत विमानामध्यें बसून येत असलेल्या **देवकन्या** दृष्टीस पडतात. )

**सर्वजणी**—( मिळून म्हणतात. )—

( "उद्यां बघ जातें, नृपसिंहास०" हा चाल )

**नमूं तुज गंगे ॥ दर्शनें त्रितापचि भंगे ॥ ध्रु० ॥ श्रीपदपंकजमृणालि, विमले ॥ शिवमौलिस्थित मालति माले ॥ कुंदेंदुस्फटिकासम धवले ॥ प्रचुरतरंगे ॥ दर्शनें ० ॥ १ ॥ वसुंधरास्तनहारचि गमसी ॥ मोक्षश्रीजयपताक दिससी ॥ विलासिनीपरि बहुतचि रमसी ॥ सागरसंगे ॥ दर्शनें ० ॥ २ ॥ जन्हुकन्यके त्रिलोकगमने ॥ तटस्थवृक्षच्छायावसने ॥ स्वभक्तसंसृतिपाशमोचने ॥ तूं शुभ्रांगे ॥ दर्श० ॥ ३ ॥**

—हे त्रैलोक्यपावनी जान्हवी, तुला आमचा प्रणाम असो.

**मालिनी**—अहाहा! या गंगाप्रवाहावरून वाहत

आल्या हा शीतल वारा, गडे, कितीतरी सुखकारक वाटतो आहे! ( वायूस संबोधून. )

( "वारं विसांपण बोलतसे०" हा चाल. )

खचितचि उपकृति या पवना ॥ होते तव ही दूर जनां ॥ ध्रु० ॥ चोरसि परिमळ पुष्पांचा ॥ दोषचि तुज अन्यायाचा ॥ नसतां प्रियविरहार्तांचा ॥ प्राणहि घेतां ये साचा ॥ परि गंगेच्या वाहुनियां तं शीतल अंबुकणा ॥ करविशि दूरस्थां स्नाना ॥ खचि० ॥ १ ॥

—सखे रोहिणी, हा चमत्कार पाहिलास का—

( "वीरभ्रमरा जन्मुनि०" ही चाल. )

स्वच्छ स्फटिका परी येत हा प्रवाह गगनांतुनी ॥ पाहुनी वाटतसे मन्मनीं ॥ ध्रु० ॥ भूलोकींचा जन बुडतो हा अघार्णवीं पाहुनी ॥ त्यांचा आर्तस्वर एकुनी ॥ तेव्हां त्यांच्या रक्षणकामीं सिद्धचि मग होउनी ॥ असें अणुं करी गमे स्वर्धुनी ॥ उत्तरीय निजवस्त्राचा कीं पदर काय सोडुनी ॥ दिला हा दिसतो मज लागुनी ॥ १ ॥

हंसिका—अग, गंगास्नानासाठीं जमलेला हा असंख्य नरनारींचा समुदाय पाहून या ठिकाणीं एक मौज दिसत आहे, ती आली का तुझ्या लक्षांत? पहा—

( साकी. )

गंगातीरीं धर्म काम जणुं युद्ध खेळती गमतें ॥
तरंग चंचल, नवयुवतींचे कटाक्ष, शस्त्रांसम ते ॥
होती दोघांला ॥ साधन विचित्र युद्धाला ॥ १ ॥

रोहिणी—सख्यांनो, मला वाटतं आपण या समुदा-

यापासून दूर एकांत स्थळ पाहून तिथें स्नानाला उतरूं. म्हणजे त्या ठिकाणीं आपणाला मनाप्रमाणें यथेच्छ जल-क्रीडा करावयास सांपडेल.

**सर्वजणी**—खरंच, जाऊं द्या आपलं विमान तिकडे.

( विमान हळु हळु खालीं उतरतें. )

**हंसिका**—गडे मालिनी हें बघ—

( "सोच समजय नादान०" हा चाल. )

***नवल मनीं वाटतें ॥ पाहुनियां कीं श्री गंगेतें ॥ ध्रु०॥ उदकापासुनी कमल निपजतें ॥ कमलापासुनि कधि नच जल तें ॥ नवल म० ॥ परि एथें बघ हें गंगाजल ॥ अच्युतपदकमलांतुनि येतें ॥ १ ॥—**

**मालिनी**—अग आणखी एक असंच नवल नाहीं तुझ्या ध्यानांत आलं. हें पहा—

**—उष्णानें जल शोषत असतें ॥ कधिंहि न शोषी जलचि जलातें ॥ नवल म० ॥ परि एथें हें बघ गंगाजल ॥ शोषितसे कीं भवसिंधूतें ॥ २ ॥**

---

*वरील पद्याच्या अर्थाचेंच पण निराळ्या चालीवर पुढील आणखी एक पद्य केलें आहे--

( " इतनाजो नाज हंसे समाला०" ही चाल. ठुंबरी. )

हें मोठें नवल वाटे ॥ सखयांनो मन्मनीं ॥ ध्रु० ॥ उदकीं तें कमल होतें ॥ जल कमलीं नुद्भवे ॥ परि गंगा वाहते ही ॥ पद कमला पासुनी ॥ १ ॥

\+ \+ \+ \+ \+ \+

उष्णानें उदक शोषे ॥ नच शोषी जल जला ॥ परि गंगा शोषिते ही ॥ भवसिंधूलागुनी ॥ २ ॥

**रोहिणी**—मला वाटतं आपलं विमान इथेंच स्थिर करून आपण खालीं उतरूं. कारण—

(दिंडी.)

**वृक्षपंक्ति प्रोत्तुंग उभयतीरीं ॥ असुनि निर्मल नच निम्न येथ वारी ॥ पुलिन रम्यहि एकांत अशा जागीं ॥ जलक्रीडा करुं चला मनाजोगी ॥ १ ॥**

**मालिनी**—वाहवा रोहिणी, तूं हें फारच उत्तम क्रीडास्थळ शोधून काढलेंस—

(साकी.)

**रम्य आणि एकांत स्थल हें जलमंदिर कीं भासे ॥**
**सभोंवतीं हा तरुगण परिजन सेवे सिद्ध उभासे ॥**
**वसनें त्यापाशीं ॥ ठेवुनि जाऊं स्नानासीं ॥ १ ॥**

(आंगावरील वस्त्रें काढीत काढीत निघून जातात.)

---

## प्रवेश २ रा.

### (स्थल--तेंच.)

**शुक**—(घाईनें प्रवेश करून) हं:, काय सांगावें !—

(साकी.)

**महर्षि कृष्ण द्वैपायन जे प्रसिद्ध वेदव्यास ॥**
**वेदांताचे वेत्ते कर्ते पुत्रमोह कीं त्यांस ॥**
**महदाश्चर्य असे ॥ दुस्तर माया भासतसे ॥ १ ॥**

—त्यांचा मला कोण आग्रह, कीं दारपरिग्रह करून आतां मीं संसारी व्हावें. पण काय त्या संसारांत सुख आहे ! अहो—

(" जानत प्रीत रीत रघुराई०" ही चाल.)

**तें सुख नाहीं कांहीं संसारीं ॥ अविनाशी,**

जन ज्याशीं अभिलाषी, सर्व दुःख-परिहारी ॥ ध्रु० ॥ आधि-व्याधि मना-शरिरातें ॥ नित्य पीडिती भारी ॥ आत्मसुख स्वरुपाची विस्मृति, वाढतसे स्त्रीसुतपरिवारीं ॥ तें सुख० ॥ १ ॥

—तेव्हां संसार संबंधीं अशी वस्तुस्थिति माहीत असल्यावर त्याविषयीं कोण आसक्तचित्त राहील बरें?—

( "उद्धवा शांतवन०" ही चाल. )

संसार दुःखमय असतां ॥ सेविल त्या कोण ज्ञाता ॥ ध्रु० ॥ मनुजता दुर्लभप्राप्ता ॥ व्यर्थाच्च हो विषयासक्ता ॥ या घोर अर्णवीं शिरतां ॥ वळि जन्म-मरण-आवर्ता ॥ मन पूर्ण मुमुक्षु बनतां ॥ तुच्छचि कीं त्या भववार्ता ॥ येऊनि श्रेष्ठ नर जन्मीं ॥ होऊनि शास्त्रविद् ज्ञानी ॥ सोडूनि मोक्ष-पथ मानी ॥ भवरोगीं जो सुख चित्ता ॥ त्या मूढ नराहुनि वाटे ॥ मजला ती श्रेष्ठचि पशुता ॥ १ ॥

—मनुष्यास हा देहसंबंध आहे तों पर्यंत त्याचे मागचा संसारबंध सुटावयाचा नाहीं असें ह्मणतात. त्याप्रमाणें मला संसारस्थिति यावयाचीच असेल, तर ती मग अशी येईना—

( "कितिरे निष्ठुर तूं अससी रामा०" ही चाल. )

सुखशांतिच मज बहु आवडते ॥ मला कलत्र असो ते ॥ दोघे सुत सत्य मनःसंयम ते ॥ होउंत कीं गमतें ॥ कन्या तैशी धन्य एक ती भूतदया व्हावी ॥ १ ॥ संसारस्थिति मजला हीच असावी ॥ याहुनि अन्य नसावी ॥ ध्रु० ॥

—पण माझी ही निरुपाधिक संसारस्थिति त्यांना कोठें मान्य आहे. असो, इच्छा त्यांची. आपण तर आतां आपल्या निश्चयाप्रमाणें सत्वर मार्गास लागावें. एथें फार वेळ राहिल्यास त्यांची स्वारी मला शोधीत ह्याहि ठिकाणीं येईल. चला तर—

( पिलु; धुमाळी. )

ब्रम्हपदीं सुविलीन ॥ होउं मन ॥ ध्रु० ॥
अनुभवतां तो सुखानंद कीं, ॥ संसृति संस्मृति होई पुन्हा आपणास कदापि न ॥ १ ॥ त्या आनंद जलांत बुडे मग ॥ इंद्रियवृत्ति समस्त कदां पुनरुत्थित होति न ॥ ब्रम्ह० ॥ २ ॥

( जाती. )



## प्रवेश ३ रा.

( स्थळ—तेंच; पात्रें—स्नानें आटोपून वस्त्रांतरें करीत असलेल्या देवकन्या पुनः दृष्टीस पडतात. )

हंसिका—गडे मालिनी, तूं क्षणभर तशीच ओलेती उभी रहा. कारण ह्यावेळीं तुझी सौंदर्यशोभा कांहीं विशेष खुलत आहे.

( श्लोक. )

सखि, धरुनि पहा तूं मुक्त केश स्वमुष्टीं ॥
उभि मुरडुनि किंचित् पाहसी वक्रदृष्टीं ॥
तव अवयव सारे स्पष्टवी आर्द्र वस्त्र ॥
दिससि उपशिलेंसें कामदेवें स्वशस्त्र ॥ १ ॥

**रोहिणी**—खरंच मालिनी, तुझ्या या यौवनोद्भव-सूचक शरीरकांतीला कोणाची दृष्ट देखील लागेल. याकरितां जरा त्या वृक्षाचे आड तरी उभी रहा.

**मालिनी**—पुरे पुरे स्तुतिपाठ बरं का रोहिणी बाई! (दचकल्यासारखें करून) पण हें ग काय? आतां इथून कोणी धांवत गेल्याचा भास झाला.

**रोहिणी**—अग हो. ह्मणूनच तुला एकीकडे होण्यास सांगितलं. या शेजारच्या तपोवनांतील तो पहा कोणी ऋषिपुत्र धांवत चालला आहे. तो पाहिलास का? वय लहानच आहे, तरी किती तेजस्वी दिसतो आहे पहा.

**हंसिका**—अग यांत नवल नाहीं—

(अंजनीगीत.)

**पुण्यशीलता सात्विकवृत्ति ॥ ब्रह्मज्ञानी सहज-स्फूर्ति॥ स्वयंप्रकाशित तेणें कांती ॥ असते या मुनिंची ॥ १ ॥**

**रोहिणी**—गडे पण आणखी ह्या बाजूनें हें ग कोण बरं येत आहे. मला वाटतं, पुढें धांवत गेलेल्या त्या ऋषिपुत्राचा हा पिता किंवा गुरु असावा. बिचारा चालतां चालतां किती थकला आहे पहा—

(दिंडी.)

**वहुतकष्टें पद एक एक टाकी ॥ करें कंपित हळु हळू यष्टि टेकी ॥ आर्द्र घर्मानें श्रमी फार झाला ॥ कोण न कळे तापसी वृद्ध आला ॥ १ ॥**

**हंसिका**—( निरखून पाहून ) अग तूं यांना ओळखलं नाहींस वाटतें. हे पराशरसुत कृष्णद्वैपायन श्रीवेद व्यास येत आहेत, समजलीस. यांची महामान्यता काय सांगावी—

( पृथ्वीवृत्त. )

**चतुर्मुख नसून हे असति कीं विधाते दुजे ॥**
**चतुर्भुज नहे परी हरिच सागरीं जो निजे ॥**
**त्रिनेत्र नसती खरे परि शिवा अशी योग्यता ॥**
**प्रसिद्ध भुवनत्रयीं ह्मणुनि या जगद्वंद्यता ॥ १ ॥**

**मालिनी**—तर मग आतां आपण अशा वेषानें ह्यांच्या दृष्टीस पडणें योग्य नाहीं. चला, त्या वृक्षवाटिकेमध्यें त्यांच्या दृष्टीआड होऊं. ( जातात. )

---

## प्रवेश ४ था.

**व्यासऋषि**—(मागें वर्णन केल्याप्रमाणें येतात.)—

( "पांडुनृपति जन०" ही चाल. )

***येइं येइं शुक कुमारा ॥ थांब फिरे माघारा ॥**
**जाउं नको कांतारा ॥ तप करावया ॥ १ ॥**

---

*वरील अर्थाचेंच पण दुसऱ्या वृत्तांत पुढील पद्य जास्त करून घातलें आहे.

( "जो जो जो जो रे" ही चाल. )

येरे ये बाळा ॥ थांब जरा ॥ एके फिर माघारा ॥ सोडुनियां मातें ॥ कांतारा ॥ जाउं नको सुकुमारा ॥ ध्रु०॥ दुष्कर बाळपणीं ॥ तपकर्म ॥ अतृप्त इंद्रियधर्म ॥ विषया वांछीती ॥ ते परम ॥ एके कथितों वर्म ॥ १ ॥ ह्मणून गार्हस्थ्या ॥ स्वीकारीं ॥ तदुक्त

कठिण तपःकर्म महा ॥ या वयांत तुजसि पहा ॥
इंद्रियगण तृप्त न हा ॥ विषयचिंतनीं ॥ २ ॥
पूर्ववयीं चंचल मन ॥ स्वाभाविक असत जाण ॥
शक्य न तें तपश्चरण ॥ होय त्यामुळें ॥ ३ ॥
पूर्वाश्रम करुनि सांग ॥ नंतर तपःसौख्य भोग ॥
सर्वसंगपरित्याग ॥ होय उक्त तो ॥ ४ ॥
ह्मणुनि होइं संसारीं ॥ वच माझें अवधारीं ॥
होशिल मग अधिकारी ॥ ब्रह्मपदाला ॥ ५ ॥—

—( सभोंवतीं पाहून )—अरे पण, मी हें आतां कोणाशीं बोलतों आहें. मला येथें आतां उत्तर कोण देणार?—

—गेला गेलाचि दूर ॥ माझा तो शुककुमार ॥
वाहवील अश्रुपूर ॥ शोकवेग हा ॥ ६ ॥ अश्रुपूर्ण
नेत्र ह्मणुन ॥ चालतां पदस्खलन ॥ स्पष्ट तसा
शब्द ये न ॥ कंठ दाटला ॥ ७ ॥ आश्रम तो शून्य
आतां ॥ तपोवनीं उदासता ॥ भासवील मम
चित्ता ॥ पुत्रविरह हा ॥ ८ ॥

—( डोळे पुसून )—हे गगनचुंबित वृक्षांनो, माझा शुक तुह्माला कोठें दिसतो आहे काय? सांगा बरें. काय? तुम्ही मला उत्तर देत नाहीं? इतकेंच नव्हे, तर उलटें या आपल्या विकसित पुष्पांच्या मिषानें मला पुत्रविरह-

---

कर्म करीं ॥ होशिल मोक्षातें ॥ अधिकारी ॥ माझें तूंच अवधारीं ॥ २ ॥

\+ \+ \+ \+ \+ \+

—गेला गेला तो ॥ अति दूर ॥ शुक माझा सुकुमार ॥ नयनीं लोटति हे ॥ जलपूर ॥ दाटे कंठहि फार ॥ येरे ये बाळा ॥ ३ ॥

दुःखिताला पाहून हंसतां आहां काय? थांबा, तुमच्या या औद्धत्याबद्दल योग्य शासन ह्मणून हा निदाघकाल तुह्मांस लौकरच पुष्पपर्णविहीन असें अगदीं शुष्क करून टाकील, समजलां! पण असा मी यांना कां बरें उपहासास्पद वाटतों?—

( "दैवयोग दुर्विपाक०" ही चाल. )

**श्री शिववरदानलब्ध पुत्र शुक मला ॥ वृद्धपणीं एकुलता एक जाहला ॥ पाहुनि कृतविद्य त्यास हेतु वाटला ॥ दारपरिग्रह करुनी वाढवो कुला ॥ परि विरक्त होउनि तो जाइ तपाला ॥ कां मग उपहासपात्र मानिती मला ॥ १ ॥**

( पडद्यांत शब्द होतो. )

( अंजनीगीत. )

**"अहा केवढें हें आश्चर्य ॥ निवृत्तिमार्गाचे आचार्य ॥ श्री मद्व्यासच ते मुनिवर्य ॥ मायावश झाले ॥ १ ॥"**

**व्यास०**—( नीट ऐकून )—काय, ह्या कोणी देवकन्या मलाच लक्षून असें आश्चर्य करीत निघून गेल्या! ( विचार करून ) अथवा त्यांचें बोलणें यथार्थच आहे, कारण—

( साकी. )

**दुस्तर मायासिंधुपतित जन यांचें हो उद्धरण ॥
म्हणूनि रचिलीं शास्त्रें मी परि त्या मायेला शरण॥
सांप्रत मीच पहा ॥ होउनि कैसा मूढ महा ॥ १ ॥**

—इतरांनीं उपहास करण्यासारखेंच माझें ह्या वेळीं वर्तन झालें खरें.—

( दिंडी. )

*पुत्रमोहें उद्भवे भ्रांति चित्तीं ॥ विलय पावे त्यामुळें मनःशांती ॥ सुखस्थितिचा तो आत्म-बोध गेला ॥ होय कारण हें महत् प्रमादाला ॥ १ ॥

( एक शिष्य येतो. )

शिष्य—गुरुवर्य ?

व्यास—बाळा जैमिनी, तुमचा सहाध्यायी शुक, शेवटीं माझें न ऐकतां तपाला निघून गेला !

शिष्य—महाराज, आश्रमामध्यें नारदऋषि आले असून आपल्यास भेटावें असा त्यांचा हेतु आहे.

व्यास—वः, अशावेळीं त्यांच्या सारख्या आप्त पुरुषांचें दर्शन इष्टच आहे.—

( हरिणीवृत्त. )

†व्यसनसमयीं किंवा कांहीं महत्सुख लाभतां ॥

---

* वरील पद्याच्या अर्थाचेंच पण निराळ्या चालीवर आणखी एक पद्य पुढें दिलें आहे—

(" खंजरे खंजरे, बेदाद हूवे० " ही चाल. गझल.)

केवढा केवढा प्रमाद झाला ॥ अहा हा ॥ प्रमाद० ॥ ध्रु० ॥ पुत्रमोहें भ्रमलों मी ॥ तेणें कैसा आत्मज्ञानस्थितिचा हा ॥ प्रबोध गेला ॥ केवढा केवढा प्रमाद झाला ॥ १ ॥

† वरील अर्थाचेंच पण वेगळ्या चालीवर पुढील एक पद्य जास्त घातलें आहे.

("निजरूपीं जगदाकृतिभासा," ही चाल.)

सुखसमयीं अथवा दुःखान्तीं ॥ प्रियजन ते जरि येउनि भेटती ॥ सुखानुभव तरी द्विगुणित येई ॥ दुःख उणें कीं वाटे होई ॥ सुख० ॥ १ ॥

सुत्हृद् अथवा आप्त प्रेमें अगत्यचि भेटतां ॥ व्यसन तरि तें झालें कांहीं सुवाह्य गमे असें ॥ द्विगुणित तसा सौख्यानंद प्रतीतिस येतसे॥ १ ॥

—चला तर. ( जातात—पडदा पडतो. )

---

## अंक दुसरा.

### प्रवेश १ ला.

( स्थळ; **व्यास** ऋषींचा आश्रम.—पात्रें; **वैशंपायन** व **जैमिनी** हे दोघे शिष्य येतात. )

**वैशंपायन**—जैमिनी, तूं कांहीं म्हण; परंतु शुकाची योग्यता खचित विशेष दिसते यांत संशय नाहीं. या तपोवनांतील तपःस्वाध्यायनिरत असे महान् महान् अनेक ऋषि आपल्या या आश्रमांत गुरूंकडे नेहमीं येतात ते मी पाहतों, परंतु अशा अल्पवयांत याच्या सारखी कडकडीत संसारविरक्ति आणि त्यामुळें स्वाभाविक निस्पृहता आपल्याला तर कोणांतच आढळली नाहीं.

**जैमिनी**—त्याला पाहिजे तर मोठा निस्पृह असें मी म्हणेन; पण त्याच्या त्या विरक्तपणाची कांहीं मी इतक्यांतच प्रशंसा करणार नाहीं. हें बघ वैशंपायना, अरे अशा तपोवनांत, केव्हांहि किंचित् सुद्धां अनुराग उत्पन्न होणार नाहीं अशाच पदार्थांनीं पूर्ण असलेल्या या

आश्रमामध्यें, आणि गुरु व्यासासारख्यांच्या पुत्राचे ठिकाणीं असें कांहीं स्वाभाविक वैराग्य आढळणें यांत नवल नाहीं. पण आतांच गुरूपाशीं नारद ऋषि सांगून गेले आहेत, त्याप्रमाणें इंद्राकडून रंभा जाऊन त्याच्या वैराग्याची जेव्हां परीक्षा होईल, तेव्हां जर तो आपल्या या विरक्तवृत्ती-पासून किंचित्‌हि ढळला नाहीं, तर मात्र मी त्याला खरा वैराग्यशाली म्हणेन. असें पहा—

( श्लोक. )

**जों संमोहक वस्तुदर्शन कधीं नाहींच तें जाहलें ॥**
**किंवा अल्पवयें न चित्त विषयीं प्रक्षुब्धता पावलें ॥**
**तोंपर्यंत विरक्त रक्त ह्मणणें विश्वास्य व्हावें कसें ॥**
**कोणातें न परीक्षितां भरंवसा त्याचा कसा येतसे॥१॥**

—आणि बाबा, अशा गोष्टींत परीक्षेची वेळ आली म्हणजे विश्वामित्र, पराशर, फार काय सांगूं, आपले प्रत्यक्ष व्यास गुरु यांच्या सारख्या वृद्ध वृद्ध गुरुजनांची-हि त्रेधा उडालेली आहे, तेथें मग शुकासारख्या तरुण मुलाची कथा काय!

**वैशंपायन**—( धिःकारपूर्वक )—अंः, जैमिनी हें तुला माहीत आहे? अरे—

( श्लोक. )

**अत्यल्प कुंभीं जल राहताहे ॥ परंतु कुंभोद्भव-कीर्ति पाहे॥ शोषीतसे सागर तो अशेष ॥ पित्या-हुनी पुत्र कधीं विशेष ॥ १ ॥**

—आणि अशा त्या अलौकिक पुत्रांतच मी त्या शुकाची, त्याच्या त्या अपूर्व धारणाशक्तीवरून आणि असाधारण निस्पृहतेवरून, गणना करतों.

**जैमिनी**—तो निस्पृह मात्र मोठा यांत संशय नाहीं! आतां वेदाध्ययन पूर्ण झालें आहे, तेव्हां गृहस्थाश्रम धारण करावा म्हणून गुरु त्याला उपदेश करीत असतां, संसारांत पडल्यानें मोक्षप्राप्तीस अशीं विघ्नें येतात, तशीं विघ्नें येतात वगैरे तो जेव्हां अनेक प्रकारें संसारस्थितीवर एकदेशीय दोषारोप करूं लागला, तेव्हां गुरूंनीं त्याला राजर्षि जनक राजाचें उदाहरण दिलें, व—

( श्लोक. )

**ठेवून सर्वत्र समानबुद्धि ॥ निष्काम्य कर्मे करि चित्त-शुद्धि ॥ शांतस्वभावें विचरे जगांत ॥ कांहीं नसे बाधक संसृतींत ॥ १ ॥**

—अशा प्रकारें संसारांत राहूनहि आत्मस्थितीचें विस्मरण होत नाहीं असें त्यास दाखविलें. त्यावेळीं त्यानें गुरूंच्या ह्या सांगण्याचा केवळ धिःकार करून त्या सुप्रसिद्ध विदेही जनकराजाला तर एकदम ढोंगीच ठरविलें! तो गुरूंना विचारूं लागला कीं—

( ओंव्या. )

**माता कन्या तशी भार्या ॥ भगिनी आणि कुलटा अनार्या ॥ अशा ज्या विविध स्त्रिया ॥ त्या तो मानी समान कीं? ॥ १ ॥ शत्रु मित्र आणि चोर ॥ तापसी तसे आप्त प्रियकर ॥ पुत्र बंधु यांना तो**

**नृपवर ॥ समदृष्टीच लेखी कीं? ॥ २ ॥ सुख दुःख**
**आणि शीतोष्ण ॥ क्षुधा तृषा तैशी जाण ॥ हीं**
**द्वंद्वें समसमान ॥ लेखीत तो आहे कीं? ॥ ३ ॥**
**कटु आणि आम्ल तिक्त ॥ मधुर तैसें लवणयुक्त ॥**
**यांना काय तो नृपनाथ ॥ एकरुचि मानी कीं ॥ ४ ॥**

—या प्रमाणें एकेक शंका घेऊन मग काय म्हणतो—

**ऐसी अभिन्नता असलियावरी ॥ मग तो राज्य**
**संसार काय करी ॥ भुक्त असून मुक्त संसारीं? ॥**
**हें तों अवघे ढोंग कीं! ॥ ५ ॥**

—आहे कीं नाहीं, त्याच्या वयोनुभवाला अगदीं अपूर्व अशी निस्पृहता ही!

**वैशंपायन**—जाऊं दे. आपणास हा वाद कशाला पाहिजे. तूर्त आपल्याला त्याचा सहवास मात्र अंतरला हें चांगलें झालें नाहीं. आणखी कांहीं दिवस तो आपाल्या सहाध्यायी मंडळींत असता ह्मणजे बरें होतें. त्याच्या तीव्रबुद्धीमुळें ईर्षेनें आपलेंही अध्ययन खचित लौकर झालें असतें—

**जैमिनि**—आणि गुरूंचेंहि मन हल्लींसारखें त्याच्या विरहव्यथेनें अस्वस्थ न होतें. आपल्याला संसारांतच घालण्याचा त्यांचा आग्रह पाहून शुक जेव्हां धनुष्यापासून सुटलेल्या तीराप्रमाणें तडक चालता झाला, तेव्हां तर गुरूंची काय अवस्था झाली होती ती तुला माहीत आहेच. त्याचवेळीं नारदऋषि आले आणि त्यांनीं चार समाधानाच्या गोष्टी सांगितल्या ह्मणून बरें झालें.

**वैशंपायन**—बरें चला. मला वाटतें, गुरूचें नित्य-कर्म आटोपलें असेल. याकरितां होमशाळेंत जाऊन पुढच्या अनुवाकांची संथा घेऊं, चला. (जातात.)

---

## प्रवेश २ रा.

( **स्थळ;** इंद्रलोक—एक दासी येते. )

**दासी**—( पडद्याकडे पाहून )—कायग संचारिके, इतक्या लगबगां कोणिकडे चाल्लीस? (ऐकलेंसें करून,) काय ह्मटलंस? बाईसाहेबांची स्वारी इकडे नंदनवनांत आली असून इंद्रमहाराजांना यावयास उशीर कां लागला हें पाहण्यासाठीं तुला त्यांनीं पाठिवलं आहे? तर मग आपल्यालाहि इथं कुठें जवळच असलं पाहिजे, कारण आपली केव्हां गरज लागेल याचा नेम नाहीं. (जाते.)

---

## प्रवेश ३ रा.

( **स्थळ;** नंदनवन—पात्रें **शची** व तिची दासी. )

**शची**—अग स्वारी कांहीं अजून आली नाहीं. तेंव्हां ती येईपर्यंत चल आपण त्या कारंजाकडे जाऊन क्षणभर तेथील हंसपक्ष्यांच्या क्रीडा पाहात उभ्या राहूं.

**दासी**—खरंच, मी देखील आपणास तेंच सुचविणार होतें. चलावं असं इकडून यावं.

( कारंजाकडे जातात—इतक्यांत इकडे **इंद्र** येतो. )

इंद्र—( शचीकडे पाहात आपल्याशीं )—

( साकी. )

सुगंधशीतल मंद मंद या नंदनवनस्थ वातें ॥
निवारिल हृत्ताप इतर परि उद्भविले नविनातें ॥
परंतु शांति तया ॥ प्रिया मम सिद्ध इथें द्याया ॥ १ ॥

—आणि अशा प्रकारच्या तापाची शांती इकडूनच व्हावयाची, कारण—

( "ब्राह्मण कन्या नव्हे" ही चाल. )

स्त्रीरूपी हें सरोवरचि कीं त्यासाठीं निर्मिलें ॥
असति जे तप्त मन्मथानलें ॥ भरलें आहे पूर्ण
खरें हें लावण्याच्या जलें ॥ त्यांत मुख कमलापरि
शोभलें ॥ त्या कमलाचे मृणाल जणुं कीं बाहुद्वय
जाहले ॥ नेत्र ते मीनापरि राहिले ॥ शिरःपुष्प-
समुदाय रूप या शोभत शैवालें ॥ स्तनद्वय चक्र-
वाक भासले ॥ शोभविती कटिपश्चाद्भागा नितंब
ते रेखले ॥ शिलातल तटस्थ जणुं जाहले ॥
विचित्र परि अतिरम्य सरोवर धात्यानें निर्मिलें ॥
धन्य ते ज्यांना हें लाधलें ॥ १ ॥

शची—( दासीस ) अग, इथंहि उभं राहून मला कंटाळाच आला. या करितां चल आपण जाऊन त्या पारिजातकाचीं फुलें वेंचूं. ( तसें करतात. )

इंद्र—( आपल्याशीं ) अरे, हिनं कांहीं आपल्याला अजून पाहिलं नाहीं. तेव्हां आपणहि असेंच पुढें न जातां विनोदार्थ त्याच पारिजाताच्या आड उभें राहवें व

कांहीं तरी मौजेनेंच तिच्या दृष्टीस पडावें, हें बरें. ( तसें करतो. )

**दासी**—बाई साहेब, आपण या फुलं वेंचण्याच्या श्रमानं फार थकलां आहां. या करितां ह्या शिलातलावर थोडी विश्रांति घ्यावी. ( शची त्याप्रमाणें करते, व दासी तिला वारा घालीत मागें उभी राहते. )

**इंद्र**—( आपल्याशीं ) मला वाटतें पुढें होण्यास ही संधी बरी आहे. ( हळूच दासीच्या हातचा पंखा घेऊन तिला मुकाट्यानें जाण्यास सांगतो व आपण वारा घालतां घालतां हातरुमालानें शचीच्या मुखावरील घाम पुसूं लागतो. दासी जाते. )

**शची**—( दासीच आहे अशा समजुतीनें झिडकारून ) हं ! कोण ग मेली चावट आहे ! नुसता वारा घालायचा तो —(मागं पाहून) आपली का स्वारी ? मग ठीकच. (उठते.)

**इंद्र**—

( " जमका अजब तडा० " ही चाल. )

**सखि पुरे पुरे उपचार ॥ पावलों सकल सत्कार ॥ ध्रु० ॥ सुप्रसन्न तव दृष्टिच ही गे झाली वंदनमाला ॥ हास्य सुमनसें सघर्म कुचयुग अर्घ्यांचि देती मजला ॥ सखि पुरे० ॥ १ ॥**

—प्रिये, काय चमत्कार आहे, पहा—

( " गड्यांनो कृष्ण ग० " ही चाल )

**सुंदर पदार्थसहवासें ॥ सकलां सुंदरता भासे ॥ ध्रु. ॥ या तव सुंदर वदनावरतीं ॥ घर्मबिंदु जे प्रस्फुट**

**दिसती ॥ हिमकणविलिखित जणुं ते गमती ॥**
**पत्रलेखना ऐसे ॥ प्रिये गे ॥ सकलां० ॥ १ ॥**

—असें आहे तरी आपण तें पुसूनच काढूं. ( तसें करतो. )

**शची**—( झिडकारून ) पुरे पुरे! ही कशाची संपादणी चालली आहे ती मी समजलें बरं का. आपल्याला इतका वेळ यायला लागायचा होता, तर मग दुसऱ्याला इथं येऊन तिष्ठत बसायला कां सांगावं? ( रागाचा किंचित् आविर्भाव दाखविते. )

**इंद्र**—वाहवा!—

( साकी. )

**वरचेवरि मुरडुनी सांकोसशि पदर करानें सखये ॥**
**पुष्पगुच्छसम कुंचाग्र तेणें स्फुट-अस्फुटता तव ये॥**
**वाटे कीं वल्ली ॥ पवनें कंपित जणुं केली ॥ १ ॥**

—अरे व:, रागहि अलम्-वाटतें!

**शची**—मला आधीं उशीर लागण्याचं कारण सांगितलं पाहिजे.

**इंद्र**—एवढंच ना. हें पहा, नारद ऋषींची स्वारी ह्यावेळीं अकस्मात् आल्यानें मला इकडे येण्यास सहजच थोडा उशीर लागला.

**शची**—( प्रसन्न मुद्रेनें ) तर मग मी आपल्यावर उगीच रागावलें होत्यें त्याची क्षमा करावी.

**इंद्र**—अग मी तो तुझा राग आहे असें समजलोंच नाहीं.—कारण—

( "मनमोहन बजावत०" ही चाल. )

**मजवरी वृथा तूं प्रणयकोप जो केला ॥ नववधू-संगमोत्सवा परी प्रिय झाला ॥ ध्रु० ॥ जणुं दंत रोंविल्या परी कंप अधराला ॥ जणुं परिष्वंग-भीतिनें घर्म कीं सुटला ॥ लोटिलें दूर मुरडूनि ॥ तूं गडे ॥ पाहिलें वक्र दृष्टीनें ॥ मजकडे ॥ वाटलें सरळ बोलाया ॥ सांकडें ॥ अभिनय प्रिये या परी तुवां जो केला ॥ नववधूसंगमोत्सवा परी प्रिय झाला ॥ १ ॥**

—बरं पण आतां असंच कां उभं राह्यचं? चल तर त्या स्फटिकशिलेवर जाऊन बसूं. (तसें करतात.)

**शची**—नारदऋषींच्या या अकल्पित येण्याचें असेंच कांहीं कारण असेल; नाहीं बरें?

**इंद्र**—होय. शंकराच्या आशीर्वादानें व्यासऋषींना शुक नांवाचा एक मुलगा झाला आहे. तो उपजतच महा ब्रह्मनिष्ठ आणि अतिशय विरक्त असा असल्यामुळें, उपनयनोत्तर व्यासांच्या इच्छेप्रमाणें गृहस्थाश्रम न स्वीकारतां एकदम दूर अरण्यांत निघून जाऊन तेथें सांप्रत त्यानें घोर तप आरंभिलें आहे.

**शची**—मग? त्याच्या त्या तपाला विघ्न करण्याची मसलत आपणास देण्याकरितां बहुधा नारदऋषींचें आगमन झालें असेल, होय ना? त्यांचा हा उद्योगच आणि आपल्यालाहि पण ही खोडच आहे!

**इंद्र**—नारदऋषींची अशी इच्छा आहे कीं, कोणा तरी

चतुर आणि सुंदर अशा अप्सरेला पाठवून शुकाच्या वैराग्याची परीक्षा पहावी. त्याचें वैराग्य जर अचल आढळलें तर उत्तमच; नाहींतर तो संसारी होऊन व्यासऋषींचे हेतु तरी परिपूर्ण करील.

**शची**—नाहींतरी पण गडे, हा आपला काय परिपाठ आहे कोण जाणे. कोणीहि उत्तम तपोनिष्ठ आढळला कीं, त्याचा तपोभंग करण्याचा प्रयत्न आपल्याकडून आपला खचित व्हावयाचाच. मी ह्मणतें, सर्वच तपस्वी आपलें इंद्रपद कां इच्छीत असतात? मग ही खोड कां?

**इंद्र**—अग ब्रह्मपद प्राप्त करून घेणाऱ्या त्या तपोनिष्ठांना इंद्रपद ह्मणजे कःपदार्थ आहे. तेव्हां या प्रयत्नाचा हेतु कांहीं तसा नाहीं. परंतु हें बघ, या साऱ्या ब्रह्मांडामध्यें अनुपम असें जें अत्युच्च ब्रह्मपद तें प्राप्त करून घेणाऱ्याचे अंगीं तशीच कांहीं विशेष पात्रता असावी लागते. याकरितां ती पात्रता त्याजमध्यें आहे कीं नाहीं हें पाहण्यासाठीं त्याला अनेक प्रकारच्या वैषयिक मोहांत पाडण्याचे प्रयत्न करून पाहिले पाहिजेत. केवळ कोणाच्या घोर तपश्चरणावर विश्वासतां येत नाहीं. कारण विश्वामित्रासारखे तसे हट्टी तपोनिष्ठहि अनधिकारी आढळत नाहींत असें नाहीं. अशा अनधिकाऱ्यांनीं विनाकारण तपोनुष्ठानांत देहास कष्ट देण्यापेक्षां प्रपंचमार्ग स्वीकारावा तो काय बरें वाईट आहे.

**शची**—मला वाटतें ही आतांची कामगिरी त्या

विश्वामित्राला वश करून आणणाऱ्या मेनकेलाच सांगायची असेल.

**इंद्र**—पहावें; बहुधां सात अप्सरांपैकीं तीच पत्करील असें वाटतें.

**शची**—मग त्यांना इथेंच बोलावून आणाव्या. म्हणजे मीहि पाहीन कोण ही प्रतिज्ञा करते ती.

**इंद्र**—बरें आहे, तुला प्रिय वाटेल तसें. (पडद्याकडे पाहून) कोण आहे, संचारिके, जा अप्सरांना इकडे घेऊन ये.

(अप्सरा नाचत येतात. कांहीं वेळ नाच झाल्यावर पुढील पद्य म्हणून जयजयकार करतात.)

("जो कमलनयन कमलवद०" ही चाल.)

**जय सकल अमरमुकुटघृष्टचरण शतमखा ॥ दानवांतका भुवनपालका शचीरमण शत० ॥ ध्रु० ॥ यद्वज्रायुधभीतिनें भूधर कंपित होती ॥ त्या महेंद्र-पद-सेवनीं सादर दासी ह्या ॥ जय सकल अम० ॥ १ ॥**

**इंद्र**—अप्सरांनो, आज नित्याप्रमाणें क्षणभर तुमच्या केवळ नृत्यगायनाचा आनंद अनुभवूनच तुह्मास निरोप द्यावयाचा नाहीं. तर तुह्माला एक महत्वाचें कार्य सांगून तें प्रतिज्ञेपूर्वक सिद्धीस नेण्याचें तुह्मांपैकीं कोण पत्करील हें पहावयाचें आहे.

**सर्वजणी**—महाराज, ह्या दासी आपल्या सेवेंत सादर आहेतच; आज्ञा व्हावी.

इंद्र—हें पहा—

( साकी. )

धिःकारुनि संसारस्थिति तो शुक पुत्र व्या-
साचा ॥ करीतसे अति दुष्कर तप परि त्याच्या
हेतु पित्याचा ॥ सोडुनि तप तेणें ॥ तूर्त गृहस्थाश्रम घेणें ॥ १ ॥

—तेव्हां तुह्मांपैकीं कोणी तरी जाऊन त्याला वश करून घेऊन आलें पाहिजे.

सर्वजणी—महाराज,—मग यांत आह्मास कठीण तें काय आहे?

( "आज शाम मोहननें बासरी०" ही चाल. )

भ्रू धनुष्य वक्र करुनि नयन बाण फेंकितां ॥
रतिविलास हावभाव नृत्यगीत दावितां ॥
एकवार विषयपाश या परि हे पसरितां ॥
वश न होय कोण असा त्रिभुवनांत मानितां ॥ १ ॥

—आणखी असें पहा—

( सवाई. )

दृश्य नसूनहि वेधितसों मन बाणबळें न
गुणेंचि नराचें ॥ ख्यात अपूर्व धनुर्धरता किती
चित्रचरित्र पहा अबलांचें ॥ प्रेमळ भाषण
सस्मित वीक्षण दर्शन अल्पचि कीं वशतेचें ॥
दाखवितां जरि आमिष हें तरि लुब्धचि होत
जगत्त्रय साचें ॥ १ ॥

शची—अग तुमचें हें आत्मश्लाघेचें भाषण सामान्य

जनांसंबंधानें यथार्थ असेल. पण शुकाची योग्यता मात्र तुह्मी तशी समजूं नका.

**सर्वजणी**—बाईसाहेब—

( चामर वृत्त. दादरा. )

**रम्य आणि मोहकशा विषयरूप काननीं ॥**
**मन्मथ तो व्याध पसरि वागुराच कामिनी ॥**
**लुब्धपणें नरविहंग अचुक त्यांत येउनी ॥**
**पडति जसें भ्रमर पहा कमलकोशबंधनीं ॥ १ ॥**

**इंद्र**—अप्सरांनो, शुकाच्या तपश्चरणाचें वर्णन नारदऋषींनीं जें मजपाशीं केलें आहे त्याचें सार मी थोडक्यांत तुह्माला सांगतों, तें ऐका, म्हणजे त्याची योग्यता तुमच्या लक्षांत येईल.

( दिंडी. )

**विवेकाचें बनवून तपस्थान ॥ विरक्तीचें तेसेंच पर्णसदन ॥ निश्चयासन दृढ तेथ मांडुनीयां ॥ कठिण करितो शुक अशी तपश्चर्या ॥ १ ॥**

—तेव्हां अशा महान् अधिकारी तपोनिष्ठाला वश करून आणण्याचें काम तुह्माला वाटत आहे तसें खचित सोपें नाहीं.

**मेनका**—( पुढें येऊन ) महाराज, साठसहस्त्रवर्षें केवळ लोहपिष्ट भक्षण करून राहिलेल्या वयस्क अशा त्या विश्वामित्राला सुद्धां जिनें आपल्या विषयपाशांत सहज बद्ध करून आणिला, त्या मजपुढें या तरुण मुलाची प्रौढि कशाला पाहिजे!—अहो,

( "गोरेबदनपर शामा०" ही चाल. )

**नाहीं युवतिचें दर्शन तोंवरि ॥ सुचत शास्त्र आणि वेदांत सारा ॥ ध्रु० ॥ परि ती आलिंगनीं सिद्ध विलासिनी ॥ होतां उरत नाहीं धैर्यास थारा ॥ नाहीं यु० ॥ १ ॥**

—ऐका, मीच प्रतिज्ञा करत्यें.

( विबुधप्रियावृत्त. )

**आणितें वश निश्चयें करुनी शुकाप्रति मी पहा॥**
**निग्रही अथवा असो मुनि सत्तपोबल तो महा ॥**
**योजुनी रतिसौख्य आमिष पाश हें परिरंभण ॥**
**टाकितें विषय-प्रलोभन-पंजरीं मग बांधुन ॥ १ ॥**

**शची**—अहो मेनकाबाई, आपण पराक्रमी तशा आहांत यांत संशय नाहींच ह्मणा; पण आपल्या जवळ क्रीडापक्षी होऊन राहणाऱ्या त्या पक्षिविशेष शुकाप्रमाणें हा शुकमुनि आपल्या आमिषास भुलणारा, पाशबद्ध होणारा, किंवा लोभानें पिंजऱ्यांत सांपडणारा नाहीं हें लक्षांत ठेवा. हा अयोनिसंभव, उपजत वैराग्यशील, असा व्यास ऋषींचा पुत्र आहे बरं का? नाहीं तर अभिमानाच्या तोऱ्यांत आपण ही प्रतिज्ञा करून केवढें महत्कार्य पत्करलें आहे याचें विस्मरण होईल, ह्मणून सांगत्यें.

**मेनका**—बाईसाहेब, कार्याचें महत्व ओळखूनच मीं प्रतिज्ञा केली आहे.—

( "आले वनमाळी० " ही चाल )

**एकवार निश्चय हा केला तो अचल असे ॥**
**नेइन मी सिद्धिस तो संशय मज कांहीं नसे ॥**

**प्रतिज्ञा जी केली तिला युष्मत्पद साक्ष असे ॥**
**तपोवनास जातें मी ऋषिकुमार जेथ वसे ॥ १ ॥**

—परंतु महाराजापाशीं एक मागणें आहे.

**इंद्र**—काय तें?

**मेनका**—हें पहा,

( " तकदीर हमारी० " ही चाल. )

**सांप्रत हा ग्रीष्मऋतु प्रिय न आमुतें ॥ कारण कीं शांत असति मदनचेष्टितें ॥ ह्मणुनि साह्य व्हावें ऋतुराज वसंतें ॥ कामसखा घेउनि मज, हेंचि मागतें ॥ १ ॥**

इंद्र—फार उत्तम आहे. तुझ्या इच्छेप्रमाणें वसंत आणि काम हे उभयतां तुझ्या साह्यास असतील.

**रंभा**—अहाहा!—

( " शिवलि वरें झालें,० " ही चाल. )

**वसंत मन्मथ सहाय असतां ॥ प्रतिज्ञेस मम खचित सिद्धता ॥ उरली नाहीं कांहीं कठिणता ॥ सिद्ध पहा झालें॥ आतां॥ करिन शुकाचा तपोभंग हें धैर्य मला आलें ॥ १ ॥ शृंगारील तपोवन माधव ॥ करील मन्मथविकार-उद्भव ॥ सहज तपाचा होय पराभव ॥ सिद्ध पहा० ॥ २ ॥**

इंद्र—बरें, तुह्मा सर्वांस आतां जावयास आज्ञा आहे.

**सर्वजणी**—( मुजरा करून पुढील पद ह्मणत निघून जातात. )

( " नमिति गजवद० " ही चाल. )

**नमनशचीरमणचरणकमला ॥ ध्रु० ॥ अदितिजें प्रणमित जें तापद असुरकुला ॥ वंद्य परम सकलां नमनश० ॥ १ ॥**

( पडदा पडतो. )

---

## अंक तिसरा.

### प्रवेश १ ला.

स्थळ—तपोवन. पात्रें—वसंत आणि मदन.

( दोघे विमानांतून उतरतात. )

**मदन**—सख्या वसंता, देवेंद्राच्या आज्ञेप्रमाणें आपण या तपोवनांत तर आलों. सांप्रत या निदाघकालामुळें येथील ह्या शुष्क वृक्षपंक्ति देखील कशा महा तपोनिष्ठ ऋषींप्रमाणेंच भासत आहेत त्या पाहिल्यास ना?—

( श्लोक. )

**मोठ्या विस्तृत ह्या जटाच जणुं कीं शाखा तयांच्या शिरीं ॥ वातें उद्धृत धूलि त्यांवर दिसे ती भस्मलेपा परी ॥ जो हा उच्छल चक्रवात उसळे ती होम धूमावलि ॥ नोहे हा तरुवृंद कीं तपकरी ही तापसी मंडळी ॥ १ ॥**

—असो, आतां मेनका ह्या ठिकाणीं येऊन पोहोंचण्या-

पूर्वी तिच्या हेतू प्रमाणें तुला हें वन शृंगारून ठेविलें पाहिजे.

**वसंत**—फार उत्तम आहे; मित्रा मदना, मी आपल्या प्रभावानें या तपोवनाचें उपवन कसें एका क्षणांत करून टाकतों तें पहा—

(पुढील पद्यांत वर्णन आहे त्याप्रमाणें एकेक देखावा बदलत जातो.)

( अंजनी गीत. )

**जीर्ण पर्ण तरु टाकुनि देती ॥ रसाल नूतन धारण करिती ॥ कोमल किसलय त्यांना फुटती ॥ कलिका पुष्पांच्या ॥ १ ॥ मधुपानास्तव मधुकरपंक्ति ॥ बघ गुंजारव करितचि येती ॥ कोकिल तैसें मधुर कूजती ॥ नृत्य करिति केकी ॥ २ ॥ पुष्प-मंजरी हळुहळु फुलती ॥ यथेच्छ त्यांना मधुप भोगिती ॥ सर्वेचि त्यांतें सोडुनि जाती ॥ मधप कृतिच अशी ॥ ३ ॥ शीतल परिमल युक्त असतो ॥ मंदमंद किती पवन वाहतो ॥ भूमिभाग हा प्रसन्न दिसतो ॥ सुखवी तो सकलां ॥ ४ ॥ पुष्पित सुफलित वन हें झालें ॥ सुस्वर पक्षिरवें गजबजलें ॥ तपोवन-श्रीचें या नटलें ॥ शरीर सौंदर्यें ॥ ५ ॥**

**मदन**—(वसंताची पाठ थोपटून)—वाहवा वसंता, शाबास, काय तुझा प्रभाव सांगावा, एका क्षणांत या तपोवनामध्यें काय तूं चमत्कार करून दिलास पहा—

( श्लोक. )

**होते तपस्व्यांसम वृक्ष शांतसे ॥ प्रापंचिकाच्या**

**परि थाटले कसे ॥ झाले अकस्मात् बघ सर्व पुष्पित ॥ पक्षिस्वरें नादित कीं तपश्च्युत ॥ १ ॥**

**वसंत**—तें असो, पण मित्रा मदना ही तुझी त्रैलोक्यविजयी मूर्ति या ठिकाणीं आली आहे म्हणून ही वनश्री राजोपचारांनीं तुझें स्वागत करीत आहे त्याचा स्वीकार कर. पहा—

( श्लोक. )

**शाखा लहान नवपल्लवयुक्त ऐशा ॥**
**वातप्रकंपित पहा चवऱ्याच खाशा ॥**
**सत्कारगीत तुज कोकिल भृंग गाती ॥**
**त्वत्स्वागतोत्सव असा मदना करीती ॥ १ ॥**

**मदन**—अरे, यांत नुसता सत्कारच नाहीं झाला. तर मला आपल्या पराक्रमास साधनीभूत अशी कांहीं सामुग्री देऊन वनश्रीनें मजवर यापेक्षां मोठा अनुग्रहहि केला आहे—

( साकी. )

**भृंगकोकिलस्वर सारे जणुं मंत्र स्मरसंचारी ॥**
**पुष्पपरागविभूतिच ऐशी वशीकरणसामुग्री ॥**
**मजला दिधली हे । आतां प्रभाव मम पाहे ॥ १ ॥**

( दिंडी. )

**असो मोठा निग्रही शुद्ध शांत ॥**
**महातापस वैराग्यनिष्ठ दांत ॥**
**चेतवींनचि कामाग्नि तयाठायीं ॥**
**अवश मातें स्मरविमुख असा नाहीं ॥ १ ॥**

**वसंत**—मित्रा, तुझें सामर्थ्यच तसें आहे.—

( सवाई किंवा "स्फटिकाचे हे पद०" ही चाल. )

**पुष्पशरासन सायक पुष्पहि, आयुधेंचि तव कोमल ऐसीं ॥ सैन्य सहाय तुला अबलाजन, मंत्रि चंद्र जड वैर शिवासीं ॥ त्यांतुनि तूं तनुहीन असूनहि, थोर कीर्ति परि गाजवितोसी ॥ केवळ सत्वबळें आपुल्या बघ, तूं अजिंक भुवनत्रयिं होसी ॥ १ ॥**

(पडद्याकडे पाहून)—मित्रा, ती पहा मेनका, उत्तम प्रकारचा थाटमाट करून त्या शुक ऋषीचे पर्णकुटिके-शेजारींच विमानांतून उतरत आहे—

("प्रियेविण मजला कां०" ही चाल. )

**शृंगारायुधसज्ज बनूनी ॥ चमकत उतरे जणुं सौदामिनी ॥ ध्रु०॥ दिव्यांबरावृत ॥ वस्त्रालंकृत ॥ लेपनचर्चित ॥ कुसुमें भूषित ॥ येत [illegible] स्वर्गांतुनि ॥ शृंगारा० ॥ १ ॥**

**मदन**—चला तर आ[illegible] [illegible]. सोहास [illegible]थंच अवळ असलें पाहिजे.

**वसंत**—ठीक आहे, [illegible] (जातात.)



## प्रवेश २ रा.

**स्थळ—तेंच.**

**मेनका**—( सचिंत मुद्रेनें हळु हळु येते. )—

( "मन बैरागी मोरारे०" ही चाल. )

**किति साशंकित मन होतें ॥ जातें जरि वश शुका कराया ॥ ध्रु० ॥ आनंदोत्सव चित्तीं असावा ॥**

**मंगल रव तो श्रवणीं यावा ॥ शुभवस्तुहि कीं दृष्टि पडावी ॥ हीं जयचिन्हें होतिं न मातें ॥ कितिसा० ॥ १ ॥**

—आणखीहि असें झालें आहे कीं,—

( बंजारा. )

**पण सत्य कराया जाई ॥ उत्साह मनासि न कांहीं ॥ ध्रु० ॥ सुखकर या प्रातःसमयीं ॥ ह्या जीवमात्र निज हृदयीं ॥ किति हर्षसमन्वित होई ॥ परि अशा हर्ष-उत्साहीं ॥ मन्मन हें अविकृत पाहीं ॥ १ ॥**

—मी देवेंद्रापाशीं प्रतिज्ञा करून निघाल्याप्रमाणें त्या शुकमुनीस मला वश करून नेतां येणार नाहीं काय? त्याचें वैराग्य इतकें लोकोत्तर अचल असेल काय?—अथवा एखादें महत्कार्य प्रतिज्ञापूर्वक हातीं घेतलें ह्मणजे प्रथमतःच आपल्या मनोदुर्बलतेचा जो किंचित् भास होत असतो, त्याचें भय मानून मी आधींच हे काय विचार मनांत आणतें आहे? आतां हें तपोवन आणि हाच त्या शुकमुनीचा आश्रम; तेव्हां त्याच्या वैराग्याची किंवा माझ्या वशीकरणसामर्थ्याची काय ती खरी परीक्षा लौकरच होईल. ( चहूंकडे पाहून ) वाहवा! वसंतानें तर या ठिकाणीं पूर्वींच येऊन हें तपोवन उत्कृष्ट शृंगारून ठेवलें आहे, आणि त्याचा सखा मदनहि माझ्या साह्यास एथेंच सिद्ध आहे. आतां शुकाचा तपोभंग करावयास मला अवकाश काय?—त्याच प्रतिज्ञेचें पुनः एक वेळ स्मरण करतें—( "**आणितें वश निश्चयें करुनी०**" हें मागलें

पद्य पुनः ह्मणते )—हीच ती पर्णकुटिका आणि आंत आसनावर ध्यानस्थ बसलेला हाच तो व्यासऋषिपुत्र. अहाहा!—

(" श्रीहरिच्या वेणु ना०" ही चाल. )

**भूधरसा अचल बाई विधुसम कीं शांत हा ॥ तेजानें रविच वाटे विमलत्वें नभ पहा ॥ गांभीर्यें लाजवीलचि वाटे त्या सागरा ॥ पूज्यचि कीं बुद्धि होते पाहुनि या मुनिवरा ॥ १ ॥**

(" तस्करा हातीं० " ही चाल. )

**मनोहर खाशी ॥ ही श्रीशुकमूर्ति ॥ गमे मज वसो मनःप्रांतीं ॥ ध्रु० ॥ शुभ्र उपवीता ॥ याच्या बहु कांती ॥ स्वच्छ नव कमलतंतुपरि ती ॥ वल्कलें याचीं ॥ धवल किति असतीं ॥ दिसति जणुं अमृत-फेनसम तीं ॥ कमंडलु तैसा ॥ येथ शिलेवरतीं ॥ हंस कीं पद्मनिकटवर्ती ॥ मनो० ॥१॥**

—अशा पुरुषाचें हें सौंदर्य आणि यौवन या प्रकारच्या केवळ कष्टमय तपश्चरणांत वेंचलें जावें याहून त्या यौवन-सौंदर्याचें अन्य दुर्दैव तें कोणतें बरें? असो हा समाधिस्थ आहे, तेव्हां याला प्रथम समाधींतून जागृत केलें पाहिजे. या पंख्यानें वारा घालूं काय? अथवा हा शीतल सुवासिक पुष्पहार याच्या अंगावर टाकूं काय?—पण छे, एकदम असा अतिप्रसंग योग्य नव्हे. या करितां हा आपोआप देहभानावर येईपर्यंत, या प्रभातसमयास अनुकूल असे एथें याजपुढें नृत्यगायन करावें हें बरें. ( तसें करते. )

( "अभिनव मधुलोलु०" ही चाल. )

सुखकर किति भासत ही सुप्रभातवेला ॥ पुन-
रुत्सव देउनि करि सुप्रसन्न सकलां ॥ ध्रु० ॥
पावुनि लय तारागण ॥ स्वच्छ होय गगनांगण ॥
विकसित सुमगंधपूर्ण ॥ शीतल हा येत पवन ॥
पक्ष्यांचे मंजुलरव सुखद श्रवणाला ॥ सुखक० ॥१॥
रक्त पटावृत सुंदर ॥ बघुनी प्राचीस रुचिर ॥
प्यावयास अधर मधुर ॥ झाला हा रवि तत्पर ॥
यामिनि जणुं रुसुनि काय जाय दिगंताला ॥ २ ॥
पुष्पवतीलतास्पर्श ॥ घडला जो मारुतास ॥
स्नानें तत्क्षालनास ॥ करुन येत सावकाश ॥ पुन-
स्पर्शभयें काय मंदचरण झाला ॥ ३ ॥

—अगबाई, या शुकऋषीनें आपली समाधि विसर्जन केली वाटतें. होय. आतां एका बाजूस उभें राहावें व योग्य समय साधून याच्या दृष्टीस पडावें. ( तसें करते. )

शुक—( कमंडलूंतील उदकानें नेत्रस्पर्श करून ) अहाहा!—

( भुपाळी. )

नेत्रोन्मीलन झालें उठलें अंतःकरणहि तें ॥ परि
स्वानुभवजन्य सुखाचें स्मरण सदां स्थिर तें ॥
॥ ध्रु० ॥ प्रवर्तती हीं जरीं इंद्रियें या व्यवहारातें ॥
चिदानंदसुखतृप्त ह्मणूनच चांचल्य न त्यांतें ॥
तापत्रय तमचि तीं ॥ निवलीं कीं ब्रह्मजलीं ॥ वा-
सनाअहंकृतिची ॥ संगती त्यांस सुटली ॥ फि-
रति पुनः माघारीं ॥ जरि वृत्तीवर नेलीं ॥ अशी
पूर्ण आनंदस्थिति कीं लाभलिया मातें ॥ ऐहिक-
नश्वर ऐसें सारें तुच्छ विषयसुख तें ॥ १ ॥

—आणि तेंहि पण खरेंच—

( "वसंतींबघुनिमेनके०" ही चाल. )

**तोंवरी विषय सुखाऽसक्ति ॥ बहिर्मुखत्वें इंद्रियांसि जों अविद्यंत वसती ॥ परी तपयोगाभ्यासान्तीं ॥ उषःकालसम हृदयीं प्रगटे स्वानुभवज्योती ॥ कैंवि मग त्या तेजा पुढतीं ॥ तमोरूप हे ऐहिक सारे विषयादिक टिकती ॥ १ ॥**

—असो, हा प्रातःकालचा समय आहे, तेव्हां शेजारच्या सरोवरांतून स्नान करून यावें, आणि संध्यावंदनादि नित्यकर्म सारून त्या ब्रह्मसुखाचा पुनः अनुभव घेण्याकरितां तपोनुष्ठानास लागावें हें बरें.—

( पुढील पद्य ह्मणत पर्णकुटीच्या बाहेर येतो. )

( पद. )

**नित्य निरंजन पदीं ॥ होइन ॥ मोक्षभिक्षु मी कधीं ॥ ध्रु० ॥ भिक्षापात्रचि चित्तशुद्धि हें ॥ कंथा शांति निरवधी ॥ घेउनि ॥ कंथा शां० ॥ होईन ॥ मो० ॥ १ ॥**

( रंभा एकीकडे नाचूं लागते, तिच्या पदनूपुरांचा ध्वनि ऐकून )—पण हा काय चमत्कार बरें? या तपोवनाचें पूर्वींचें तें शांत आणि तापस रूप सर्व पालटून गेलें हें कसें? आणि अशा ठिकाणीं ही स्त्रीहि पण कोण आली असावी? ( आश्चर्ययुक्त मुद्रेनें रंभेकडे पाहतो. )

**रंभा**—( पुढें येऊन शुकास वंदन करीत )—

( "दरसनबिन अखि०" ही चाल. )

**हें नमन भवत्पदकमलासी ॥ नमुनि विनंती मदीय अशी ॥ ध्रु० ॥ शोभित असतां योग्य असा**

**वर ॥ आढळलां मन वरी तुझ्यासी ॥ १ ॥ घालवितां कां वृथा रूपवय ॥ करुनि कष्टमय घोर तपासी ॥ २ ॥ उपवनिं या एकांत मनोहर ॥ हेतु रति-क्रीडन हा मजशीं ॥ नम्र० ॥ ३ ॥**

**शुक**—( तिरस्कारपूर्वक )—

( "ही मुरलीगुंगवी०" ही चाल. )

**तूं वदसी काय हें ॥ स्त्रिये ॥ शिवशिव किति तरि मलिन वचन हें ॥ तूं० ॥ ध्रु० ॥ ग्राम्य अशा या विषयांतचि हा ॥ वेंचाया नर देह नव्हे ॥ तूं व-दसी० ॥ १ ॥**

**रंभा**—महाराज, तारुण्याच्या भरांत आलेल्या नर-नारींना अत्यंत प्रिय असा हा वसंत समय अवलोकन करावा. त्याच्या साह्यानें या मदनानेंहि आपलें शर-संधान कसें चालविलें आहे पहा.

**शुक**—अगे आह्मा तापसीजनांना यांचें काय कौतुक आहे !—

( "मुलासांगनृपति०" ही चाल. )

**सदां आत्मसुखतृप्त या नियतकामा ॥ तुच्छ बघ विषय हे सर्व आह्मा ॥ सदां० ॥ ध्रु० ॥ ऐक तूं रे स्मरा ॥ आंवरी या शरा ॥ कासया श्रम वृथा घेसि तूं हे ॥ ओरडुनियां पिका शोषविसि कां मुखा ॥ हे स्त्रिये जाइं तूं ही स्वधामा ॥ सदां आ० ॥ १ ॥**

**रंभा**—महाराज, असली वयोरूपसंपन्नता या खडतर तापसव्रतांत दवडणें चांगलें नाहीं. हिला अनुरूप असे नानाप्रकारचे विलासभोग भोगण्यांत या देहाची खरी सार्थकता होणार आहे.

शुक—छे छे; भोगविलासांत आयुष्य वेंचल्यानें कधींहि देहसार्थक्य व्हावयाचें नाहीं. उलटें—

( दिंडी. )

रूपयौवन हें क्षणिक या भुलूनी ॥ स्वसुख शाश्वत जो जाय विस्मरूनी ॥ आत्मघातक तो होत असे साचा ॥ वृथा दुर्लभ नरजन्म जाण त्याचा ॥ १ ॥

रंभा—नाहीं महाराज, तसें नव्हे—

( "कंथबिन रहि०" ही चाल. )

रमणी पीनस्तनी अशी । कृशोदरी मृदुंगी ॥ वक्ष असतां जो न दे तिला । आलिंगन सप्रेम ॥ तयाचा खचित व्यर्थ नरजन्म ॥ तया० ॥ १ ॥—

शुक—( धिःकारपूर्वक ) छेः—

—वाङ्मन यांस अतीत जें । रूपसच्चिदानंद ॥ तत्ज्ञानानुभवार्थ जो । न करि तपादिक कर्म ॥ तयाचा० ॥ २ ॥—

रंभा—अहो—

—नितंबभाराकुल युवती । विलासिनी स्मरपूर्ण ॥ प्रार्थितांहि एकांतिं तिचा । पुरवि जो न रति-काम ॥ तयाचा० ॥ ३ ॥—

शुक—अं:, तसेंहि नाहीं—

—सुगति इतर जन्मीं न मिळे । कारण ज्ञानाभाव ॥ न ती मिळवितां या जन्मीं । करि विषयीं आराम ॥ तयाचा० ॥ ४ ॥

रंभा—अहो, आपण स्त्रीसुखाचा इतका धिःकार करतां, परंतु मला सांगा कीं—

( “ कोण तुजसम सां०” ही चाल. )

**काय, रतिसुखतुल्य असे रमणीय॥ परम स्पृहणीय॥ मानवांतें अत्यंत नंदनीय ॥ आहे कमनीय ॥ ध्रु० ॥—**

**शुक**—एवढेंच ना, तें मी सांगतों—

**—ऐक, भवजलमग्नजनोद्धरणीय ॥ परमादरणीय॥ आत्मसौख्यचि तें श्रेष्ठ वंदनीय ॥ नित्य स्मरणीय ॥ १ ॥**

**रंभा**—महाराज, स्त्रीची योग्यता अगदीं तुच्छ करण्यासारखी अपवित्र आहे, असें आपण समजतां काय? अहो—

( दिंडी. )

**जिच्या अधरस्थळिं सरस्वती राहे॥ श्रवणविवरीं मणिकर्णिकाहि वाहे ॥ शिरोभागीं संगम त्रिवेणीचा ॥ तीर्थराजचि हा देह सुंदरीचा ॥ १ ॥**

—काय पहा, देवदैत्यांनीं एवढा अट्टहास करून समुद्रमंथन केलें आणि चौदा रत्नें काढिलीं, पण त्यांपैकीं बहुतेक रत्नांचा समुच्चय, पाहिलें असतां, एका स्त्रीचे ठायींच आढळत आहे. पहा—

( “दैवयोग दुर्विपा०” ही चाल. )

**वदन चंद्र, अधर सुधा, रत्न दंत ते ॥ देहकांति लक्ष्मीपरि रुचिर शोभते॥ ऐरावततुल्य गमन मंद मंद तें ॥ पारिजातसुमसम ती श्वास सोडिते ॥ कामधेनु वाणी, विष नयनांजन तें ॥ सागरोत्थ रत्नें हीं सिद्ध युवतितें ॥ १ ॥**

—आणखी पहा—

( साकी. )

मध्यभाग जणुं विष्णुपदापरि वक्षस्थळ शिव-
पद तें ॥ शिरसि ब्रम्हस्थान अशी स्त्री पुण्यभूमि
सम दिसते ॥—

शुक—(मध्येंच) वाहवा वाहवा! काय हें मिथ्या वर्णन! अग,—

(“ वधुनि सुभद्रे०” ही चाल. )

या तव असदुक्ति॥ ऐकुनि मूढ मात्र भुलती ॥ध्रु॥
अशुद्ध वस्तूद्भव या देहीं ॥ अशुद्धपूर्णचि तो
असतां ही ॥ कृमिवत् लोलुप मुर्खचि होई ॥
परि ते बुध चित्तीं ॥ तयाप्रति अपवित्रचि गणती॥
या तव अस० ॥ १ ॥

—आणखी तूं असें पहा—

(“ एक चतुरनार कर०” ही चाल. )

जी रक्तमांस परिपूर्ण असावी ॥ ती पुण्यभूमि
तनु कशि लेखावी ॥ अति अनृत बोल हे वदसि
कसे ॥ १ ॥ जे असति केवळ स्नायुग्रंथी ॥ ते
कनककलश कुच कैंवी असती ॥ अति अनृ० ॥२॥
जो नित्य अमंगल अशुचि स्त्रावी ॥ तो मध्य विष्णु-
पदतुल्यचि कैंवी ॥ अति० ॥ ३ ॥ कीं सतत जाण
धरितें श्लेष्मा जें ॥ त्या मुखा केंवि शशि उपमा
साजे ॥ अति० ॥ ४ ॥

रंभा—महाराज मर्त्य स्त्रियांप्रमाणें मला आपण सामान्य लेखूं नये. मी स्वर्गांगना आहें. आणि त्यामुळें जशी बाहेरून तशीच अभ्यंतरीं हि निर्मळ आणि पवि-

त्रच आहे. आपणास संशय असल्यास हें पहा मी आपलें हृदय विदारण करून दाखवितें.

शुक—हां-हां-हां, रंभे, एवढें साहस करूं नकोस. अहा, तुझी ही अंतर्बाह्य निर्मलता जर मला पूर्वींच ठाऊक असती, तर फार उत्तम झालें असतें.

रंभा—( उत्सुकतेनें ) कां बरं?

शुक—कारण—

( श्लोक; भैरवी. )

**ठावें जरी हें असतें अधींच ॥ मी जन्म घेतों**
**उदरीं तुझ्याच ॥ कल्पावधि स्वस्थ तिथें रहातों ॥**
**या संसृतीतें जननी न येतों ॥ १ ॥**

रंभा—( हताश होऊन ) झालें, माझें आतां सामर्थ्यच खुटलें! ( शुकाच्या पायावर मस्तक ठेवून ) महाराज, मला क्षमा असावी—

( भैरवी; त्रिवट.)

**मी तुमची अपराधी॥ लावियली दुरुपाधि॥ ध्रु०॥**
**तुमच्या संमुख अशिवचि वदल्यें ॥ प्रातःकर्मा**
**विघ्नहि केलें ॥ जागृत केली समाधी ॥ मी तु०॥१॥**

( या शृंगारवैराग्याचा युद्धचमत्कार पाहण्यासाठीं विमानांत बसून आलेले सुरगण अंतरिक्षांतून पुढील पद्य ह्मणत शुकावर पुष्पवृष्टि करतात. )

( "प्रिये पहा रात्रींचा० " ही चाल. )

**करीतसों सुमनवृष्टि तुजवर ही धन्य शुकमुने**
**॥ ध्रु० ॥ दृढविरक्ति पाहुनि तव ॥ वाटे जो मनिं**

**उत्सव ॥ तत्प्रयुक्त हा गौरव ॥ परम आदरानें ॥
करीतसों सुमनवृष्टि० ॥ १ ॥**

शुक—( देवांस उद्देशून )—

( साकी. )

**इंद्रमुख्य सुरवृंद तुम्हाला करितों अभिवंदन मी ॥**

देव—(आशिर्वाद देतात )—

**हा तव चरितप्रबंध लोकां करवो सत्पथगामी ॥**

शुक—( विनयानें )—

**—थोर अनुग्रह हा ॥—**

देव—( आनंदानें )—

**—तव वैराग्य तसेंच महा ॥ १ ॥**

( देव जातात. )

शुक—( रंभेस)—ऊठ ऊठ, रंभे ऊठ. अगे तुला क्षमा करण्याचा माझा तरी अधिकार तितका राहिला असेल काय? कारण हें पहा; आत्मज्ञानापासून प्राप्त होणाऱ्या त्या अविनाशी सुखाचें महत्व वर्णन करण्याचे भरांत, कदांचित् तुझ्याहि मनाला वाईट वाटण्यासारखें स्त्रीजनसंबंधीं एखादें निंदावचन माझ्या पण मुखांतून गेलें असेल! तेव्हां मलाच त्याबद्दल तुझी क्षमा मागितली पाहिजे.

रंभा—(उठून )—छे छे, महाराज आपल्या सारख्यांच्या प्रासादिक भाषणांचा विपरित अर्थ कोण घेईल? असो, मला आतां आज्ञा असावी.

शुक—फार उत्तम आहे. तुझें कल्याण असो.

( रंभा वंदन करून जाते. नारद येतात. )

**नारद**—(आनंदानें शुकास आलिंगन देऊन)

(भैरवी ; दादरा.)

**त्रिजगीं तूं धन्यधन्य पाराशरपुत्रा ॥ सद्वृत्ति प्रेरक या दाविलें चरित्रा ॥ ध्रु० ॥ आश्रमाऽश्रमासि धरुनि करणें भवयात्रा ॥ विधि मोक्षप्रद हा तरि उक्त कीं अपात्रा ॥ परि विरक्त जे ज्ञानी ते आलिप्त तंत्रा ॥ राहुनियां जिंकितात सहज इहपरत्रा ॥ त्रिज० ॥ १ ॥**

**शुक**—नारदमुने, आपण आतां हे जे मोक्षविषयक कांहीं विचार दर्शविलेत, ते आमच्या वडिलांस सांगून त्यांची एकदां समजूत कां बरें करून देत नाहीं? मी संसारीच व्हावें, त्यावांचून मोक्षप्राप्ति दुर्लभ, हा त्यांचा माझ्या मागचा आग्रह कांहीं केल्या सुटत नाहीं.

**नारद**—शुका, त्यांची आतां तुजविषयीं पूर्ण खात्री झाली आहे. तथापि बाबा त्यांचेंहि अनुशासन ह्मणजे अयथार्थ होतें असें नव्हे. मोक्षप्राप्तीच्या विषयांत तुझ्यासारखा उपजत पूर्ण अधिकारी फारच विरळा असतो. तेव्हां सामान्य जनांस त्यांचेंच अनुशासन ग्राह्य आहे. हें पहा.—

(भुपाळी.)

**संसृतिबंधन अल्पतरी तें लागे भोगावें ॥ कोणत्याहि संस्थितींत त्याविण मुक्तत्व नसावें ॥ध्रु०॥ प्रबल वासना विकार तैसे लागति जिंकावे ॥ एकेकाश्रम अनुक्रमें तें ह्मणुनि आदरावें ॥ मनचि असें हें सुखदुःखाचें कारण जाणावें ॥ भक्तिज्ञान तपादिसाधनें तें शुचि ठेवावें ॥ करवि अहं-**

कृति बद्ध ह्मणुनि तिस सत्वर छेदावें ॥ सम वा विषम प्रसंग येतां अस्वस्थ न व्हावें ॥ अशा रीतीनें विहिताचरणीं खुशाल विचरावें ॥ महदनुशासन सकलांतें बा ग्राह्य असें व्हावें ॥ ऊर्ध्वस्थ सुप्त त्याला ॥ पतनाची भीति खरी ॥ जो अधस्थ निर्भय तो ॥ वरि चढे यथाक्रम जरी ॥ जाणूनि सांगणें सकलां ॥ आश्रमाश्रमासि वरीं ॥ परिव्राज जरि परिभ्रष्टता एकवार पावे ॥ इतरांहुनि त्या महत्पतनभय लागे सोसावें ॥ संसृ० ॥ १ ॥

—असो, तें पहा तुझ्या या वैराग्यविजयाचें अभिनंदन करण्याकरितां व्यास ऋषि इकडेच येत आहेत.

**व्यास**—( शुकास अनुलक्षून )—

( "सुकुमारअसुनि तूं०" ही चाल. )

वैराग्य-विजय-सौभाग्य-युक्त तव कीर्ति ॥ होऊनि राहिली खरी अमर या जगतीं ॥ ध्रु० ॥ संसार गणुनि निःसार नसुनि अधिकार विषयसुखजालीं ॥ तूं तरुण असुनि तव वृत्ति बद्धनच झाली ॥ वैराग्य० ॥ १ ॥

**शुक**—तात गुरु, हा शुक आपणांस वंदन करीत आहे.

**व्यास**—वत्सा, आपल्या सच्चरित्रानें सर्व प्राकृत जनांस असाच चिरकाल सन्मार्गबोधक होऊन रहा.

**नारद**—व्यासमुने, आपल्या हेतूप्रमाणें खचित असेंच होईल—

( "वाडवडिला सेवी०" ही चाल. )

सत्य कृतार्थचि हा शुक झाला ॥ पावे सर्वोत्तम तो गतिला ॥ जीवन्मुक्त असा हा पुढतीं ॥ जगदु-

चरणीं ठेविल वृत्ति ॥ युष्मद्विरचित भगवत्कर्मा॥
प्रसृत करीलचि हा कृतकर्मा ॥ १ ॥

—शुका, तुझा अणखी काय मनोरथ आहे?

शुक—महाराज, आपल्या आशीर्वादानें मी निर्मनोरथच आहें. तथापि आपला हेतूच असल्यास सर्वांच्या कल्याणार्थ आपला हा आशीर्वाद असावा—

( "ल्यांड" च्या चालीवर. )

धर्मनीति-शालिनता या जनीं वसो ॥ध्रु०॥ क्षुद्रवासनांस भुलुनि ॥ विषयसुखाऽसक्त बनुनि ॥ आत्मरूप तें विसरुनि ॥ शाश्वत सुख-लाभ-विमुख ॥ जन कधीं नसो ॥ धर्मनी० ॥ १ ॥ नश्वर हें दृश्य असुनि ॥ तद्विनाश बहु शोचुनी ॥ स्वकर्तव्य नच समजुनि ॥ अनधिकारि मुक्तिस हा ॥ जन कधीं नसो ॥ २ ॥ व्यर्थ भ्रम सत्य गणुनि ॥ सत्यपथआचरण चुकुनि ॥ असन्मार्ग अवलंबुनि ॥ इहपर सुखहीन असा ॥ जन कधीं नसो ॥ धर्म० ॥ ३ ॥

नारद—तथास्तु.

( पडदा पडतो. )

---




PRINTED AT THE "TATVA-VIVECHAKA" PRESS.

मुंबई इलाख्यांतील सरकारी विद्याशाळाखातें.

# आरोग्यमार्ग

आरोग्यविद्या या विषयावर हिंदुस्थानांतील शाळांकरितां पहिलें पुस्तक.

या नांवाच्या इंग्रजी पुस्तकाचें हें मराठी भाषांतर,


## बाळाजी प्रभाकर मोडक,

कोल्हापूर येथील राजाराम कालेजांतील पदार्थविज्ञान-शास्त्राचे अध्यापक,


यांनीं केलें.


आवृत्ति ३ री.—प्रती ४०,०००.

या पुस्तकाची मालकी सन १८६७ च्या २५ व्या आक्टाप्रमाणें नोंदिली आहे.

मुंबई:
गवर्नमेंट सेंट्रल बुक डिपो.

सन १८९७.




किंमत दीड आणा.

# प्रस्तावना.



मुलांस व खेड्यापाड्यांच्या लोकांस समजण्यास फारसें कठीण पडूं नये असें धोरण धरून हें भाषांतर केलें आहे. मूळपुस्तकांत कठीण शब्दांवर ज्या पुष्कळ टिपा दिल्या होत्या, तितक्या यांत दिल्या नसून मूळांतच सोप्या शब्दांचा उपयोग केला आहे व कठीण शब्दांस पर्यायशब्द जेथल्या तेथें दिले आहेत. यामुळें पुष्कळ ठिकाणीं भाषांतर फार साधें दिसेल. परंतु या छोट्या बुकांत जी अत्यंत उपयुक्त माहिती दिली आहे ती सर्वांस सहजीं समजावी व तिचा फैलाव सर्वत्र व्हावा हा जो सरकारचा मुख्य हेतु तो सिद्धीस जावा, याकरितां भाषा होईल तितकी साधी व सुलभ ठेवण्याचा यत्न केला आहे.

**बा० प्र० मो०**

कोल्हापूर, ता० २४ एप्रिल सन १८८८.

---

**आवृत्ति दुसरी.**—सर्व मजकूर मुळाशीं ताडून पाहून व आरोग्य, पक्काशय किंवा आमाशय, स्नायु, आंतडें या व दुसऱ्या कांहीं कठीण शब्दांवर टिपा वगैरे देऊन ही आवृत्ति सुधारली आहे.

**बा० प्र० मो०**

कोल्हापूर, ता० ९ आगष्ट १८९०.

---

**आवृत्ति तिसरी.**—दुसऱ्या आवृत्तींतील भाषा क्वचित् ठिकाणीं सुधारून ही आवृत्ति काढिली आहे.

**बा० प्र० मोडक.**

कोल्हापूर, ता० २७ जानेवारी १८९७.

# अनुक्रमणिका.



# आरोग्यमार्ग.

## आरोग्यविद्येचीं मूलतत्त्वें.



### उपोद्धात.

१. **आरोग्याची योग्यता.**—आरोग्य हें, एक सुखाचें मोठें साधन आहे. जेव्हां आपली प्रकृति चांगली असते, तेव्हां आपणास आपलें काम करितां येतें व दुसऱ्यासही मदत करितां येते. आपणास दुखणें आलें, ह्मणजे त्यापासून आपली शक्ति जाते, व आपलें ओझें घरच्या इतर माणसांवर पडतें. खुद्द राजाला जरी दुखणें आलें, तरी ऐषआरामाच्या पदार्थांनीं भरलेल्या अशा आपल्या वाड्यांत सुद्धां त्यास दुःख भोगावें लागतें. परंतु ज्याची शरीरप्रकृति चांगली आहे, ह्मणजे जो धडधाकट आहे, असा एकादा गरीब मजूरही मोठ्या आनंदांत काळ घालवितो.

आपल्या लहान मुलास जरी दुखणें आलें तरी आपण खिन्न व दिलगीर होतों. जो मुलगा शाळेंत जावयाचा, मौजेचे खेळ खेळावयाचा, तें एकीकडे राहून, त्यास अंथरुणावर पडून राहावें लागतें, व कधीं कधीं अशा वेळीं तो तापानें भाजत व तळमळत असतो. जर तो फार आजारी असला, तर घरांतील सर्व मनुष्यांस मोठी काळजी लागते.

मुलांच्या आईस दुखणें आलें, ह्मणजे तर याहूनही अधिक वाईट गोष्ट होते. आई चांगली व सुशील असून

प्रकृतीनें बरी असली, ह्मणजे सकाळपासून संध्याकाळ-पर्यंत एकसारखी काम करीत असते. मोठें दुखणें आलें ह्मणजे तिला हालतांचालतां येत नाहीं, व तिची सुद्धां दुसऱ्यास चाकरी करावी लागते.

बापास दुखणें आलें ह्मणजे तर मोठेंच अरिष्ट येतें. बहुतेकांस आपल्या पोटाकरितां काम करावें लागतें. दुखणें आलें ह्मणजे पुष्कळ मजुरांस रोजमुरा मिळत नाहीं, आणि कदाचित् औषधपाण्याकरितां त्यांस कांहीं पैसे खर्च करावे लागतात. यामुळें त्यांस कांहीं कर्ज होतें, आणि त्यांचीं कुटुंबें बरेच दिवस अडचणींत पडतात. यदाकदाचित् जर बाप मेला, तर त्याची बायको अनाथ होते, व त्याचीं मुलें पोरकीं व उघडीं होऊन त्यांस दुसऱ्याच्या तोंडाकडे दीनवाणें पाहावें लागतें. ही केवढी दुःखाची व दिलगिरीची गोष्ट आहे !

प्रकृति चांगली राखण्याकरितां सर्वांनीं झटावें हें किती अगत्याचें आहे, हें तुह्मांस यावरून सहज समजेल. प्रकृति बिघडून शरीराची खराबी होईपर्यंत शरीरसंपत्तीची खरी योग्यता आपणास कळत नाहीं.

**२. शरीर प्रकृति बिघडण्याचीं कारणें.**—कित्येक असें समजतात कीं, दुखणें येणें हें प्रारब्धाच्या स्वाधीन आहे; तेथें कोणाचा उपाय चालत नाहीं; परंतु प्रारब्ध ह्मणून कांहीं नाहीं. जेव्हां आपणास दुखणें येतें, तेव्हां त्यास कांहींनाकांहीं तरी कारण असतें.

**३. आरोग्यज्ञानाचा फायदा.**—आपली प्रकृति चांगली कशी ठेवावी हें ज्यापासून समजतें, त्यासच

**आरोग्यज्ञान** असें ह्मणतात. आजार कमी करण्यास पुष्कळ उपाय योजितां येतात, असें आपणास दुसऱ्या देशांच्या माहितीवरून समजतें.

ह्या देशांत फार साधारण रोग ह्मटला ह्मणजे ताप होय. ताप भरतो व निवतो. बहुतकरून प्रत्येक मनुष्यास केव्हां केव्हां ताप येतो. हल्लीं हिंदुस्थानांत जसा ताप नेहमीं येतो, त्याप्रमाणें इंग्लंड देशाच्या कांहीं भागांत मागें एकदां तापाचा आजार फार होता. परंतु आतां त्या ठिकाणीं तो आजार बहुतेक नाहींसा झाला आहे. शेंकडों वर्षांपूर्वी इंग्लंडांत इतके पुष्कळ महारोगी होते कीं, सर्व मुख्य शहरीं महारोग्यांकरितां दवाखाने होते. आतां पाहाल तर एकही दवाखाना नाहीं. देवी हा चिळस आणणारा व घातक रोग आहे. पूर्वी कधीं कधीं खेड्यांचीखेडीं या रोगानें फडशा होत, आणि शेंकडा सुमारें २९ लोक कुरूप किंवा आंधळे होत. सुमारें ८० वर्षांपूर्वी एका इंग्रजी वैद्यानें असें शोधून काढिलें कीं, गाईच्या कांसेवरील एका प्रकारच्या फोडांच्या लशीनें देवी येत नाहींत, किंवा आल्याच तर फार जोरानें येत नाहींत. आतां इंग्लंडांत पूर्वींच्या मानानें देवींपासून फारच थोडीं माणसें मरतात; जर सर्व मनुष्यें काळजी घेतील, तर देवींपासून एकही माणूस मरणार नाहीं.

इंग्लंडांत ज्या प्रकारचे उपाय योजिले, त्याच उपायांची योजना या देशांत केल्यास येथल्या लोकांचीही

१. अ म्हणजे नाहीं आणि रोग म्हणजे दुखणें किंवा आजार. या दोहोंपासून अरोग हा शब्द झाला आहे व याचें भाववाचक नांव आरोग्य आहे. आरोग्य म्हणजे निरोगीपणा. २. रक्तपित्ये.

शरीरसंपत्ति तिकडच्या लोकांसारखी सुधारेल. विस्तवानें आंग भाजतें हें प्रत्येकास माहीत असतें; परंतु आपणास दुखणें कसें येतें, व आपण अशक्त कसे होतों, हें पुष्कळांस समजत नाहीं. निरोगी व बळकट कसें राहावें, हें शिकविण्याचा या लहानशा पुस्तकाचा हेतु आहे. तर सर्वांनीं लक्ष लावून हें पुस्तक वाचावें, आणि त्यांत सांगितल्याप्रमाणें वागण्यास यत्न करावा.

प्राणरक्षणास व शरीरप्रकृति चांगली राखण्यास कोणत्या गोष्टींची आवश्यकता आहे, हें एकामागून एक पुढें सांगितलें आहे.

## १. स्वच्छ हवा.

### (१) हवा व ती कशाची झाली आहे.

४. अन्नपाण्यावांचून कित्येक दिवसपर्यंत आपला जीव जगेल, परंतु हवा न मिळाल्यास थोड्याच पळांत आपण मरून जाऊं. या पृथ्वीवर जन्मास आल्याबरोबर जें पहिलें काम आपण करूं लागतों, तें श्वास ह्मणजे हवा आंत (शरीरांत) घेणें हें होय. आणि मरतेवेळीं जी शेवटची क्रिया आपण करितों, ती उच्छ्वास ह्मणजे हवा बाहेर सोडणें ही होय. जन्मल्यापासून मरपर्यंत जागे असतां किंवा निजलों असतां आपला एकसारखा श्वासोश्वास घेण्याचा

१. उत् ( बाहेर ) व श्वास या दोहोंचा संधि होऊन उच्छ्वास हा शब्द झाला आहे. परंतु याच्या जागीं उश्वास या साध्या शब्दाचा लोक वराच उपयोग करितात, व तो शब्द लहान मुलांस व खेड्यापाड्याच्या लोकांस उच्चारण्यास सोपा असल्यामुळें त्याचाच उपयोग मुद्दाम पुढें केला आहे. भा.

क्रम चाललेला असतो. यास्तव आपणांस जिवंत ठेवण्यास हवा ही फार जरूरीची आहे.

आपणांस हवा दिसत नाहीं. हवा शांत असतां तिचें ज्ञान आपणांस स्पर्शानें होत नाहीं, ह्मणजे ती आपल्या अंगास लागली तरी कळत नाहीं. जेव्हां हवा चलन पावते किंवा हालते, तेव्हां तिला वारा ह्मणतात; या वेळीं ती काय करिते तें आपणांस दिसतें; व ती आपल्या अंगास लागली तर समजतें. कधीं कधीं ती इतक्या जोरानें वाहते कीं, मोठमोठीं झाडेंही तिच्या जोरानें मुळापासून उपटून पडतात. ज्याप्रमाणें समुद्राचा तळ पाण्यानें आच्छादिलेला[1] आहे, त्याचप्रमाणें सर्व पृथ्वीवर हवेच्या मोठ्या समुद्राचें आवरण[2] आहे. पाण्यांत मासे फिरतात त्याप्रमाणें कांहींसे या समुद्राच्या तळावर आपण हालतों व चालतों. हा हवेचा समुद्र निदान १०० मैल खोल आहे. परंतु जसजसें वर जावें तसतशी हवा अधिकाधिक पातळ होत गेली आहे.

जेव्हां आपण पेलाभर काफी पितों, तेव्हां पाणी, साखर, काफी, आणि दूध हे चार पदार्थ एकत्र मिसळून घेतों. पुष्कळ दिवसांपूर्वीं लोकांस असें वाटत होतें कीं, हवा ही फक्त एकाच पदार्थाची[3] झालेली आहे. परंतु विद्वान लोकांनीं असें आतां सिद्ध केलें आहे कीं, हवेंत मुख्य चार पदार्थ असून, ते मोठ्या चातुर्यानें व शहाणपणानें एकत्र मिसळलेले आहेत.

१. झांकलेला. २. झांकण, पांघरूण. ३. पूर्वीं पृथ्वी, आप्, तेज, वायु आणि आकाश हे पांच एकाकी पदार्थ किंवा मूलतत्त्वें आहेत, असें समजत होते. परंतु पृथ्वी, आप् व वायु हे मिश्र किंवा संयुक्त आहेत आणि तेज व आकाश हे पदार्थ नाहींत, असें आतां समजलें आहे.

९. आपल्यासभोंवतीं जे पदार्थ आपण पाहतों ते तीन रूपांचे असतात. जे कित्येक पदार्थ दगड व लांकूड यांसारखे असतात, त्यांस **घन** किंवा **भरींव** म्हणतात; जे कित्येक पाणी व दूध यांसारखे असतात, त्यांस **पातळ** पदार्थ ह्मणतात, आणि जे हवेसारखे असतात, त्यांस **वायु** ह्मणतात.

ज्या वायूंची हवा बनलेली आहे, त्यांस वेगळें वेगळें काढून त्यांचें वजन करितां येतें. यांपैकीं एक वायु **आक्सिजन** आहे. हवेंतील या वायूवर प्राण्याचें जीवन[1] मुख्यत्वें अवलंबून आहे. आक्सिजनाशिवाय दिवा तेवणार नाहीं, व प्राणीही जगणार नाहीं. परंतु जर हवा सर्व आक्सिजनाची असेल तर आपण लवकर मरून जाऊं. कारण असल्या हवेचे शरीरावर फार तीव्र परिणाम होतील, व ते आपणांस सहन होणार नाहींत. याकरितां त्यास **नैत्रोजन** ह्मणतात, अशा दुसऱ्या एका जातीच्या वायूशीं आक्सिजन हवेंत मिसळलेला आहे. हा वायु आक्सिजन वायूपासून फार भिन्न आहे. या वायूंत प्राणी जिवंत राहूं शकत नाहींत, व यांत पेटलेला दिवा घातला, तर लागलाच विझतो. परंतु श्वासोच्छ्वासास आणि पदार्थ जळण्यास हवा चांगली उपयोगीं पडावी अशा उत्तम प्रमाणानें हे दोन वायु एकत्र मिसळलेले आहेत. तुमच्या हातास एक आंगठा व चार बोटें असतात. ही गोष्ट, हवेंत एक भाग आक्सिजन[2] आहे, आणि ४ भाग नैत्रोजन आहे, हें ध्यानांत ठेवण्यास उपयोगीं पडेल.

---

१. जिवंत राहणें. २. सृष्टींत आक्सिजन हा फार साधारण पदार्थ आहे. प्रत्येक ९ शेर पाण्यांत ८ शेर आक्सिजन असतो. सर्व पृथ्वीच्या वजनाचा निम्मा भाग आक्सिजनाचा बनलेला आहे.

बहुतेक सर्व हवा या दोन वायूंची मुख्यत्वें झालेली आहे. परंतु हवेंत आणखी दुसरे दोन वायु आहेत. यांचें प्रमाण हवेंत जरी फार थोडें आहे, तरी ते वायु फार उपयोगाचे आहेत.

६. कोळसा ह्मणजे काय हें तुह्मास ठाऊक आहे. झांकणाखालीं लांकूड जाळलें व त्यांतील वायुरूपी पदार्थ घालविले, ह्मणजे जो काळा पदार्थ उत्पन्न होतो किंवा मागें राहतो, त्यास कोळसा ह्मणतात. तांदूळ किंवा मांस यांस जाळूनही त्यांचा एक प्रकारचा कोळसा करितां येतो. शुद्ध कोळशास कार्बान[1] ह्मणतात. कार्बान आणि आक्सिजन यांच्या संयोगी पदार्थास कार्बानिक आसिड वायु ह्मणतात. हवेंत वर सांगितलेले दोन पदार्थ असून शिवाय हा तिसरा पदार्थ आहे. हा वायु जड आहे, व रिकाम्या खोल विहिरींच्या तळांशीं हा वायु कधीं कधीं फार जमतो. अशा विहिरींत जळती मेणबत्ती सोडिली, तर ती विझते. हा वायु श्वासाबरोबर फुप्फुसांत घेतला, तर मनुष्य मरतो. परंतु हा वायु झाडांचें[2] मुख्य भक्ष्य आहे. या वायूशिवाय झाडें वाढावयाचीं नाहींत. सारा दिवसभर ( सूर्य उगवल्यापासून मावळेपर्यंत ) झाडें या वायूस शोषण करीत असतात.

२५०० भाग स्वच्छ हवेंत सुमारें १ भाग किंवा १३ रुपयांत १ पै या प्रमाणानें मात्र कार्बानिक आसिड वायु हवेंत असतो. या थोड्या वायूपासून आपणांस कांहीं अपकार होत नाहीं. परंतु हा वायु हवेंत फार झाला तर आपण अशक्त व आजारी होतों.

---

१. हिरा हा कार्बानच आहे, व त्यासही तीव्र आंच देऊन जाळितां येतें. २. झाडें या शब्दांत लहानथोर झाडें, झुडपें, रोपें, वेल वगैरे सर्व प्रकारच्या वनस्पतींचा समावेश होतो असें समजावें. भा.

हवेंत थोडीशी पाण्याची वाफ असते, व हा हवेंतील चवथा पदार्थ होय. ताटांत किंवा पितळींत थोडेंसें पाणी ठेविलें तर तें हळूहळू आटून नाहींसें होतें. सूर्याच्या उष्णतेनें एकसारखी पाण्याची वाफ होते, व ती वर जाऊन तिजपासून ढग बनतात, आणि तीच वाफ, दंव आणि पाऊस या रूपांनीं पुनः खालीं पडते. हवेंत जर पाण्याची वाफ नसती तर आमचीं शरीरें नरम न राहतां रुक्ष होऊन तडतडलीं असतीं, आणि सर्व झाडें मरून गेलीं असतीं.

आक्सिजन, नैत्रोजन, कार्बोनिक आसिड वायु, आणि पाण्याची वाफ हे चार पदार्थ हवेंत असतात. हे पदार्थ योग्य प्रमाणानें मिसळलेले असले ह्मणजे हवा स्वच्छ व शुद्ध असते; व तसल्या हवेच्या अंगीं आमच्या प्रकृति चांगल्या ठेवून आपणांस धष्टपुष्ट करण्याची योग्यता असते.

## (२) हवा कशी बिघडते.

७. प्राणरक्षणाकरितां हवा तर अवश्य आहे, परंतु ती हवा स्वच्छ व शुद्ध असणेंही जरूर आहे. पृथ्वीवर अनेक जातींचीं विषें आहेत, परंतु ज्या विषानें फार लोक मरतात, तें विष बहुतकरून वाईट हवा हें होय. पुष्कळ वर्षांपूर्वीं कलकत्त्यास एका लहान अंधारकोठडींत ( ब्ल्याकहोलमध्यें ) एके रात्रीं १४६ मनुष्यांस कोंडून ठेविलें होतें. या कोठडीस काय त्या दोन खिडक्या होत्या. दुसऱ्या दिवशीं सकाळीं दार उघडून पाहिलें, तेव्हां सारीं २३ मनुष्यें हेलकांड्या खात बाहेर पडलीं. बाकी सर्व मनुष्यें मरून गेलीं होतीं. इतकीं माणसें कशानें मेलीं ?

१. हवेंत यांशिवाय आणखी कांहीं पदार्थ सूक्ष्म प्रमाणानें आहेत.

वाईट हवेनें मेली हें उघड आहे. या विचाऱ्यांप्रमाणें एका रात्रींत इतर वेळीं जरी फार थोडीं मनुष्यें मरतात, तरी स्वच्छ हवा न मिळाल्यामुळें पुष्कळ लोक जन्मभर अशक्त व रोगी होतात.

ज्या रीतींनीं हवा बिघडते किंवा अस्वच्छ होते, त्यांपैकीं कांहीं रीति खालीं सांगितल्या आहेत.

(१) श्वासोश्वास[1] किंवा श्वास घेणें व सोडणें.—आपण नेहमीं श्वास घेतों व सोडितों. परंतु जी हवा आपण बाहेर सोडितों ती हवा, जी आपण श्वासाबरोबर आंत घेतों तिजपासून, अगदीं वेगळी असते. ज्यांस स्वच्छ राहण्याची आवड असते, ते तोंड व हात धुतात; आणि दररोज आंघोळ करितात. जी हवा आपण श्वासाबरोबर आंत घेतों ती शरीराच्या आंतील भागांस नेहमीं धुऊन स्वच्छ करिते, व त्यांतील मळ काढून टाकिते. हें कसें होतें याविषयीं थोडेंसें सांगतों.

जेव्हां आपण श्वास घेतों, तेव्हां हवा आपल्या फुफ्फुसांत शिरते. हीं फुफ्फुसें आपल्या छातींत मोठ्या स्पंजासारखीं सूक्ष्म छिद्रमय आहेत. श्वासमार्गाची ह्मणजे हवा आंत घेण्याची जी नळी आहे, तिला ज्या लक्षावधि लहानलहान नळ्यांच्या फांद्या फुटलेल्या आहेत, त्यांतून हवा फिरते. या नळ्यांशेजारीं अगणित[2] लहानलहान रक्तवाहिन्या[3] आहेत. या नळ्यांचें कातडें इतकें पातळ आहे कीं, एकीं-

१. श्वास ह्मणजे हवा फुप्फुसांत ओढून घेणें आणि उश्वास ह्मणजे हवा बाहेर सोडणें. श्वास आणि उश्वास यांचा संधि होऊन श्वासोश्वास हा शब्द झाला आहे. २. ज्यांची गणति म्हणजे मोजदाद करतां येत नाहीं. ३. ज्या बारीक नळ्यांतून रक्त वाहतें त्यांस रक्तवाहिन्या म्हणतात.

तील रक्त जवळच्या नळींतील हवेस बहुतेक लागून असतें, असें ह्मटलें तरी चालेल. शरीराच्या सर्व भागांपासून जो मळ रक्तांत जमतो, त्यास या पातळ कातडीवाटे रक्त बाहेर टाकितें, व शुद्ध आक्सिजनास शोपून घेतें. यामुळें जें रक्त काळें व अस्वच्छ असतें तें लालभडक व स्वच्छ होतें.

८. जी हवा आपण श्वासाबरोबर बाहेर टाकितों तिजबरोबर पुढील तीन पदार्थ जातात.

( १ ) कार्बोनिक आसिड वायु—स्वच्छ हवेंत या वायूचा फार थोडा अंश आहे. परंतु याच्या १०० पट हा वायु, जी हवा आपण श्वासाबरोबर बाहेर सोडितों, तिजमध्यें असतो. जरी तो आपणांस दिसत नाहीं, तरी विस्तवापासून जसा धूर निघतो त्याप्रमाणें उश्वासाबरोबर हा वायु बाहेर जातो. कोंदट[१] खोलींत विस्तव पेटत असला तर ती लवकरच धुरानें अगदीं भरून जाते. त्याचप्रमाणें जर आपण कोंदट खोलींत निजलों, तर आपल्या सभोंवतालची हवा कार्बोनिक आसिड वायूनें भरून जाईल. जर अशा खोलींत स्वच्छ हवा आली नाहीं, तर आपण लवकरच मरूं. परंतु या वाईट हवेपैकीं कांहीं दाराच्या वरच्या बाजूनें बाहेर जाते, व कांहीं स्वच्छ हवा दाराच्या खालच्या बाजूनें आंत येते.

( २ ) पाण्याची वाफ—स्लेटीवर आपण जर श्वास सोडिला, तर ती ओलसर होते. यावरून जो श्वास आपण बाहेर सोडितों, त्यांत पाण्याची वाफ असते हें उघड आहे.

---

१. चोहोंकडून बंद अशा खोलीस कोंदट खोली म्हटलें आहे.

(३) घाणेरडे टाकाऊ पदार्थ—श्वासाबरोबर जी पाण्याची वाफ आपण बाहेर टाकितों ती शुद्ध नसते; तिजमध्यें कुजणारे पदार्थ असतात. त्यांस जर शरीरांत किंवा शरीरावर राहूं दिलें तर त्यांपासून रोग उत्पन्न होतात. कार्बानिक आसिडवायूप्रमाणें हे पदार्थही हवेंत आल्यानें ती बिघडते, व तिजपासून अपकार होतात.

गुरें, मेंढरें, कुत्रीं, व दुसरे प्राणी यांचीही आह्मांप्रमाणेंच श्वासोश्वसनक्रिया चालते, व त्यांच्या योगानेंही हवा बिघडते.

९. ( २ ) ज्वलन किंवा जळणें—वर सांगितलें आहे कीं, आक्सिजनाशिवाय विस्तव पेटणार नाहीं. जर एका भांड्यांत पेटलेला दिवा ठेविला, आणि भांड्याचें तोंड बंद केलें, तर दिवा लवकर विझतो. कारण भांड्यांतील सर्व आक्सिजन कार्बानाशीं संयोग पावतो, व त्यापासून कार्बानिक आसिड वायु उत्पन्न होतो. याप्रमाणें प्रत्येक दिवा व विस्तव यांपासून हवा खराब होते.

( ३ ) कुजणें—जेव्हां एकादा प्राणी किंवा झाड मरतें तेव्हां तें लवकरच कुजूं लागतें, व त्यापासून फार अपकारक वायु निघतात; व त्यांचे कण हवेंत पसरतात. आपल्या नाकाप्रमाणें आपले डोळे जर तीक्ष्ण असते, तर कुजणाऱ्या प्राण्यांपासून अनेक लहान लहान पदार्थ निघतांना व हवेंत पसरतांना आपणांस दिसले असते. जेव्हां हे पदार्थ श्वासाबरोबर शरीरांत शिरतात, तेव्हां त्यांचा नाकास वास येतो.

केळीचीं सोपें व दुसरा केरकचरा घराजवळ टाकि-

१. सडणारे, कुजणारे व दुसरे वाईट व घाण पदार्थ.

ल्यानें हवा बिघडते. खाटिक, ढोर[1], आणि रंगारी यांच्या धंद्यांपासूनही हवा बिघडते. प्रेतें पुरण्याच्या व जाळण्याच्या जागा घराशेजारीं कधीं असूं देऊं नयेत.

जमिनींतूनही वायु किंवा वाफा निघतात. जमिनींत जास्त कमी हवा शिरते; व ही हवा तेथच्या वाईट पदार्थांच्या योगानें बिघडून बाहेर पडते, व वरच्या हवेंत मिसळते.

जमीन ओलसर असली ह्मणजे तिजवर कुजणाऱ्या पदार्थांपासून हवा जास्त खराब होते. वाळलेलीं पानें, झाडें, झुडपें, वगैरे कुजणारे उद्भिज्ज[2] पदार्थ तापाचा आजार उत्पन्न करण्यास मुख्य कारण असावेत असें साधारणपणें मानितात.

ज्या तीन मुख्य रीतींनीं हवा बिघडते, त्या ह्या होतः-( १ ) श्वासोश्वास, ( २ ) ज्वलन किंवा जळणें, आणि ( ३ ) कुजणें.

## ( ३ ) हवा कशी शुद्ध होते.

१०. हवा शुद्ध होण्याच्या साधनांची योजना सृष्टींत केलेली नसती, तर प्राणिमात्रांस राहण्यास पृथ्वी लवकरच निरुपयोगी झाली असती. यांपैकीं मुख्य साधनें कोणतीं तें सांगतों.

( १ ) वायु पसरून एकमेकांत मिसळतात[3]–जर पाण्यांत थोडें दूध घातलें तर तें सर्व पाण्यांत मिसळतें. विस्तवापासून जो धूर निघतो तो लवकरच हवेंत पसरतो,

१. कातडीं कमावणारे व रंगविणारे. २. झाडें, झुडपें, वेल वगैरे वनस्पतींचे. ३. यास रसायनशास्त्रांत वायूंचें अभिसरण असें म्हणतात.

व दिसेनासा होतो. तसेंच जी हवा आपण श्वासाबरोबर बाहेर सोडितों तिचाही प्रकार असाच घडतो. ती सभोंवतालच्या स्वच्छ व ताज्या हवेंत मिसळते; आणि मग जसजशी ती जास्त पसरली जाऊन पातळ होते, त्याप्रमाणें ती अधिकाधिक निरुपद्रवी होते.

( २ ) वारा—कुजणाऱ्या पदार्थांपासून जे घाणवायु निघतात ते वाऱ्याच्या योगानें दूर वाहून जाऊन हवा ताजी व स्वच्छ राहते.

( ३ ) वनस्पति[1]—प्राणी श्वास घेतात तेव्हां आक्सिजन वायूस आंत घेतात; आणि श्वास सोडितात तेव्हां त्याबरोबर कार्बानिक आसिड वायूस बाहेर टाकितात. तथापि दिवसा झाडें ह्मणजे वनस्पति कार्बानिक आसिड वायूंतील कार्बान यास वेगळें काढून शोषण करितात, आणि आक्सिजन यास हवेंत टाकितात. ही क्रिया हवा स्वच्छ राहण्यास मोठें साधन आहे. रात्रीं झाडें आक्सिजन शोषण करून कार्बानिक आसिड वायूसच बाहेर टाकितात, हें खरें आहे. परंतु झाडें रात्रीं जितका आक्सिजन शोषण करितात, त्याहून दिवसा जास्त बाहेर टाकितात. असें आहे तरी ज्या खोलींत झाडें[2] आहेत अशा खोलींत निजणें चांगलें व हितकर होणार नाहीं.

वायूंच्या एकमेकांत पसरण्यानें, व वाऱ्याच्या वाह-

---

१. झाडें, झुडपें, रोपे, वेल वगैरे सर्व वनस्पतींमध्यें येतात. वनस्पति शब्दाच्या जागीं झाड या शब्दाचाही उपयोग केला आहे, व त्या ठिकाणींही त्याचा अर्थ हाच समजावा. २. उदाहरणार्थ ज्या खोलींत लहान लहान हिरव्या झाडांच्या कुंड्या ठेविलेल्या आहेत अशा खोलींत.

ण्यानें, आणि हिरव्या जिवंत झाडांच्या योगानें हवा स्वच्छ होते. पावसाचाही हवा स्वच्छ करण्याच्या कामीं उपयोग होतो.

---

## ( ४ ) ताजी व स्वच्छ हवा कशी मिळवावी.

११. स्वच्छ हवेची केवढी योग्यता आहे, हें वर सांगितलें. शरीरांतून व कुजणाऱ्या पदार्थांतून जीं अपकारक द्रव्यें बाहेर पडतात, त्यांस स्वच्छ हवा नाहींशी करिते; व आपणास निरोगी व बळकट ठेवण्यास फार उपयोगी पडते.

मिळेल तितकी पुष्कळ स्वच्छ व ताजी हवा मिळविण्याकरितां खटपट करावी. दिवसास आपण पुष्कळ वेळ बाहेर असतों, परंतु रात्रीं नेहमीं घरांत निजतों. याकरितां मुख्यत्वें रात्रीस बाहेरील स्वच्छ हवा आपणास मिळावी हें फार जरूरीचें आहे. ती घरांत कशी आणावी, हें घरांविषयीं लिहितांना सांगण्यांत येईल.

उकिरडा व कुजणारे पदार्थ यांच्या योगानें आपल्या आजूबाजूची हवा न बिघडेल अशी तजवीज ठेवावी. यांपासून जरी ताबडतोब आपणास मरण येत नाहीं, तरी त्यांपासून इजा होते. कडक विषानें तत्काळ मरण येतें; परंतु त्याचा यत्किंचित् अंश पोटांत घेणें हें सुद्धां मूर्खपणाचें काम आहे. त्याचप्रमाणें जवळपासची हवा बिघडूं देणें हें वेडेपणाचें कृत्य आहे.

ज्यांची तबियत बरी असते, त्यांच्या पेक्षां दुखणेकऱ्यांच्या योगानें हवा फार जल्द बिघडते. ह्मणून दुखणेकऱ्यांस स्वच्छ हवेचा पुरवठा जास्त लागतो.

**आपल्या सभोंवार पुष्कळ स्वच्छ हवा असावी, इतकेंच नाहीं, तर पुष्कळ स्वच्छ हवा आपल्या शरीरांत**

गेली पाहिजे. स्पंजाचा किंवा कपड्याचा तुकडा आंवळून किंवा दाबून धरिला नाहीं, तर तो पुष्कळ पाणी ओढून घेतो; परंतु त्यासच जसजसें दाबावें तसतसें त्यांत कमी पाणी राहतें. अशीच आमच्या फुप्फुसांची स्थिति आहे. फुफ्फुस जसे कमी दाबले जातील, त्याप्रमाणें ते जास्त हवा शोषण करितात, व तेणेंकरून रक्तशुद्धि अधिक चांगली होते. लिहितांना किंवा काम करितांना मनुष्यांनीं फार वाकूं नये; कारण येणेंकरून फुफ्फुस दाबले जाऊन त्यांत हवा शिरण्यास प्रतिबंध होतो. नेहमीं आपलें शरीर ताठ ठेवणें हें शरीर प्रकृति चांगली राहण्यास जास्त उपयोगी आहे.

## २. निर्मळ पाणी.

### ( १ ) पाण्याची जरूरी.

१२. प्रत्येक प्राण्यास व वनस्पतीस पाण्याची जरूरी आहे. पाणी मिळालें नाहीं तर दोन्ही मरून जातील. आमच्या शरीराचा बराच भाग पाण्याचा बनलेला आहे. मनुष्याचें वजन जर ७९ शेर भरलें तर त्यापैकीं शरीरांतील पाण्याचें वजन सुमारें ९६ शेर असतें, असें ह्मणण्यास चांगलीं कारणें आहेत. आपण जेवलों ह्मणजे आपल्या पोटांत अन्नाचा कांजी ( पेजे ) सारखा प्रथम रस होतो. त्यापैकीं कांहींसा दुधासारखा जो उपयोगी भाग असतो, त्याचें रक्त होतें; आणि बाकीचा गाळ शरीरांतून बाहेर जातो. रक्त बारीक नळ्यांवाटें शरीराच्या

१. आमाशयांत. जेवल्यावर अन्नपाणी ज्या पिशवींत उतरतें त्या पिशवीस **आमाशय** म्हणतात व या आमाशयांत अन्नाचा रस होतो.

पोषणाकरितां त्याच्या सर्व भागीं फिरतें. जर त्यांत पुष्कळ पाणी नसतें तर रक्त इतकें दाट झालें असतें कीं, त्यास बारीक नळ्यांतून वाहतां आलें नसतें. कारण या नळ्यांपैकीं पुष्कळ नळ्या केंसाहूनही फार बारीक आहेत. जें आपण पाणी पितों तेंही रक्तांत जातें, व त्याबरोबर शरीराच्या प्रत्येक भागास पोंचतें. जर पाणी वाईट असलें, तर आपल्या शरीरप्रकृतीस फार अपाय होतो.

चांगल्या पाण्याची योग्यता किती आहे, हें बहुतेकांस थोडें बहुत माहीत असतें. परक्या ठिकाणीं गेल्यावर मनुष्यास दुखणें आलें तर तो तेथच्या पाण्यामुळें आलें असें बहुधा ह्मणतो. परंतु आपलीं गांवें सोडून न जातांही पुष्कळ मनुष्यांस वाईट पाण्यापासून दुखणीं येतात. पुष्कळ आजार या रीतीनें उत्पन्न होतात. स्वच्छ हवेची जशी जरूरी आहे त्याप्रमाणेंच निर्मळ पाण्याचीही आहे.

स्वच्छ करण्यास व धुण्यासही पाण्याचा उपयोग होतो. आपण आपलीं शरीरें पाण्यानें धुतों. पावसानें झाडांस शिंपणें होतें, व त्यांच्या मुळांस ओलावाही मिळतो. पावसाचें पाणी जमिनीवरून वाहतें व त्याबरोबर पुष्कळ घाण निघून जाते.

## ( २ ) पाणी कोठून मिळतें.

१३. ( १ ) पाऊस—पावसानें पाण्याचा मोठा पुरवठा होतो; सर्व नद्यांचें पाणी समुद्रांत जातें; तथापि समुद्र कधीं अगदीं तुडुंब भरत नाहींत. कारण ज्या ठिकाणाहून नद्यांस पाणी येतें त्याच ठिकाणीं तें पुनः परत जातें.

सूर्याच्या उष्णतेनें पाण्याची वाफ होऊन ती वर

जातें, आणि तेथें थिजून तिचें दहिंवर, पाऊस, अथवा हिम ( बर्फ ) होतें. पाऊस पडला ह्मणजे त्यापैकीं कांहीं जमिनीवरून नद्यांत व तळ्यांत वाहात जातो, आणि बराच भाग जमिनींत जिरतो, व तेणेंकरून जमीन ओली होते; आणि विहिरी व झरे यांस जमिनींतून पाझरून पाणी येतें. हिमालयाच्या माथ्यासारख्या ज्या ठिकाणीं थंडी फार असते तेथें पाणी हिमोच्या ( बर्फाच्या ) रूपानें पडतें, व तेंही उष्णकाळांत वितुळतें.

पावसाळ्यांत नद्यांस पूर येतात; व तळीं आणि विहिरी यांसही पाणी चढतें. उन्हाळ्यांत नद्या व तळीं यांचें पाणी कमी होतें, किंवा तीं अगदीं आटून कोरडीं पडतात.

पाणी नद्यांतून समुद्रांत जातें; तेथें त्याची वाफ होऊन ती वर जाते. वर गेलेली वाफ थिजून खालीं पावसाच्या रूपानें पडते, आणि पावसाचें पाणी पुनः समुद्रांत जातें. हें रहाटगाडगें एकसारखें चाललेलें आहे. पाऊस पडतो तेव्हां त्याचें पाणी बहुतेक शुद्ध असतें. कधीं कधीं छपरावरून आलेलें पाणी स्वच्छ ह्मणून गोळा करितात. परंतु धुरळा, पक्ष्यांच्या लेंड्या, व दुसरी घाण वगैरे मिसळून हें पाणी कांहींसें घाण झालेलें असतें; आणि धाब्याचें किंवा गच्चीचें घर असलें ह्मणजे असें नेहमीं हटकून घडतें. पावसाचें पाणी जमिनीवरून वाहतांना त्यांत माती व कुजणारे पदार्थ मिसळतात.

१४. ( २ ) नद्या. बहुतेक मोठ्या नद्यांचें पाणी चांगलें असतें. पावसाळ्यांत जमिनीवरील माती पाण्याबरोबर

१. पाणी गोठून घट्ट झालें म्हणजे त्यास बर्फ म्हणतात. गोठलेलें पण दलदलीत असें जें पाणी पडतें त्यास हिम हें नांव दिलें आहे. हिमालय हें नांव त्याच्या माथ्यावरील हिमावरूनच पडलें आहे.

नद्यांत वाहात जातें, व त्यांचें पाणी राड व गढूळ होतें. हें पाणी कांहीं वेळ न हालवितां स्थिर ठेविल्यास निवळ होतें; किंवा त्यांत थोडी तुरटीची पूड घातली किंवा निवळीची बी उगाळून लाविली ह्मणजे पाणी तावडतोब निवळ होतें. दलदलीच्या जाग्यांतून किंवा जंगलांतून जें पाणी येतें, तें जरी स्वच्छ दिसलें, तथापि त्यांत साधारणपणें कुजलेल्या वनस्पतींचीं द्रव्यें असतात; व असल्या पाण्यापासून ताप येण्याचा फार संभव असतो. अशा ठिकाणीं जर दुसरें पाणी मिळण्याचा संभव नसला, तर तें पाणी प्रथम कढवावें, आणि नंतर प्यावें. ह्मणजे कुजलेल्या वनस्पतींच्या द्रव्यानें विष येणेंकरून नाहींसें होतें.

नद्यांत कपडे किंवा गुरें धुण्यानें त्यांचें पाणी नासतें. ज्या ठिकाणीं पिण्यास पाणी भरितात त्या ठिकाणीं हें करूं देऊं नये. कपडे किंवा गुरें धुण्याची जागा पिण्यास पाणी भरण्याच्या जाग्याच्या खालच्या बाजूस असावी.

नदीच्या कांठीं किंवा नदीच्या वाळवंटांत लोक पुष्कळ वेळां शौचास बसतात; व पावसानें ती सर्व घाण धुवून प्रवाहांत जाते. जे लोक पटकीच्या किंवा देवीच्या आजारानें मरतात, त्यांचीं प्रेतें सुद्धां कधीं कधीं नद्यांतच टाकितात; आणि तसेंच जीं प्रेतें नद्यांच्या कांठीं जाळतात, त्यांची राखही त्यांत टाकितात. कधीं कधीं नद्यांतच केरकचरा व घाणही टाकितात.

या रीतीनें मोठमोठ्या नद्यांचें सुद्धां पाणी बिघडतें. परंतु ज्या कित्येक ठिकाणीं लहान सहान ओढे असतात व ज्यांचें पाणी चांगलें वाहात सुद्धां नसतें, अशा ओढ्यांचें

पाणी तर या रीतीनें फारच बिघडतें. वाहतें पाणी हवेनें हळू हळू स्वच्छ होतें.

गांवालगतच्या नदीचें पाणी लोकांकडून स्वच्छ राखविण्यासाठीं होईल तितका बंदोबस्त करणें अवश्य आहे.

१८. तळीं—तळ्यांचें पाणी वाहात नसल्यामुळें सहज नासतें; ह्मणून तळीं स्वच्छ ठेवण्याविषयीं म्हटलें असतां लोकांनीं काळजी घ्यावी. परंतु या विषयींही लोकांचा अलगर्जीपणा वारंवार नजरेस येतो. लोक त्यांत स्नान करितात, तोंडें धुतात, थुंकतात, कपडे धुतात, खरकटीं भांडीं घांसतात, आणि तळ्याचे कांठीं शौचास बसून पाणी घेण्याला तळ्यांतच जातात. गुरें व डुकरें त्यांत बसतात. कधीं कधीं अंबाडी, ताग वगैरे त्यांत भिजत घालून कुजत ठेवितात. तथापि त्यांतीलच पाणी पिण्याकरितां व सैंपाकाकरितां लोक घेतात.

उन्हाळ्यांत जीं तळीं अगदीं कोरडीं पडतात, किंवा जीं फार आटतात, अशा तळ्यांचें पाणी पिण्यास चांगलें नसतें. घरांजवळ जीं लहान सहान तळीं व डबकीं असतात, तीं होतां होईल तितकीं भरून टाकावीं; आणि फक्त पिण्याच्या पाण्याकरितां एक मोठें खोल तळें खेड्याच्या सर्व लोकांकडून खणवावें; यापासून फार हित होईल. तळ्यांत मासे व जिवंत वनस्पति असतील, तर त्यांपासून पाणी फार चांगलें राहतें. परंतु वाळला पाला व कुजलेलीं झाडें पडलीं तर मात्र पाणी बिघडतें. तळ्याजवळ कोणत्याही प्रकारची घाण करूं देऊं नये. कारण ती पावसानें धुपून तळ्यांत जाते; किंवा जमिनींत मुरून तळ्यांत झिरपते.

साचेल तर आंघोळीकरितां, धुण्याकरितां, आणि गुरांकरितां दुसरें एक मोठें तळें करावें. परंतु याचें सुद्धां पाणी चांगलें व स्वच्छ राखणें इष्ट आहे. याण पाण्यांत कपडे धुतले तर त्यापासून अपकार होतो. मनुष्यांप्रमाणें जनावरांचेंही स्वच्छ पाण्यापासून हित होतें. वाईट पाण्यापासून गुरांस जंत व दुसरे रोग होतात.

नद्या व नळीं यांच्या कांठीं जवळच लहान विहिरी खटल्या तर त्यांचें पाणी चांगलें असतें. जमिनींतून पाणी झिरपून आल्यामुळें तें स्वच्छ होतें.

१६. विहिरी—ज्या विहिरींचे झरे जमिनींत फार खोल असतात, त्यांचें पाणी बहुतकरून चांगलें असतें. जमिनीवरचें पाणी ज्या विहिरींत जातें त्यांचें पाणी बहुधा वाईट असतें. जमिनींत गुरांचीं गुरें मलमूत्र वगैरे घाण असत गेल्यामुळें अशा पृष्ठभागच्या जमिनींतून गेलेलें पाणी बिघडतें.

हिंदुस्थानांतील विहिरींमध्यें साधारण दोष हा असतो कीं, त्यांत जमिनीवरचें पाणी जाऊं देतात. कधीं कधीं विहिरीभोंवतीं धक्का सुद्धां नसतो, आणि सभोंवतीं जमीन खोलगट असून खळगेही असतात; यामुळें जें पाणी कांठीं सांडतें तें त्यांत जमतें; व जमिनींतून झिरपून विहिरींत उतरतें. याप्रमाणें माती व गुरांचें शेण, मूत, वगैरे घाणेरडे पदार्थ विहिरींत जातात.

ह्मणून विहिरीच्या सभोंवतीं नेहमी धक्का असावा; व तेथून सभोंवार जमीन उतरती होत गेलेली असावी, ह्मणजे विहिरीच्या कांठीं पाणी सांडल्यास तें विहिरींत न जातां दूर वाहून जाईल. धक्क्यासभोंवतीं विटांचे तुकडे व चुना यांची चुनेगच्ची जमीन केल्यापासून फार हित होतें.

विहिरीजवळ आंघोळ करण्याची व धुण्याची मनाई असावी. विहिरीजवळ कोणतींही झाडें नसावीं. कारण त्यांचा पाला पाण्यांत पडतो व कुजतो. विहिरीच्या तोंडावर झांकण केल्यानें तिजमधील पाण्याचा मोठा बचाव होतो.

विहिरीचें पाणी काढण्यास स्वच्छ भांडीं व स्वच्छ दोर घ्यावे. मधून मधून विहिरी उपसून त्यांमध्यें जे फुटक्या मडक्यांचे तुकडे पडतात, व जी घाण पडते ती काढून टाकावी.

मोऱ्यांतील, व खाळकुळ्यांतील—ह्मणजे घाण पाणी सांचविण्याच्या डबकांतील—घाण ही मुख्यत्वें फार अपकारक असते. मोऱ्यांतील आणि लोकांच्या मैलांतील कुजलेले पदार्थ ज्या पाण्यांत असतात, असें पाणी पिण्यापासून कित्येक मोठे भयंकर रोग उत्पन्न होतात. विहिरीजवळ खाळकुव असल्यास त्यांतील सगळी घाण काढून ते बुजवून टाकावें. विहिरीजवळ कोणत्याही प्रकारची घाण असली तरी तिजपासून पाणी बिघडतें. कारण सर्व प्रकारच्या दुर्गंध वायूंस पाणी शोषून घेतें.

## ( ३ ) पाणी शुद्ध करणें, गाळून घेणें वगैरे.

१७. जें पाणी दिसण्यांत अगदीं स्वच्छ व निर्मळ असतें, ज्यास रुचि नसते व वास येत नाहीं, आणि ज्यांत कुजलेले पदार्थ नसतात, तें पाणी चांगलें असें समजावें. ज्या पाण्यांत फार चुना किंवा दुसरे खनिज[1] पदार्थ विर-

१. खाणींतून किंवा जमिनींतून काढलेले. मुख्यत्वें खडू, प्लास्टर आफ पारिस (चुन्याचा सल्फेट), मग्निशीअम धातूचे कार्बोनेट व सल्फेट यांच्या योगानें पाणी कठीण होतें. हे पदार्थ ज्यांत नसतात तें पाणी बहुधा मृदु असतें. कठीण पाण्यांत साबू न विरघळतां त्याचें चोथा पाणी होतें व फेंस येत नाहीं. मृदु पाण्यांत साबू विरघळून फेंसाळतो.

वळलेले असतात, त्या पाण्यास जड किंवा कठीण पाणी असें ह्मणतात. ज्या पाण्यांत खनिज पदार्थ मुळींच नसतात, किंवा असले तर फार थोडे असतात, त्यास हलकें किंवा मृदु पाणी असें ह्मणतात. हलकें किंवा मृदु पाणी सैंपाक करण्यास व धुण्यास उत्तम होय.

इंग्लंडांतील सर्व मोठ्या शहरीं रस्त्यांत नळ टाकून त्या नळांतून स्वच्छ पाणी आणलेलें आहे. हिंदुस्थानांतील कांहीं शहरांत याप्रमाणें प्रस्तुत पाणी आणलेलें आहे; आणि हळू हळू दुसऱ्या शहरांतही अशी तजवीज होईल.

शुद्ध व निर्दोष पाणी मिळविण्यास नेहमीं खटपट करावी, व तें स्वच्छ ठेवावें. जेव्हां स्वच्छ पाणी मिळणार नाहीं, तेव्हां फिल्टरांतून[१] ह्मणजे गाळण्याच्या यंत्रांतून गाळल्याशिवाय, किंवा कढवून थंड केल्याशिवाय पाणी कधीं पिऊं नये. फिल्टरांतून गाळण्यापूर्वी पाणी कढविल्यास फार चांगलें. साधा फिल्टर ह्मणजे पाणी गाळण्याचें यंत्र सहज करितां येतें. एक लांकडी किंवा वेळवाची चौकट करून तिजवर एकावर एक अशीं दोन मडकीं ठेवावीं. वरच्या मडक्याच्या बुडास एकदोन लहान भोंकें पाडावीं आणि तें अर्धें स्वच्छ वाळू व स्वच्छ कोळसे यांच्या थरांनीं भरावें. जें पाणी गाळून स्वच्छ करावयाचें आहे, तें हळू या वरच्या मडक्यांत ओतावें, ह्मणजे तें वाळू व कोळसे यांमधून सोखून जाऊन खालच्या भांड्यांत थेंबथेंब उतरतें. खालच्या मडक्याच्या तोंडावर एक उथळ परळ ठेवून वरील मडक्यांतलें पाणी

१. फिल्टर ह्मणजे पाणी गाळण्याचें यंत्र वाळू व कोळसे यांचें मुख्यत्वें केलेलें असतें.

खालीं पडण्यासाठीं त्यास लहान भोंकें पाडावीं. येणेंकरून पाण्यांत केरकचरा पडत नाहीं. मडक्यांतील वाळू व कोळसे वरचेवर ( निदान महिन्यांतून एकदां ) स्वच्छ करावे.

पिण्यास पाणी हाच पदार्थ उत्तम होय. पाणी तहान भागवितें, व कांहीं अपकार करीत नाहीं. दारू व दुसरे पिण्याचे मादक पदार्थ लटकी तहान उत्पन्न करितात, आणि जसजसे हे पदार्थ जास्त प्यावे, त्याप्रमाणें अधिकाधिक पिण्याविषयीं इच्छा उत्पन्न होते. पुष्कळ लोक यांच्या[1] सेवनानें धुळीस मिळाले आहेत. यास्तव यांस कधीं न शिवणें हें उत्तम.

## ( ४ ) आंघोळ करणें.

१८. आंघोळ करण्याची जरूरी.—शरीरांतील मळ जितका लवकर बाहेर जाईल तितका घालविण्याविषयीं नेहमीं शरीराचा यत्न चाललेला असतो. श्वासाबरोबर एक रीतीनें मळ बाहेर जातो; व त्वचेंतून ह्मणजे अंगावरच्या कातडींतून दुसऱ्या रीतीनें बाहेर जातो.

जीं सर्व शहरें चांगलीं वसविलेलीं व रचलेलीं आहेत त्यांस घाण पाणी वाहून जाण्याचीं गटारें असतात. गटारांस स्वच्छ ठेवण्यास उत्तम उपाय म्हटला म्हणजे गटारांतून पाण्याचा प्रवाह वाहूं देणें हा होय. आमच्या कातडीसही अशीं असंख्य गटारें किंवा बारीक [2]छिद्रें आहेत. तीं इतकीं लहान आहेत कीं, नुसत्या डोळ्यांनीं दिसत नाहींत. रुपया एवढ्या जाग्यावर असलीं सुमारें दोन हजार छिद्रें असतील. ह्या छोट्या बारीक छिद्रांवाटे पाणी एकसारखें वाहात

१. हे पदार्थ प्याल्यापासून. २. भोंकें.

असतें; व त्याबरोबर शरीरांतील मळ बाहेर जातो. जेव्हां आपण फार काम करितों तेव्हां नेहमींपेक्षां जास्त पाणी वाहतें, व कातडीवर याचे थेंब जमतात; आणि यासच आपण घाम ह्मणतों. प्रत्येक मनुष्याच्या कातडींतून रोज सुमारें अच्छेर पाणी बाहेर पडतें. कधीं याहूनही जास्त पाणी वाहतें. बाहेर आलेलें घामाचें पाणी स्वच्छ नसतें. दररोज या पाण्याबरोबर सुमारें अर्ध तोळा विषारी मळ बाहेर जातो.

अंग धुतलें ह्मणजे कातडींतलि छिद्रांचीं तोंडें मोकळीं राहतात. जेव्हां घाणीनें हीं तोंडें चोंदतात व शरीरांतील मळ चांगला बाहेर येत नाहीं, तेव्हां खरूज व दुसरे रोग उत्पन्न होतात. अंगाची कातडी स्वच्छ करण्यास साबणाचा चांगला उपयोग होतो.

शरीरांतील मळ अंगावरचे कपडे, गाद्या, गिर्द्या वगैरेंस लागतो किंवा चिकटतो. असले कपडे पुनः तसेच वापरले, आणि यांचें कातडीवर घर्षण झालें तर तोच मळ पुनः शरीरांत जातो, आणि प्रकृति बिघडते. ह्मणून शरीराप्रमाणें कपडे व अंथरुणें धुऊन स्वच्छ ठेविलीं पाहिजेत.

१९. आंघोळ कशी करावी–प्रकृति बरी असली ह्मणजे सर्वांनीं दररोज आंघोळ करावी. साधारणपणें आंघोळ करण्यास सकाळची वेळ उत्तम होय. परंतु ज्यांचें अंग कामानें घाण होतें, त्यांनीं संध्याकाळीं आंघोळ करावी. जेवल्यावर लगेच आंघोळ करणें चांगलें नाहीं. कारण तेणेंकरून अन्न पचण्यास हरकत होते.

आंघोळ करण्यास स्वच्छ पाणी घ्यावें. घाण पाण्यानें आंघोळ केली तर नारवाचे जंतु शरीरांत जातात व नारू

होतात असें मानण्यास जागा आहे. आंघोळ केल्यानंतर अंग खरबरीत पंचानें किंवा रुमालानें चांगलें पुसावें.

तरुण व बळकट मनुष्यांस आंघोळ करण्यास थंड पाणी उत्तम होय. थंड पाण्यानें आंघोळ करून अंग चांगलें पुसल्यावर जर अंगांत कुडकुडी भरेल तर ऊन पाण्यानें स्नान करणें हें प्रकृतीस बरें असें समजावें. ताप किंवा आंव या दुखण्यांतून उठल्यावर फार लवकर थंड पाण्यानें आंघोळ करूं लागल्यामुळें कधीं कधीं तींच दुखणीं पुनः येतात. याकरितां अशा दुखण्यांतून उठल्यावर चांगली शक्ति येईपर्यंत ऊन पाणी आंघोळीस घ्यावें. आंघोळ करतांना जर अंगावर गार वारा घेतला, तर त्यापासून कधीं कधीं ताप येतो.

दुखणाईत मनुष्याचें अंग धुतलें असतां त्यापासून त्यास हुशारी वाटते. शरीराचा एक भाग ऊन पाण्यानें धुऊन पुसावा, व चांगला कोरडा केल्यावर तो भाग हळू चोळून त्यावर कपडे घालावे; आणि नंतर दुसरा भाग धुवावा. याप्रमाणें सर्व अंग स्वच्छ होईपर्यंत करावें.

## ३. चांगलें अन्न.

२०. आपण अन्न कां खातों.—जर आपणास कांहीं अन्न मिळालें नाहीं, तर आपलें शरीर फार क्लेश होत जाईल, आणि अखेरीस आपणास मरण येईल. असें जर आहे तर आपलें मांस कमी होतें तें कोठें जातें? दगडाच्या पुतळ्यास जरी अन्न घातलें नाहीं, तरी तो कृश होत नाहीं. कारण त्यास काम करावें लागत नाहीं; परंतु आह्मांस काम करावें

१. रोड.

लागतें. जो प्रत्येक शब्द आपण बोलतों, व जें प्रत्येक पाऊल आपण टाकितों, त्यानें आपल्या शरीराचा कांहीं अंश नाश पावतो, आणि अन्नानें तितका भरून येतो.

आगगाडीचें यंत्र गाड्यांच्या रांगेची रांग ओढतांना आपण पाहतों. ही राक्षसी शक्ति यंत्रास कोठून येते? या यंत्राचें तोंड मोठें आहे, व त्या तोंडांत वरचेवर दगडी कोळसे किंवा लांकडें आपण टाकितों. यंत्र जणूं काय कोळसे खाऊन टाकितें व तेणेंकरून त्यास काम करण्याचें सामर्थ्य येतें. कोळशांशिवाय यंत्राच्या हातून कांहीं व्हावयाचें नाहीं. त्याचप्रमाणें आपण अन्न खाल्लें ह्मणजे आपणास शक्ति येऊन आपल्याच्यानें काम करवतें. जितका अंश आपल्या शरीरांतून नाहींसा होतो, तितका अन्नाच्या द्वारें शरीरास मिळतो.

अन्नापासून आपणांस शक्ति येते; व शिवाय तें अंगांत उष्णता उत्पन्न करितें. लहानशा विस्तवाप्रमाणें आमच्या पोटांत हें अन्न जळत असतें. मात्र त्याला ज्योत नसते. जर आपण अन्न खाणार नाहीं, तर आपलीं शरीरें अधिकाधिक थंड होत जातील. परंतु चांगल्या अन्नापासून अंगांत जास्त उष्णता उत्पन्न होते. आपल्या शरीरांत रोज इतकी उष्णता उत्पन्न होते कीं, तिच्या योगानें एक मोठेंसें भांडेंभर पाणी आधण येईपर्यंत तापवितां येईल.

**२१. आपण काय खावें.**—निरनिराळ्या जातींच्या अन्नांपासून शरीरावर निरनिराळे परिणाम होतात. ह्मणून जितकें साधेल तितकें निरनिराळ्या जातींचें अन्न खाण्याची वहिवाट ठेवावी.

शरीरांतील झीज भरून काढण्याकरितां, शक्ति येण्याकरितां, आणि शरीरांत उष्णता उत्पन्न करण्याकरितां आपणास अन्न खावें लागतें. आपल्या शरीरास ज्याची अपेक्षा आहे तें सर्व चांगल्या अन्नांत असलें पाहिजे. मुलांच्या पोषणास जें पाहिजे तें सर्व दुधांत असतें; ह्मणून मुलांस लहानपणीं दूध द्यावें. मुलें मोठीं झालीं ह्मणजे त्यांस दुसरें अन्न खाऊं द्यावें.

मनुष्यांचें मुख्य अन्न निरनिराळ्या प्रकारचीं धान्यें होत. यांपैकीं तांदूळ हे सर्वांत कमी पौष्टिक आहेत. गहूं, बाजरी, जोंधळा आणि मका हीं धान्यें फार पौष्टिक आहेत. जीं मनुष्यें हीं धान्यें खातात, तीं नुसता भात खाणाऱ्या लोकांपेक्षां अधिक बळकट असतात व त्यांच्यानें अधिक कसून काम करवतें. तांदुळांत थोडी डाळ मिसळून केलेली खिचडी जास्त पौष्टिक असते. मांस आणि मासे या दोहोंपासून जास्त शक्ति येते.

जे लोक मुख्यत्वें भात, तूप आणि गोड पदार्थ खातात, ते अंगानें लठ्ठ व फोपसे होतात; व त्यांच्या अंगीं कसून काम करण्याची शक्ति नसते. त्यांचे कमी वयांतच केंस पिकतात, आणि त्यांस अनेक रोग होतात. थंड देशांत जास्त उष्णता उत्पन्न करणारें अन्न[१] लागतें. उ-

१. शरीराच्या मांसांत नैत्रोजन वायू असतो. हा वायु हवेंत आहे. या वायूचा एकसारखा खर्च होतो व तो अन्नानें भरून काढावा लागतो. गहूं, जोंधळे, मांस आणि मासे यांमध्यें नैत्रोजन फार असतो तांदुळांत कमी असतो; तेलांत मुळींच नसतो. आमचीं हाडें मुख्यत्वें चुन्याचीं बनलेलीं असतात. ह्मणून आपल्या अन्नांत कांहीं खनिज द्रव्यांची जरूरी लागते.

ण्तेशिवाय दुसऱ्या कित्येक कारणांकरितां शरीरास चरबी-सारख्या स्निग्ध पदार्थांची जरूरी लागते. तथापि फाजील चरबीचा उपयोग केला असतां तिजपासून अपकार होतो.

२२. चांगलीं पिकलेलीं फळें खाण्यास उत्तम होत. परंतु कच्चीं किंवा फार पिकलेलीं फळें खाल्लीं तर त्यांपासून इजा होते. शिजविलेलें अन्न फार वेळ ठेविल्यास तसल्या अन्नापासून शरीरास हित होत नाहीं. कोणत्याही प्रकारचें कुजलेलें अन्न कधीं खाऊं नये.

जेव्हां पटकीची किंवा आमांशाची सांथ असते, तेव्हां अन्नाविषयीं दुप्पट काळजी घेणें जरूर आहे. जें अन्न इतर वेळीं कांहीं इजा करणार नाहीं, तेंच अन्न अशा वेळीं रोग उत्पन्न करील; व त्यापासून कदाचित् मरणही येईल. अशा वेळीं कच्चीं फळें, फार शाकभाज्या, आणि कोणत्याही प्रकारचें लवकर न पचणारें अन्न कधीं खाऊं नये. बेतानें मसालेदार पदार्थ खाल्ले तर त्यांपासून उपयोग होतो. परंतु फाजील खाल्ले असतां त्यांपासून पक्काशयास इजा होते.

या देशांत पानसुपारी खाण्याची चाल फार आहे. परंतु ती चाल वाईट व अपकारक आहे. दांतांस यापासून इजा होते. यानें कधीं कधीं पुळी होते. यानें बराच

---

१. ज्या अन्नाचा लवकर रस होणार नाहीं असें जड अन्न. २. जेवल्यानंतर नुसतो पानसुपारी म्हणजे विडा खाल्ल्यापासून कांहीं इजा न होतां उलट पचनक्रियेस त्याचा उपयोग होतो, असें जुन्या वैद्यकांत सांगितलें आहे. पानसुपारीबरोबर जे तंबाकू खातात त्यांस अनुलक्षून वरील लेख आहे. ३. कित्येक डाक्टर व वैद्य यांकडे तपास करितां पानसुपारी व तंबाकू खाण्यापासून पुळी होते असें म्हणण्यास इकडे आधार आढळत नाहीं. भा.

वेळ व्यर्थ जातो, व बराच पैसा निष्कारणीं खर्च होतो. याकरितां ही सवय लावून घेऊं नये.

कित्येक विशेष प्रसंगीं वैद्यलोक तंबाकू ओढण्यास सांगतात; परंतु तंबाकू ओढण्याच्या सवयीपासून प्रकृतिस कित्येक वेळां इजा होते. यांत जो पैसा खर्च होतो, तो फार चांगल्या रीतीनें दुसऱ्या कारणाकरितां खर्च करितां येईल. लहान व तरुण मनुष्यांस तर मुख्यत्वेंकरून तंबाकू ओढण्यापासून अपकार होतो. यासाठीं ही सवय लावून घेऊं नका; ह्मणजे त्याची जरूरी आहे असें तुह्मांस कधींही वाटणार नाहीं. अफू किंवा भांग खाणें अगर ओढणें यापासून तर फारच अपाय होतात.

अर्धवट शिजविलेलें अन्न शरीरास फार अनिष्टकारक असतें. सैंपाकाच्या भांड्यांतील तांब्याच्या किंवा शिशाच्या विषानें लोक कधीं कधीं आजारी पडतात. यासाठीं हीं भांडीं नेहमीं स्वच्छ ठेवावीं. जर तांब्याचीं भांडीं असलीं तर त्यांस आंतून वरचेवर कल्हई करण्याविषयीं खबरदारी घ्यावी.

**२३. अन्न केव्हां व कसें खावें.**—नियमित काळ मध्यें जाऊं देऊन जेवण करणें हें फार महत्त्वाचें आहे. असें न केलें तर शरीराच्या इतर भागांप्रमाणें पोटास जी विश्रांति पाहिजे, ती मिळणार नाहीं, आणि त्यामुळें जें अन्न आपण खाऊं तें जिरणार नाहीं. नेमल्यावेळींच जेवावें, आणि एकदां जेवल्यावर पुनः जेवण्यापूर्वीं खाल्लेलें अन्न पचन होण्याइतका[1] वेळ जाऊं द्यावा.

काम करण्यास जाण्यापूर्वीं सकाळीं थोडी न्ह्यारी केली

---

१ अन्नपचन होण्यास साधारणपणें ३ पासून ५ तास लागतात. कित्येक पदार्थ फार जलद पचन होतात. भात एका तासांत जिरतो. साबुदाण्यास तीन तास लागतात.

ह्मणजे त्यानें शरीरास बळकटी येते, व ताप न येऊं देण्यासही हें एक साधन होतें. ताजें व उन्हूनीत चांगलें जेवण साधेल तर दोनप्रहरीं, आणि ७ वाजण्याच्या आंत संध्याकाळीं असें दोन वेळां जेवावें. रात्रीं फार उशीरां जेऊं नये. पोटभर जेवण झाल्यावर थोडा वेळ विश्रांति घेतली, तर त्यापासून हित होतें.

अन्न फार कमी मिळाल्यामुळें जितके लोक मरतात, त्याहून अन्न फाजील खाल्ल्यापासून या पृथ्वीवर कदाचित् जास्त लोक मरत असतील. श्रीमंत लोक अनेकवेळां वाजवीपेक्षां फाजील अन्न खातात. गरीब लोकांस बहुधा वाजवीपेक्षां कमी अन्न मिळत असल्यानें, मोठ्या जेवणाचा प्रसंग येतो, तेव्हां ते अधाशासारखें रगडून खाऊन आपणांस इजा करून घेतात. पोटास तडस लागेपर्यंत अन्न कधींही खाऊं नये. त्यापासून फार इजा होते.

अन्न गिळण्यापूर्वीं चांगलें चावलें पाहिजे. चांगलें चावलेलें अन्न लवकर पचतें, व तें जास्त पौष्टिक होतें. जेवतांना पाणी पिणें तें थोडथोडें प्यावें.

## ४. प्रकाश किंवा उजेड.

**२४.** सावटींत ह्मणजे झाडांखालीं किंवा कमी उजेड असलेल्या ठिकाणीं झाडें लाविलीं तर तीं फिकट, खुरटीं व रोगट दिसतात. त्यांचा नेहमीं उजेडांत ह्मणजे उघड्या जागेंत येण्याचा झोंक असतो. हीच गोष्ट मनुष्यांसही लागू आहे. जे लोक उजेड नसलेल्या अशा कोंदट जाग्यांत राहतात, ते फिकट व अशक्त असतात, व त्यांस अनेक रोगही होतात. त्यांच्या मनावर सुद्धां वाईट परिणाम होतात.

खरोखरच प्रकाश हा फार सुखकारक आहे. उजेड पाहिल्यानें मोठा आनंद होतो. पिंजऱ्यांतील पक्ष्यांनीं गाऊं नये, असें तुमच्या मनांत आलें तर त्यांच्या पिंजऱ्यावर कपडा घालून त्यांस झांका. पक्षी जेव्हां सुखांत व आनंदांत असतात, तेव्हां मात्र शब्द करितात व गातात. त्यांस अंधेरांत ठेविलें ह्मणजे ते खिन्न दिसतात, व त्यांची हुशारी जाते. आभाळ येऊन जिकडे तिकडे काळोखी येते त्यापेक्षां जेव्हां आकाश निरभ्र होऊन स्वच्छ ऊन पडतें, तेव्हां आपणास अधिक हुशारी वाटते. जे लोक आजारांतून बरे होत असतात, ते उघड्या हवेंत फिरूं लागले ह्मणजे त्यांस प्रकाशानें शक्ति येऊं लागते, असें दिसतें.

अंधेर असलेलें घर नेहमीं रोगट असतें. अशी ह्मण आहे कीं, 'ज्या ठिकाणीं प्रकाश शिरत नाहीं, तेथें वैद्याचा शिरकाव हटकून होतोच.' घर स्वच्छ ठेवण्यास सूर्याच्या उजेडाचा फार उपयोग होतो. सामानसुमान घाण झालें तर उजेडांत दिसतें, व तें स्वच्छ करण्याची आपणास आठवण होते. सर्प, कीड, मुंगी वगैरे उजेडांत राहत नाहींत. अंधेर असलेल्या कोंदट जाग्यांत बायकांस ठेवणें ही फार वाईट व क्रूर चाल आहे. येणेंकरून त्यांची प्रकृति खराब होते, व त्यांचीं मुलेंही अशक्त होतात.

शरीरप्रकृति चांगली राहण्यास जरी प्रकाश पाहिजे, तरी सूर्याचें कडक ऊन जर अंगावर घेतलें तर त्यापासून आजार उत्पन्न होतो. उन्हांत मुलें हिंडल्यानें त्यांचीं डोकीं दुखूं लागतात. ज्यांस नेहमीं शेतांत काम करण्याची सवय आहे, त्यांस कदाचित् इजा होणार नाहीं; परंतु इतरांस कडक उन्हांत बाहेर फिरण्याचा प्रसंग आला तर त्यांनीं

डोक्यावर रुमाल किंवा पागोटें घालून डोक्याचा बचाव करावा, व छत्रीही घ्यावी.

## ५. योग्य कपडे.

२५. हवा जशी बदलेल त्याप्रमाणें कपडेही बदलले पाहिजेत. उत्तर हिंदुस्थानांत उन्हाळ्यांत व हिंवाळ्यांत जसा फरक असतो, तसा दक्षिण हिंदुस्थानांत नसतो. हिंवाळ्यांत चांगले गरम कपडे न मिळाल्यामुळें पुष्कळ लोक बंगाल इलाख्यांत मरतात. गार वारा त्यांच्या अंगास झोंबतो; आणि तेणेंकरून त्यांस ताप येतो. फलालीनची ( किंवा दुसऱ्या गरम कापडाची ) पैरण किंवा बंडी अंगांत असली ह्मणजे थंडीपासून फार बचाव होतो. गरीब लोक ह्मणतील कीं, आपणांस योग्य व चांगले कपडे घेण्याचें सामर्थ्य नसतें; परंतु जेव्हां त्यांस दुखणें येतें, तेव्हां त्यांस कपड्यांपेक्षांही जास्त खर्च करावा लागतो. दागिन्यांपेक्षां चांगले कपडे घेण्यामध्यें पैसा खर्च करणें हें अधिक चांगलें.

शरीराचे फार नाजूक भाग ह्मटले ह्मणजे डोकें आणि आंतडें हे होत. चांगलें पागोटें किंवा रुमाल अगर फेटा घातल्यानें उन्हापासून डोक्याचा बचाव होतो. धोतराचें अनेक वेढे मुख्यत्वें रात्रीच्या वेळीं पोटासभोंवतीं गुंडाळल्यास आजारापासून मोठा बचाव होतो. जेव्हां ऋतु

१. पक्काशयास जोडलेली एक लांब नळी वेंटाळ्यासारखी पोटांत असते तिला आंतडें ह्मणतात. याचें एक तोंड पक्काशयास व दुसरें मलद्वारास जोडलेलें असते. पक्काशयांत अन्नाचा रस होऊन आंतड्यांत उतरतो,व तेथें पित्तादि रसांशीं संयोग वियोग होऊन कांहीं रस रक्तवाहिन्या व शोषकवाहिन्या शोषून घेतात आणि जाडेभरडे पदार्थ, मलाच्या रूपानें बाहेर पडतात. भा.

बदलतात, तेव्हां विशेष काळजी घेणें जरूर असतें. एके दिवशीं फार गर्मी होते व लगेच दुसऱ्या दिवशीं गारठा पडतो, असे दिवस एका मागून एक असे कधीं कधीं लागोपाठ येतात, त्या वेळीं जपलें पाहिजे. हवेंत गारठा असला ह्मणजे दुखणें येण्याचा फार संभव असतो. अशक्त मुलांस थंडीपासून वारंवार विकार होतो.

फाजील कपड्यांपासूनही इजा होते. उदाहरणार्थ जड पागोटें किंवा रुमाल.

जे कपडे दिवसां आपण अंगांत घालितों तेच रात्रीं घालूं नयेत. अंगाचा घाम जो कपड्यांस लागला असेल तो याप्रमाणें वाळूं दिला पाहिजे, आणि सर्व कपडे स्वच्छ ठेविले पाहिजेत. अंगावरचे कपडे भिजले असतां तसेंच बसलें किंवा निजलें तर त्यापासून फार अपकार होतो. जर भिजलेले कपडे बदलून दुसरें घालतां येत नसतील, तर ते वाळेपर्यंत इकडे तिकडे फिरत राहावें.

## ६. व्यायाम.

२६. व्यायामाचा उपयोग—व्यायामापासून जें हित होतें, त्याविषयीं आतां थोडेंसें सांगूं. आमच्या शरीराच्या ज्या मांसाळ भागांच्या योगानें आह्मांस हालचाल करितां येते त्यांस स्नायु[१] ह्मणतात. स्नायूंकडून योग्य रीतीनें काम

१. हाडांचे सांधे एकमेकांस जुळविण्यास जे बारीक दोर असतात त्यांसच प्राचीन हिंदुवैद्यकांत स्नायु ही संज्ञा आहे. परंतु कातडीच्या आंतल्या बाजूस जे तंतुमय मांसाचे थर व पेड आहेत त्या मांसाळ भागांस अलीकडे स्नायु ही संज्ञा देतात. यांच्या अंगीं लांब व आंखूड होण्याची विलक्षण शक्ति असल्यामुळें यांच्यायोगानें शरीरांतील सर्व हालचाल घडते. भा.

घेतलें तर ते मोठे व बळकट होतात. परंतु जर त्यांजकडून काम करविलें नाहीं, तर ते बारीक व कमजोर होतात. जो बैरागी आपला उजवा हात बारीक होऊन वाळून जाईपर्यंत नुसता वर धरितो, त्याच्या उजव्या हाताशीं लोहाराच्या उजव्या हाताची तुलना केली, तर वरील गोष्टीचा खरेपणा लक्षांत येईल.

जेव्हां आपण उगाच स्वस्थ बसतों, तेव्हां दर मिनिटास सुमारें १६ वेळ श्वास टाकतों. जेव्हां आपण पळतों तेव्हां श्वासोश्वास झपाट्यानें चालतो, पुष्कळ हवा पोटांत जाते, आणि रक्ताची शुद्धि अधिक चांगली होते. त्याचप्रमाणें अशा वेळीं हृदयाचे ठोकेही अधिक जलदीनें चालून शरीराच्या सर्व भागांस त्यांच्या पोषणाकरितां अधिक रक्त तेथून पोंचतें.

व्यायामापासून आणखी दुसऱ्या रीतीनेंही हित होतें. जेव्हां आपण जलद चालतों किंवा कसून काम करितों, तेव्हां आपणास घाम येतो. हें पाणी कातडींतून बाहेर येतें, आणि त्याबरोबर शरीराच्या आंतील भागांचा मळ बाहेर जातो; व येणेंकरून शरीरप्रकृति चांगली होते. व्यायाम किंवा मेहनत केल्यावर आमच्यानें जास्त अन्न खाववतें, व तें अधिक चांगलें जिरवितांही येतें.

चांगल्या रीतीनें व्यायाम घेतला, तर आपलें सर्व शरीर बळकट होतें. जे व्यामाय घेत नाहींत ते सुस्त व ढिले होतात; आणि यत्किंचित् थोडे श्रम करणें ह्मणजे त्यांस मोठें ओझें वाटतें. ते स्वतः खिन्न व दिलगीर असतात, व त्यांच्यापासून दुसऱ्यासही कांहीं उपयोग होत नाहीं.

२७. व्यायामाची हयगय—सर्व ठिकाणच्या मुलांस खेळ आवडतात; त्यांपासून नेहमीं त्यांचें हित होतें. पळण्यानें, चेंडू फेंकल्यानें, व दुसऱ्या खेळांनीं त्यांचे हात पाय अधिक घट्ट होतात. ओरडल्यानें किंवा हंसल्यानें सुद्धां त्यांच्या प्रकृतीस हितच होतें.

कित्येक मुलें खेळ खेळण्यासाठीं आपले धडे मुद्दाम चुकवितात, व कांहीं मुलें फार थोडा व्यायाम घेतात. या देशांत पुष्कळ शाळांत मुलांस फार वेळ ठेवितात व त्यांस एकाच बैठकीवर राहावें लागतें. शाळेंत मुलांनीं बसावें व केव्हां केव्हां उभेंही राहावें.

युनिव्हर्सिटीच्या परीक्षांकरितां जे विद्यार्थी तयारी करितात, त्यांस व्यायाम न मिळाल्यामुळें त्यांच्या प्रकृतीचें मोठें नुकसान होण्याचा संभव असतो. कित्येक विद्यार्थ्यांस वाटतें कीं, आपला सर्व काळ अभ्यासांतच जावा. परंतु ही मोठी चुकी आहे. सुतार आपलीं हत्यारें पाजळण्यामध्यें मधून मधून जो काळ घालवितो, तो व्यर्थ न जातां त्याचा त्यास चांगला उपयोग होतो. मनाचा व्यापार मेंदूच्या योगानें चालतो. व्यायामानें मेंदूस जास्त रक्त पोंचतें, व तो बळकट होतो. जे विद्यार्थी व्यायाम बरोबर रीतीनें घेत नाहींत, ते इतके आजारी पडतात कीं, त्यांच्यानें अखेरीस परीक्षेस सुद्धां बसवत नाहीं, असें कित्येक वेळां घडतें. याप्रमाणें कित्येकांनीं आपणांस जन्माचे अशक्त व दुखणेकरी करून घेतलें आहे.

संध्याकाळीं क्रिकेटनें किंवा चेंडूनें खेळणें हें फार फायदेशीर आहे. दोरीवर झोंके घेऊन दोरीच्या झोंपाळ्यावर बसून खेळणें हें मुलींस फार चांगलें आहे. वि-

धार्थ्याप्रमाणेंच जे कारकून सारा दिवस लिहीत बसतात, त्यांसही व्यायामाची जरूरी आहे.

जेव्हां पोटांत कांहीं नसतें, अशा रिकाम्या पोटीं आणि चांगलें जेवण झाल्यावर लगेच भरल्या पोटीं व्यायाम कधीं घेऊं नये.

## ७. झोंप.

२८. झोंपेची जरूरी—झोंपेशिवाय आपण जगणार नाहीं. प्राचीन काळीं मनुष्याचा वध करण्याचा असा एक क्रूर मार्ग होता कीं, त्यास निजूं देत नसत.

सारा दिवसभर आपण काम करीत असलों ह्मणजे रात्रीं थकतों. शरीर व मन या दोहोंसही विसावा लागतो. आपण कोणतेंही काम केलें तरी शरीर थोडेंबहुत झिजतें, आणि ही झीज रात्रीं झोंपेंत मुख्यत्वें भरून येते. सारा दिवस विहिरीचें पाणी काढिलें तर तें खोल जातें. परंतु रात्रीं पुनः तींत जास्त पाणी जमतें. रात्रीं चांगली झोंप घेतली ह्मणजे आपण सकाळीं अगदीं ताजे तवाने होऊन उठतों. बळकट व निरोगी राहण्यासाठीं आपणांस जरूर तितकी झोंप अवश्य घेतली पाहिजे.

२९. झोंपेविषयीं सूचना—गरीब लोकांस कधीं कधीं फार थोडी झोंप मिळते; आणि श्रीमंत लोक अनेक वेळां फार वेळपर्यंत बिछान्यावर लोळत पडतात. मोठ्या मनुष्यांपेक्षां लहान मुलांस जास्त झोंपेची जरूरी असते. अगदीं तान्ह्या मुलांस बहुतेक सारा दिवसभर निजवावें. १२ वर्षांच्या मुलांनीं सुमारें ९ तास झोंप घ्यावी. थोर मनु-

त्यांस सुमारें ७ तास झोंप बस होते. कित्येकांस जास्त झोंपेची जरूरी असते, आणि कित्येकांस थोडी झोंप पुरते.

रात्र ही निजण्यास उत्तम वेळ होय. १० वाजल्या-उपरांत जागूं नये, आणि उजाडल्याबरोबर उठावें. जो लवकर निजतो व लवकर उठतो, तो निरोगी, श्रीमान्, आणि शहाणा असा होतो. चांगली झोंप येण्याचा उत्तम मार्ग ह्मटला ह्मणजे दिवसभर उद्योग करणें हा होय.

चांगलें पोटभर जेवण जेवल्यावर लागलेंच कधीं निजूं नये. असें केल्यास झोंप चांगली लागत नाहीं, व वाईट स्वप्नें पडतात. पोटांत एकसारखी पचनाक्रिया चाललेली असते; आणि यामुळें मेंदूस विश्रांति मिळत नाहीं. मनांत ज्या रिकामटेकड्या कल्पना घोळत असतात, त्यांचीं स्वप्नें पडतात; आणि त्यांमध्यें कांहीं अर्थ नसतो. स्वप्नें काय पडलीं याचा विचार कधीं करूं नये. मेंदूस बरोबर विश्रांति मिळत नाहीं, एवढें मात्र त्यांवरून दिसतें.

जमिनीपेक्षां बिछान्यावर निजणें अधिक चांगलें होय. होईल तितकें करून जमिनीवर निजण्याचा प्रसंग टाळावा. जेव्हां जमीन कोरडी असते, व आसपास तापाचा आजार नसतो, तेव्हां त्यापासून कदाचित् इजा होणार नाहीं. परंतु जेव्हां जमीन सर्द असते, तेव्हां अंग दुखूं लागतें, किंवा दुसरा कांहीं तरी आजार होतो. ज्या वाईट हवेनें ताप येतो ती नेहमीं भुईजवळ सखल जागीं असते, आणि थोड्या उंचीचा जरी बिछाना असला तरी तिला शरीरा-पर्यंत पोंचण्यास प्रतिबंध होतो. जे जमिनीवर निजतात, त्यांस सर्प वगैरे जे प्राणी रात्रीं भक्ष्याकरितां फिरतात, ते चावण्याचा संभव असतो. जर बिछाना नसेल, आणि

जमीन सर्द असेल, तर जमिनीवर गवत टाकून किंवा वाळलेला पाला पसरून त्यावर निजावें.

पूर्वीं सांगितल्याप्रमाणें बिछान्यांतील कपडे व उशा स्वच्छ ठेवाव्या. नाहीं तर अंगांतील मळ त्यांस चिकटतो, व त्यापासून इजा होते.

३०. रात्रीं पुष्कळ स्वच्छ हवा मिळणें जरूर असतें. कोंदट खोलींत निजल्यापासून तबियत बिघडते. घरांविषयीं लिहितांना याविषयीं जास्त सांगण्यांत येईल.

डोकें घट्ट बांधून व डोक्यावर पांघरूण घेऊन निजण्याची पुष्कळांस वाईट सवय असते. परंतु यापासून ताजी हवा मोकळेपणीं आंत शिरण्यास प्रतिबंध होतो.

या देशाच्या कित्येक भागांत उन्हाळ्यांत लोक उघड्या जागीं निजले तर त्यापासून त्यांस इजा होत नाहीं; परंतु जेव्हां दहिंवर पडतें, तेव्हां उघड्या जागीं निजल्यानें इजा होते, व त्यापासून ताप येतो. अशा वेळीं निजण्याच्या जाग्यावर कांहीं आडोसा असावा.

ज्या ठिकाणीं वाऱ्याचा झोत वाहतो, किंवा जेथें अंगावर वारा येतो, अशा जागीं निजूं नये. वाऱ्याच्या योगानें अंगांतील उष्णता कमी होऊन अनेक वेळां दुखणें येतें. जेथें तापाचा किंवा पटकीचा आजार असतो, तेथें रात्रीं शरीर गरम ठेवणें हें मुख्यत्वें फारच जरूरीचें आहे.

## ८. चांगलीं घरें.

३१. ज्या घरांत आपण राहतों, त्या घरावर आणि त्याच्या सभोंवतालच्या स्थितीवर शरीरप्रकृति फार अवलंबून असते. गोरगरिबांस मिळतील तसल्या घरांत राहावें ला-

गतें. परंतु बहुतेक सर्व घरांस निरोगी व हवाशीर करण्या-करितां कांहीं ना कांहीं तजविजी तरी सहजीं योजितां येतील.

घराची जागा—ज्या जागीं पाणी सांचण्याचा संभव आहे, अशा सखल जागीं घर कधीं बांधूं नये. घर बांधण्यास जी सर्वांत उंच जागा सांपडेल, ती नेहमीं पसंत करावी. दलदलीच्या शेजारीं कधींही घर बांधूं नये. कुजणाऱ्या वनस्पतींपासून जी वाईट हवा निघते, ती हवा, ताप येण्यास जीं मुख्य कारणें आहेत असें समजतात, त्यांपैकीं एक कारण आहे. तळीं किंवा नद्या यांच्या शेजारीं घर बांधणें चांगलें नाहीं. कोरड्या ठिकाणीं सुद्धां घराचें जोतें जमिनीपासून दोन तीन फूट उंच असावें. येणेंकरून पावसाळ्यांत घरांत पाणी शिरत नाहीं, व जमिनीस लोणा येत नाहीं. जमिनीस लोणा आल्यानें अनेक वेळां रोग उत्पन्न होतात. अगदीं गोरगरिबांनीं सुद्धां आपल्या घराच्या जमिनी उंच कराव्या. पावसाचें पाणी सहज वाहून जाण्याजोगें घराचें छप्पर उतरतें ठेवावें.

घरें अशा जागीं बांधावीं कीं त्यांत वारा मोकळेपणीं खेळेल. अरुंद व वांकडे रस्ते आरोग्यास अपकारक होतात. एकाच ठिकाणीं फार दाटी करून घरें बांधूं नयेत.

घरें सवंग मिळतात ह्मणून वाईट ठिकाणीं घरें घेण्याचा लोकांस कधीं कधीं लोभ सुटतो. तथापि अशीं घरें अखेरीस महाग पडतात, असें समजलें पाहिजे. जो थोडासा पैसा भाडें कमी पडल्यानें उरतो, त्याहून दुखण्यापासून पुष्कळ अधिक नुकसान होतें. खालीं लिहिलेली गोष्ट वाचल्यानें सर्द घरांपासून जे अपाय होतात, ते चांगले लक्षांत येतील.

**३२. सर्द घरें**—एके दिवशीं एक बाई दूरच्या

एका खेड्यांत आपल्या बहिणीच्या समाचारास गेली. जेव्हां तिनें घरच्या माणसांच्या प्रकृति कशा आहेत ह्मणून विचारिलें, तेव्हां तिची बहीण ह्मणाली: "आका, काय असेल तें असो, या घरांत आह्मांस बरें भोगत नाहीं; हें आमचें मोठें दुर्दैव आहे. घरधनी तर इतके दुखणाईत आहेत कीं, त्यांस एक पाऊल सुद्धां टाकतां येत नाहीं. मला सर्दी झाली नाहीं असा एकही दिवस सुनका जात नाहीं. शिवाय गेल्या वर्षी आह्मां सर्वांस ताप आला, व त्या वेळीं आमचीं दोन मुलें मेलीं. आह्मी येथें इतके कां हतभागी असावें हें मला समजत नाहीं. या घरांत येण्यास आह्मांस वाईट वेळ लागली असावी, असें मला वाटतें."

बाई ह्मणाली, ताई, तुह्मी दुर्दैवी वगैरे कांहीं नाहीं. अविचारी आणि वेड्या मात्र आहांत. तुमचें घर पाणथळ जमिनीच्या शेजारीं आहे, व या सर्द घरांत राहिल्यामुळें तुमच्या घरच्या माणसांस हीं सर्व दुखणीं आलीं आहेत. जोंपर्यंत तुह्मी येथें राहाल, तोंपर्यंत असें झाल्याशिवाय कधीं राहणार नाहीं.

बहिणीनें उत्तर केलें, आका, तुला खरेंच' कां असें वाटतें! जर तूं ह्मणतेस हें सर्व खरें असेल, तर आह्मी हें घर उद्यां सोडून देतों. परंतु आह्मी कोठेंही गेलों, तरी हीं संकटें आमच्या पाठीमागून येतीलच. कारण जें नशीबीं असेल तें कशानें चुकणार आहे?

तेव्हां त्या विचारी बहिणीनें उत्तर दिलें, ताई, आह्मीं कोठेंही गेलों, तरी आपल्यावरचीं संकटें टळणार नाहींत हें खरें आहे; परंतु वेडेपणानें आपणावर आपण होऊन संकटें आणूं नयेत, हें आपलें कर्तव्यकर्म आहे. तुह्मी

आपल्या शरीरप्रकृतीची हयगय केल्यामुळें तुमच्या घरच्या माणसांवर हीं संकटें कोसळलीं आहेत.

बरीच विनवणी करून त्या बाईनें आपल्या यजमानिणीच्या कुटुंबास तें घर सोडून चांगल्या ठिकाणीं असलेल्या दुसऱ्या घरांत जाण्यास लाविलें; व तेथें सर्वांच्या प्रकृति चांगल्या झाल्या.

**३३. घरांत हवा खेळणें किंवा हवेचा पुरवठा**—घरांत पुष्कळ स्वच्छ हवा खेळावी, ही घरांच्या संबंधानें पहिली जरूरीची गोष्ट आहे. शरीरप्रकृति चांगली राहण्यास ही गोष्ट फार अगत्याची आहे. सोजीर लोकांच्या राहण्याच्या बराकींमध्यें व कैदी ठेवण्याच्या तुरुंगांमध्यें प्रत्येक मनुष्यास अमक्या लांबी रुंदीची जागा असावी, हें फार विचार करून ठरविलेलें असतें. साधेल तर प्रत्येक मनुष्यास ८ फूट लांब आणि ६ फूट रुंद किंवा ४८ चौरस फूट ह्मणजे सुमारें ५। हात लांब व चार हात रुंद किंवा २१ चौरस हात जागा असावी. घरांत मनुष्यांची गर्दी नसावी.

---

१. दर माणशीं जागा किती लागले हें मापण्याच्या दोन रीति आहेतः–( १ ) घनफळानें आणि ( २ ) क्षेत्रफळानें: लांबी, रुंदी, उंची यांचा गुणाकार करून घनफळ काढितात. ह्मणून जर एखादी खोली १० हात लांब १० हात रुंद आणि १० हात उंच असेल तर त्या खोलींतील एकंदर जागा किंवा अवकाश १००० घन हात होईल. क्षेत्रफळ लांबी रुंदीचा गुणाकार करून काढितात. १० हात लांब व १० हात रुंद अशा खोलींत १०० चौरस हात जागा असते. प्रत्येक कैद्यास ६४८ घनफूट ह्मणजे १९२ घन हात जागा देतात. हिंदु शिपायांस ६२ चौरस फूट ह्मणजे १८ चौरस हात जागा देतात. हिंदु कैद्यांस सुमारें ३६ चौरस फूट ह्मणजे १० चौरस हात जागा देतात. परंतु खोल्या उंच असतात व त्यांस हवा खेळण्याचीं झरोकीं पुष्कळ असतात.

ज्या घरांत पुष्कळ स्वच्छ हवा खेळते अशा घरांत राहणाऱ्यांपेक्षां ज्या घरांत लोक फार दाटीनें राहतात, त्या घरांतील लोक दुप्पट लवकर मरतात.

ज्या मानानें स्वच्छ हवा वरचेवर येत असेल त्यावर, प्रत्येक माणसास किती जागा पाहिजे हें फार अवलंबून असतें. खोली लहानच असून जर तींत एकसारखी स्वच्छ हवा येत असेल, तर ती खोली कोंदट अशा पुष्कळ मोठ्या खोलीहूनही शरीरास अधिक हितकारक होते. बहुतेक झोंपड्यांत भिंतींस पडलेल्या भेगा व छपरांतील फटी हवा आंत बाहेर मोकळेपणीं खेळण्यास फार उपयोगीं पडतात.

जीं घरें विटांचीं बांधलेलीं असून भिंतींवर चुन्याचा गिलावा केलेला असतो, त्या घरांत मुख्यत्वें स्वच्छ हवेची कमताई पडते. या प्रकारच्या पुष्कळ घरांस फक्त थोडींशीं लहान झरोकीं मात्र असतात, व तींही रात्रीं अगदीं घट्ट लावून घेतात. कित्येक खोल्यांस झरोकींही नसून एक लहानसें दार मात्र असतें. यास्तव त्या खोलींत निजणाऱ्या लोकांमुळें जी हवा बिघडते, तिला बाहेर जाण्यास चांगला मार्ग मिळत नाहीं, आणि ती वाईट हवा त्या खोलींत जमून राहते.

निजण्याच्या खोलींत हरएक प्रकारची अडगळ किंवा सामान आणि कधीं कधीं धान्यांचीं पोतीं किंवा भांडीं ठेवण्याची वाईट चाल फार आढळते. येणेंकरून हवी तितकी स्वच्छ हवा येण्यास आणखी प्रतिबंध होतो.

**३४.** ज्या खोलींत माणसें राहतात, त्या खोलीस बिघडलेली हवा व धूर बाहेर जाण्यास धुरांडें किंवा दुसरें

कांहीं तरी द्वार असल्याशिंवाय, तेथें कधीं विस्तव पेटवूं नये. जिवंत प्राण्यांपासून जशी हवा बिघडते, तशी विस्तवापासून व दिव्यापासूनही बिघडते.

ज्या खोलींत आपण बसतों किंवा निजतों, त्या खोलीस समोरासमोरच्या बाजूंस निदान दोन खिडक्या असाव्या; ह्मणजे त्यांमधून वारा वाहून हवा खेळेल. फक्त एकच खिडकी असली ह्मणजे हवा मोकळेपणीं खेळूं शकत नाहीं.

विस्तवापासून जसा धूर वर जातो, त्याप्रमाणें जी हवा आपण श्वासाबरोबर बाहेर टाकितों, ती वर जाते. ह्या हवेस बाहेर निघण्याकरितां छपराजवळ झरोके किंवा भोंकें असलीं पाहिजेत. पातळ, चपटे, व अरुंद असे गज आडवे बसवून केलेलीं झडपें[1] खिडक्यांस असलीं ह्मणजे हें काम सहजीं होतें. दारांच्या बाजूंकडील फटींतून कांहीं हवा आंत येते. परंतु दारांच्या तळाशीं थोडीं भोंकें ठेविलीं तर त्यांतून पुष्कळ हवा आंत येईल.

खोलींत असलेल्या माणसांस हवा केव्हां बिघडली, हें समजत नाहीं असें पुष्कळ वेळां होतें. कोणास अफिणीचें विष लागलें म्हणजे त्यास गाढ झोंप येते, व त्या गाढ झोंपेंतून तो कधीं जागा होत नाहीं. कार्बानिक आसिडवायूचा यासारखाच कांहीं प्रकार घडतो. ज्यांच्या शरीरांत श्वासाबरोबर हा वायु जातो तेही बेशुद्ध होतात. एकाद्या खोलींतील हवा असावी तितकी स्वच्छ आहे किंवा नाहीं, हें पाहणें झाल्यास मनुष्यानें बाहेरून खोलींत शिरावें; आणि जर त्यास तेथें कोंदट वास येऊं लागला, तर ते-

---

१. अशा झडपांस इंग्रजींत व्हेनिशिअन म्हणतात.

थील हवा स्वच्छ नाहीं असें समजावें. कारण चांगल्या हवेस कसलाही वास येत नाहीं.

गोषाच्या बायकांस वेगळें ठेवावयाचें असतें, तेव्हां त्यांच्या राहण्याच्या खोल्या मोठ्या असाव्या व त्यांत चांगला उजेड पडत असून हवा भरपूर खेळत असावी.

**३९. घरें स्वच्छ ठेवणें**—दरसाल निदान दोन वेळ घरांस चुना लावावा. चुना हा हवा स्वच्छ करण्याच्या कामांत फार उपयोगी पडतो. मातीच्या भिंती व जमिनी दर आठवड्यास एकदां मातीनें सारवाव्या. परंतु मातींत शेण मिसळूं नये. ओल्या घाणीपेक्षां कोरड्या घाणीपासून पुष्कळ कमी इजा होते. खोल्या व बाहेरील पडव्या चांगल्या झाडाव्या; परंतु रोज सारविल्यानें तेथील हवा दमसर व रोगकारक होते.

**घरांतील केरकचरा**—केळीचीं सोपें व दुसरा केरकचरा घराशेजारीं कधीं टाकूं नये. जेव्हां केरकचरा एकदम दूर नेतां येणार नाहीं, तेव्हां एक मोठा मातीचा रांजण करून त्यांत केरकचरा टाकणें व त्यावर गच्च बसणारें असें झांकण करणें ही व्यवस्था चांगली आहे. दिवसभर केरकचरा या रांजणांत टाकावा, आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं रांजणांतील सर्व कचरा दूर नेऊन टाकावा. कित्येक शहरांमध्यें केरकचरा नेण्याच्या आतां गाड्या झाल्या आहेत. जेथें अशा गाड्या नाहींत तेथें घरापासून कांहीं अंतरावर खळगा खणून त्यांत केरकचरा टाकावा. घरापासून जितकी घाण दूर असेल, तितका कमी उपद्रव होईल. तथापि पुष्कळ लोक घरांचे शेजारींच खळगे खणून त्यांत केरकचरा टाकितात, व तेथेंच कुजूं देतात. चार पावलें

चालण्याचा त्रास पडूं नये ह्मणून अगदीं घराशेजारींच केरकचरा टाकण्याकरितां खळगे करितात; मग घरच्या माणसांसच या वाईट घाणीची इतकी सवय होऊन जाते कीं, त्यांस त्याविषयीं कांहीं वाटत नाहीं. तथापि त्यापासून जे वाईट परिणाम घडावयाचे ते यामुळें बंद होत नाहींत.

सैंपाकाचें गदळ पाणी साचेल तर जमिनींत मुरूं देऊं नये. कारण यानें हवा बिघडते.

तारदखान्यांतील मैल्यापासून जी वाईट घाण येते, ती नाहींशी करण्याचा एक सोपा उपाय आहे. ज्याप्रमाणें कापड पाणी ओढून घेतें, त्याप्रमाणें जी घाण मनुष्यास विषकारक असते, तिला माती शोषून घेते; ह्मणून मैल्यावर कांहीं कोरडी माती टाकावी ह्मणजे घाण लवकरच नाहींशी होते.

कित्येक देशांतील शेतकरी तारदखान्यांतील मैल्याची खताकरितां फार मातबरी समजतात; आणि ह्या देशांतही रयतलोक पुष्कळ वेळां शेतांत गुरांचें शेण पसरतात. ह्या देशांतील पुष्कळ शेतकरी तारदखान्यांतील मैल अमंगळ आहे, असें समजून त्याचा उपयोग करीत नाहींत; परंतु अगदीं घराशेजारीं असली घाण राहूं देणें हें याहून फार वाईट आहे. कारण तेथील घाण त्यांस व त्यांच्या मुलांस नेहमीं उपद्रव देते. खताप्रमाणें त्याचा उपयोग केल्यास मातीनें त्याची शुद्धि होईल; आणि जमीन सुपीक होऊन जास्त पीक देईल.

---

१. मोठमोठ्या शहरीं म्युनिसिपाल कमेट्या तारदखान्यांतील मैल्याचें जें सोनखत करितात, त्याचाही अलीकडे शेतकरी उपयोग करूं लागले आहेत. भा०.

कोरडा केरकचरा जाळावा. त्याच्या राखेचें उत्तम खत होतें, आणि मातीप्रमाणें तिनें घाणही नाहींशी होते.

३६. घराच्या आजूबाजूची स्थिति—साधेल तितकें दुसऱ्या इमारतींनीं घरें कोंडलेलीं नसावीं. घरासभोंवतीं कांहीं छाया देण्यापुरतीं झाडें असावीं; परंतु गोड वारा बंद होईल इतकीं पुष्कळ नसावीं. घराजवळ ठेंगणीं झुडपें दाट वाढूं देऊं नयेत. झाडांचा जो पाला पडतो, तो झाडून कांहीं अंतरावर एका खळग्यांत टाकावा किंवा जाळावा.

घरांत गुरें, घोडीं, किंवा बकरीं बांधूं नयेत. त्यांच्या श्वासोश्वासानें व मलमूत्रानें हवा बिघडते. जर त्यांस घराशेजारीं बांधिलें, तर त्यांची घाण दूर नेण्याविषयीं चांगला बंदोबस्त ठेविला पाहिजे. खताचे उकिरडे घरापासून निदान २०० हातांवर असावेत.

जेथें जमीन उतरती असते, तेथें पाणी लवकर वाहून जाऊन त्याचा निकाल होतो. जेथें जमीन खोल असते तेथें पाऊस पडल्यावर पाणी सांचतें, व ती जागा सर्द व थंड होते. नंतर जेव्हां पुनः ऊन पडतें, तेव्हां पाणी आटून वाळून जातें; परंतु तेथील कुजणाऱ्या केरकचऱ्यापासून फार घाणेरडी व अपकारक अशी घाण येते. ज्या खोल जाग्यांत पाणी सांचतें त्या खोल जागा भरून काढाव्या. पावसाचें पाणी वाहून जाण्यास गटारें असावीं, व तीं वरचेवर स्वच्छ करावीं.

दलदलीच्या व पाणथळ जाग्यांपासून तापाचा आजार फार होतो. त्यांतील पाण्याचा निकाल काढून देणें आणि त्या ठिकाणीं लागवड करणें हेच काय ते यांचा

उपद्रव कमी करण्याचे योग्य उपाय होत. असें जेथें करितां येणार नाहीं, तेथें घरें व दलदली यांच्या दरम्यान झाडांची दाट रांग लावावी; ह्मणजे यापासून ताप उत्पन्न करणारी कुजकट हवा घराकडे येण्यास प्रतिबंध होईल.

---

## ९. शहरें व खेडीं स्वच्छ राखण्याविषयीं.

**३७.** अलीकडे हिंदुस्थानांतील पुष्कळ शहरांस म्युनिसिपाल कमेटीचे[१] कामदार आहेत; व पुष्कळ खेड्यांस तेथचे पाटील आहेत. लोकांच्या आरोग्याकडे लक्ष देणें हा त्यांच्या कामांपैकीं एक महत्त्वाचा भाग आहे, किंवा निदान असला पाहिजे. एके ठिकाणीं आग लागली असतां ती सर्व खेड्यांत जशी पसरते, त्याप्रमाणेंच एखाद्या घाणेरड्या घरांत रोग उत्पन्न झाला तर तो चोहोंकडे पसरतो. ह्मणून श्रीमंत लोकांनीं आपल्या स्वतःच्या फायद्याकरितां गोरगरिबांस मदत केली पाहिजे.

सर्व शहर स्वच्छ ठेवण्याचा अगदीं सोपा व जलदीचा उपाय ह्मटला ह्मणजे प्रत्येक मनुष्यानें आपलें घर व त्या सभोंवतालचें आवार स्वच्छ ठेवावें. तथापि कांहीं कामें अशीं आहेत कीं, तीं मुख्यत्वें अधिकाऱ्यांनींच केलीं पाहिजेत.

बाजारांत जीं धान्यें व जे जिन्नस विकावयास येतात, त्यांवर अधिकाऱ्यांनीं देखरेख ठेविली पाहिजे. नासलेलीं धान्यें आणि कुजलेला भाजीपाला व मांस विकण्यास मनाई केली पाहिजे.

---

१. शहरची व्यवस्था पाहण्याकरितां व स्वच्छता ठेवण्याकरितां नेमिलेली मंडळी.

पिण्याकरितां चांगल्या पाण्याचा पुरवठा अधिकाऱ्यांनींच केला पाहिजे. तळीं व त्यांजवळपासची जमीन स्वच्छ ठेवण्याविषयीं त्यांनींच बंदोबस्त ठेविला पाहिजे.

शरीरांतील घाण पदार्थ आणि सैंपाकघरच्या मोऱ्यांतील वगैरे घाण पाणी यांस **गांवाचा गदळ** असें ह्मणतात. इंग्लंडांतील मोठमोठ्या शहरीं घरचा गदळ नळांतून खोल बांधीव नहरांमध्यें नेलेला असतो व त्यांतून तो दुसरीकडे दूर वाहून जातो. अशी व्यवस्था कांहीं अंशीं कलकत्त्यास केलेली आहे. परंतु हें काम फार खर्चाचें आहे, आणि हिंदुस्थानच्या पुष्कळ भागीं मोऱ्या किंवा नहर धुऊन साफ करण्यापुरतें पाणीही नाहीं. या रीतीनें हिंदुस्थानच्या आणखी कित्येक शहरीं थोड्या खर्चांत मातीच्या चांगल्या नळांतून गदळ दूर नेतां येईल. परंतु तूर्त दुसरे उपाय योजिले पाहिजेत.

३८. सार्वजनिक तारदखाने योग्य ठिकाणीं बांधून त्यांस स्वच्छ ठेवावें. तारदखान्यांत कोरडी माती टाकिली ह्मणजे घाण येत नाहीं. तारदखान्यांतील मैल रोज काढून गांवापासून कांहीं अंतरावर पडजमिनींत खड्डा खणून पुरावा.

गांवच्या गल्ल्यांतील केरकचरा मोठ्या काळजीनें गोळा करून दूर अंतरावर न्यावा; आणि तेथें तो जाळून तरी टाकावा, किंवा खताच्या ढिगांत मिसळावा. ज्या दिशेनें साधारणपणें गांवाकडे वारा वाहत नाहीं, अशा बाजूस केरकचरा टाकावा.

पावसाचें पाणी वाहून जाण्यास गटारें असावीं. उघडीं व उथळ गटारें असलीं ह्मणजे सहज साफ करितां ये-

---

१. थोरलीं गटारें किंवा नळ.

तात. शहरांमध्यें हीं गटारें दगडचुन्याचीं बांधलेलीं असावीं; नाहीं तर जमिनींत पाणी मुरतें. मोऱ्यांचें घाण पाणी ज्या ठिकाणीं सोडल्यानें पिण्याचें पाणी बिघडेल अशा ठिकाणीं हें घाण पाणी सोडूं नये.

हवा वाहण्यास खुला रस्ता मिळण्याकरितां जेथें साधेल तेथें वांकडे तिकडे रस्ते मोडून सरळ करावे. गांवांत मोकळीं मैदानें, फिरण्याबसण्याजोग्या सार्वजनिक जागा, व बागा असल्यापासून फार फायदा होतो.

शहरच्या सीमेबाहेर किंवा ज्या ठिकाणीं लोकांची फारशी वर्दळ नाहीं, अशा ठिकाणीं रंगारी व ढोर यांस आपले धंदे चालविण्यास लावावें. कसाबांच्या जागा व मांस विकण्याच्या जागा स्वच्छ ठेवाव्या.

मेलेल्या जनावरांचे मुडदे कुजूं लागण्यापूर्वीं दूर नेऊन पुरावे. प्रेतें जाळण्यास व पुरण्यास मसणवटी गांवच्या वस्तीशेजारीं करण्यास मनाई असावी. प्रेतें गाडण्याचे खड्डे निदान ६ फूट ह्मणजे तीन साडेतीन हात खोल असावे, आणि पुष्कळ माती घालून ते भरावे.

## १०. रोगराई.

**३९.** प्रकृति बिघडल्यावर ती ताळ्यावर आणण्यापेक्षां मुळापासून प्रकृति चांगली राखणें अधिक सोपें आहे. दुखणें आल्यावर त्याचें निवारण करण्यापेक्षां त्यास आरंभींच हटविणें हें फार चांगलें आहे. दुखणें आलें ह्मणजे जरी त्यांतून अखेरीस आपण बरे होतों, तरी प्रकृतीस जपून दुखणें येऊं न देणें हें फार प्रशस्त होय.

कित्येक लोक असा वेडेपणा करितात कीं, त्यांची

तबियत बरी असतांही आजार न यावा ह्मणून उगाच सारके औषधें घेतात. याचा उपयोग कांहीं होत नाहीं. इतकेंच नाहीं तर त्यापासून उलटा अपाय होऊन शरीरास अशक्तता येते. पटकी गांवांत असली ह्मणजे तर सारक औषधें घेण्याची चाल फार धोक्याची आहे.

पटकीसारखा आजार झाला ह्मणजे औषध लागलेंच घेतलें पाहिजे. परंतु पुष्कळ चिल्लर दुखणीं केवळ विसावा घेतल्यानें व पथ्यावर[2] राहिल्यानें बरीं होतात.

प्रकृति बिघडलीशी वाटली ह्मणजे लागलेंच मनुष्यानें काम करण्याचें टाकून ऊबदार कपडे घालावे व बिछान्यावर स्वस्थ पडून राहावें. नेहमीप्रमाणें न जेवतां कांजी घ्यावी किंवा दुसरें कांहीं हलकेंसें अन्न खावें; असें केलें ह्मणजे शरीरप्रकृति बहुधा पूर्ववत् ताळ्यावर येईल. विसावा घेणें आणि खाणें पिणें बेताचें ठेवणें हे उपाय नेहमीं अगोदर करून पाहावे.

४०. **रोग्याची निगा**—पुष्कळ आजारी मनुष्यें निगा न झाल्यामुळें मरतात. आजारी मनुष्याची निगा कशी ठेवावी, याविषयीं थोड्या सूचना खालीं दिल्या आहेत.

**दुखणेकऱ्याच्या खोलींतील हवा स्वच्छ व ताजी ठेवावी**—दुखण्यांत याचा दुप्पट उपयोग होतो. रोगी मनुष्याच्या शरीरांतून फार मलीन पदार्थ बाहेर पडतात, व ते बहुतेक कुजलेले असतात. कधीं कधीं आजारी मनुष्यास एका लहान खोलींत निजवितात, आणि त्याच्या सभोंवतीं पुष्कळ लोक त्याच खोलींत बसून हवा आणखी जास्त

१. ढाळ होणारीं. २. जे सोसणार नाहींत असे जड पदार्थ वर्ज करून सोसणारे हलके पदार्थ खाणें.

खराब करितात. यापासून आजारी मनुष्यास व जे लोक खोलींत येतात त्यांसही इजा होते.

**स्वच्छता राखण्याकडे फार लक्ष द्यावें**—घाण उत्पन्न करणारे सगळे पदार्थ एकदम काढून टाकावे. आजारी मनुष्याचें दुखणें फार मोठें नसलें, तर कोमट पाण्यांत फडकें भिजवून त्यानें त्याचें अंग रोज हळू पुसावें.

**पथ्याविषयीं काळजी घ्यावी**—प्रकृति बिघडली असतां प्रथमतः एकाद दुसरें लंघन करणें हें पुष्कळ वेळां हितावह होतें. परंतु जर रोग हटला नाहीं, तर रोग्याची शक्ति क्षीण न होऊं देणें फार जरूर आहे. रोगी कधीं कधीं अन्न न मिळाल्यामुळें मरतात. तथापि रोगी फार अशक्त असला म्हणजे कांजी ( पेजे ) सारखें हलकें अन्न मात्र त्यास द्यावें. थोडथोडें पण पुष्कळ वेळां असा अन्न देण्याचा नियम ठेवावा.

**रोग्याजवळ गडबड करूं नये व त्याशीं ममतेनें गोड बोलावें**—आजारी मनुष्यास गोंगाट व गडबड यांपासून त्रास होतो, म्हणून त्याजवळ कोणत्याही तऱ्हेचा गलबा न करितां त्यास शांत राहूं द्यावें; आणि वाटेल तेव्हां त्यास निजूं द्यावें. त्यास गोड वाटेल अशा रीतीनें त्याशीं बोलावें; व जेणेंकरून त्याची वृत्ति आनंदी राहील असें त्याशीं वागावें.

---

## नेहमीं येणारीं दुखणीं.

४१. मोठ्या दिव्यापेक्षां लहान दिवा वाऱ्यानें सहज जातो. ज्या कित्येक दुखण्यांतून मोठीं मनुष्यें बरीं होऊं शकतात, तसलीं दुखणीं आल्यानें लहान मुलें पुष्कळ वेळां

मरतात. लहान मुलांस मुख्यत्वें स्वच्छ व ताजी हवा, स्वच्छ पाणी, आणि चांगलें अन्न व ऊबदार कपडे यांची अवश्यकता असते.

तान्ह्यां मुलांस दूध हें उत्तम अन्न होय. दांत आल्यावर कांजी ( पेज ), चांगला शिजविलेला भात, आणि दुसरें कांहीं हलकें अन्न हळूहळू मुलांस द्यावें. दांत येत असतां फार जपावें लागतें. अशा वेळीं त्यांस उन्हांत, उष्ण वाऱ्यांत किंवा थंडींत नेऊं नये. सर्व मुलांस देवी काढवाव्या. दांत येण्यापूर्वींच मूल सुमारें तीन महिन्यांचें असतें तेव्हां त्यास देवी काढविणें फार उत्तम होय.

वाईट अन्न खाल्ल्यानें मुलांस फार विकार होतात. कोणते पदार्थ वावडे व जिरण्यास जड असल्यामुळें आपणांस बाधतील हें त्यांस कळत नसल्यामुळें पुष्कळ वेळां कच्चीं फळें, हिरवे हरभरे वगैरे मुलें खातात. यामुळें त्यांस हगवण, आंव वगैरे आजार होतात. मुलांच्या अन्नाविषयीं जपल्यानें हजारों मुलांचे जीव दरसाल वांचवितां येतील.

स्वच्छ राहण्याची सवय त्यांस लाविली पाहिजे. यानें खरूज व दुसरे रोग होत नाहींत.

जेथें दंव पडतें अशा उघड्या ठिकाणीं मुलांस कधीं निजूं देऊं नये. त्यांस गरम ठेवण्याजोगे त्यांच्या अंगावर, मुख्यत्वें रात्रीं, जरूर तितके कपडे असावे. थंडीपासून लहान मुलांस अनेक रोग होतात, व पुष्कळ मुलें मरतात.

४२. ताप—हिंदुस्थानांत कोणत्या तरी प्रकारच्या तापाच्या आजारानें फार लोक मरतात.

---

१. ताप मुख्यत्वें दोन प्रकारचा आढळतो. (१)एक प्रकारचा ताप एकसारखा भरलेला राहतो. ( २ ) दुसऱ्या प्रकारचा ताप भरतो व काढतो.

**मलेरिया किंवा कुजकट हवा** या विषापासून बहुतेक जातींचे ताप येतात, असें मानतात. या कुजकट हवेचें खरें स्वरूप अद्याप बरोबर समजलें नाहीं. दलदलीच्या ठिकाणीं, पर्वताच्या पायथ्याशीं असलेल्या दाट जंगलांत, आणि जेथें खालची जमीन ओलसर असते अशा रेताड व ओसाड प्रदेशांत या विषकारक हवेची मुख्यत्वेंकरून उत्पत्ति होते. ज्या ठिकाणीं कुजणाऱ्या वनस्पति आहेत, अशी जमीन वाळून कोरडी होऊं लागली, ह्मणजे ही हवा त्या जमिनींतून निघते. साधारण हवेपेक्षां कांहींशी जड अशी ही एक प्रकारची वाफ हवेंत पसरलेली असते, असें मानतात. बरसात खलास होऊन उन्हानें जमीन वाळूं लागली, म्हणजे ही वाईट हवा फार उत्पन्न होते व हवेंत जमते. रात्रीं ही हवा फार भयंकर असते. या विषारी हवेपासून शरीरास बाधा होण्याचा मुख्य मार्ग म्हटला म्हणजे पाण्याच्या द्वारें होय. पाणी या हवेस नेहमीं शोषण करितें, व पाण्याबरोबर हें विष शरीरांत जातें.

असें सांगतात कीं, इंग्लंडच्या कांहीं भागांत हीव ताप एकदां फार फैलावला होता. त्यावेळीं दलदलीच्या जाग्यांतून पाण्याचा निकाल काढून दिल्यानें, व चांगल्या पाण्याचा पुरवठा केल्यानें मुख्यत्वेंकरून तो रोग नाहींसा झाला. या देशांतही हे उपाय तितकेच उपयोगीं पडतील. हा ताप आला म्हणजे हलकें पण पौष्टिक असें अन्न देऊन रोग्याची शक्ति क्षीण होऊं देऊं नये. तापांतून उठल्यावर लवकर थंड पाणी घेऊन आंघोळ केल्यानें किंवा पुष्कळ थंड पाणी अंगावर घेतल्यानें बहुतवेळां हा ताप पुनः उलटतो.

४३. तापावर आजपर्यंत माहीत असलेल्या औषधांत उत्तम औषध एका झाडाच्या सालीपासून काढलेली पांढरी पूड, जीस कोयनेल असें म्हणतात, ती होय. कोयनेल फार महाग विकतें; परंतु सरकारानें या झाडांची लागवड या देशांत केली आहे; आणि या झाडांपासून काढलेलें कोयनेल हळू हळू मिळूं लागेल. तें बहुतेक परदेशी अस्सल कोयनेलाइतकें चांगलें असून त्याला किंमतही कमी पडेल.

ताप न येऊं देण्याकरितां खालीं लिहिलेल्या गोष्टी लक्षांत ठेवाव्या.

घरासभोंवतीं प्रकाश व हवा येण्यास प्रतिबंध होण्याजोगीं दाट झाडें व झुडपें वाढूं देऊं नये. घराजवळील घाण काढून टाकावी. जमिनींतील पाण्याचा निकाल काढून देण्याची चांगली तजवीज करावी. पिण्याच्या पाण्याविषयीं विशेष काळजी घ्यावी. चांगलें पाणी मिळत नसेल तर तें कढवून फिल्टरांतून गाळावें, आणि नंतर स्वयंपाक करण्यास वगैरे घ्यावें.

जेव्हां गांवांत तापाची धाम असेल, तेव्हां सकाळीं उपाशीं बाहेर जाऊं नये; आणि भूक लागेल त्या बेतानें चांगलें अन्न खावें; उन्हांत फिरूं नये; थकवा येण्याजोगे श्रम करूं नये; दहिंवर किंवा रात्रीची हवा अंगावर घेऊं नये; उघड्या हवेंत निजूं नये; नेहमींपेक्षां अधिक गरम कपडे घालावे; मुख्यत्वें रात्रीं शरीर गरम ठेवावें; माडीवर अगर उंच जागीं किंवा निदान खाटेवर निजावें.

पाण्याबरोबर किंवा श्वासाबरोबर मनुष्याच्या मैलांतील घाणेरड्या पदार्थांचे सूक्ष्म अंश पोटांत जाऊन अत्यंत वाईट जातीचे ताप येतात, अशी समजूत आहे. हें विष

एकाद्या घाण पाण्याच्या खाँळकुव्यांतून झिरपून विहि-रींत गेलेलें असतें किंवा वाऱ्याच्या योगानें जिकडे तिकडे हवेंत पसरलेलें असतें. ही नुसती कल्पना मनांत आणिली म्हणजे अंगावर कांटा उभा राहतो. यावरून स्वच्छतेची किती जरूरी आहे, हें दिसून येतें.

**४४. हगवण व आंव**—न पचणारें अन्न, किंवा वाजवीपेक्षां फाजील अन्न खाल्लें, किंवा वाईट पाणी प्यालें, तर त्यापासून बहुतकरून हगवण लागते; ह्मणजे हाळ होऊं लागतात. एकाएकीं हवेच्या गरमींत फेरफार झाला, किंवा कपड्यांत फेरबदल केला, ह्मणजेही हा रोग होतो. निवांत व स्वस्थ पडल्यानें आणि कांजी ( पेजे ) शिवाय दुसरें कांहीं अन्न न खाल्यानें पुष्कळ वेळां या रोगापासून प्रकृति बरी होते.

आमांश किंवा आंव हा हगवणीचाच एक प्रकार आहे; परंतु त्याहून हा जबरा रोग आहे. हा आजार झाला ह्मणजे पोटांत मुरडा होतो, व शौचाबरोबर रक्त किंवा आंव पडते. याचीं कारणेंही बहुतकरून हगवणी सारखींच असतात. **मॅलेरिया** ह्मणजे कुजलेल्या पदार्थांतून निघणारी विषारी हवा हा आजार उत्पन्न करण्यास कारण होते, असें कित्येकांचें मत आहे. या रोगावर औषध देणें फार कठीण आहे, व हा रोग फार भयकारक आहे. ह्मणून रोग होतांच चांगल्या वैद्यास एकदम बोलावून किंवा त्याकडे जाऊन प्रकृति दाखवावी. रोग बरा झाल्यावर सुद्धा पुनः न उलटूं देण्याकरितां अन्नाविषयीं फार जपलें पाहिजे.

---

१. घरांतील घाण पाणी सांठविण्याचीं जीं डबकें केलेलीं असतात, त्यांस **खाळकुवे** ह्मणतात.

ताप न येऊं देण्यास जे उपाय सांगितले, तेंच हगवण आणि आमांश यांस लागू आहेत. जें अन्न व जे पदार्थ आपण खाणार त्यांकडे विशेष लक्ष द्यावें. कच्चीं किंवा अविकसलेलीं म्हणजे पिकून सडलेलीं फळें, न शिजलेल्या अशा हिरव्या वनस्पति किंवा भाज्या आणि अर्धवट शिजलेलें किंवा न पचणारें अन्न कधींही खाऊं नये. तसेंच अजीर्ण होईल इतकें अन्न मुख्यत्वें रात्रीं कधीं खाऊं नये. शरीर गरम ठेवावें. वाऱ्याचा झोत वाहतो आहे अशा ठिकाणीं निजूं नये. कोठ्यावर वारा लागला तर त्यापासून फार अपाय होतो. ऋतु बदलण्याच्या वेळीं विशेष जपावें. फाजील गरमी किंवा थंडी झाली तर त्यापासून आमांश होईल.

४९. पटकी—हा मोठा भयंकर रोग आहे. पटकीचा त्रास झालेल्या लोकांपैकीं बहुधा निम्मे लोक दगावतात. मलेरिया प्रमाणेंच या रोगाचींही कारणें अद्याप बरोबर समजलीं नाहींत. परंतु ज्या उपायांनीं हा रोग बराच हटवितां येतो असे उपाय समजले आहेत.

वाऱ्यानें उडून गेलेलें वनस्पतींचें पुष्कळ बारीक बीं हवेमध्यें पसरलेलें असतें. हें जर ओलसर व योग्य अशा जमिनीवर पडलें, तर रुजतें, आणि जर चांगली जमीन मिळाली नाहीं तर तें वाढत नाहीं. मोठमोठे उत्तम वैद्य हल्लीं असें समजतात कीं, जमिनींत जसें बीं पडून रुजतें, त्याचप्रमाणें आमच्या शरीरांत फार सूक्ष्म अशा बीजाच्या द्वारें कांहीं रोग उद्भवतात. देवी आल्या म्हणजे असलें बीं आजारी मनुष्याच्या शरीरांतून फार बाहेर पडतें.

घाण, न पचणारें व न सोसणारें अन्न खाणें, रात्रीं उघड्या ठिकाणीं बसणें किंवा फिरणें, आणि ज्या ज्या

कारणांनीं अशक्तता येते तीं तीं कारणें, यांच्या योगानें आपलीं शरीरें असलें भयंकर बीं रुजण्यास जणूं काय लायख होतात; आणि स्वच्छता, चांगलें अन्न, गरम कपडे आणि ज्या ज्या कारणांनीं शरीरास बळकटी येते, अशीं कारणें यांच्या योगानें तें बीं शरीरांत रुजण्यास प्रतिबंध होतो.

पटकीचें विषकारक बीज मुख्यत्वें पाण्यांतून शरीरांत जातें असें समजतात. या रोगानें आजारी पडलेल्या मनुष्याचा मैल एकाद्या विहिरींत जातो. तसल्या विहिरींचें पाणी पिणाऱ्या लोकांस मात्र हा वाखा होतो, असें अनुभवास आलें आहे.

जेव्हां पटकी सुरू असते तेव्हां घरांस चुना लावावा, आणि स्वच्छतेकडे फार लक्ष द्यावें. अशा वेळीं सैपाकास व पिण्यास घेण्याचें पाणी कढवून थंड करावें, आणि साधेल तर फिल्टरानें गाळावें. येणेंकरून पटकीचें विष बहुधा निरुपद्रवी होतें. न पचणारें अन्न मुळींच खाऊं नये. पोटाच्या सभोंवतीं फलालीनची पट्टी मुख्यत्वें रात्रीं गुंडाळून बांधणें हें पटकीच्या प्रतिबंधास फार उपयोगी पडतें. वैद्यानें सांगितल्याशिवाय सारक औषध कधीं घेऊं नये.

पटकीची भीति बाळगिली म्हणजे मनुष्यास वाखा होण्याचा दुप्पट संभव असतो. पिण्याकरितां व स्वयंपाकाकरितां स्वच्छ पाणी मिळविण्याविषयीं योग्य तजवीज करावी आणि ईश्वरावर भरंवसा ठेवून मनांत भीति बाळगूं नये.

४६. पटकीच्या वाख्यास बहुधा हगवणीनें आरंभ होतो. पुष्कळ वेळां ओकारीही लवकरच सुरू होते, व त्यामागून हातापायांत पेटके येऊं लागतात. आरंभीं वाखा होतांच ताबडतोब उपाय केल्यानें या रोगाचें बहुतकरून

निवारण होतें. परंतु जर वाख्याचा अंमल तसाच चालूं दिला तर सर्व औषधें बहुधा निरुपयोगी होतात. जेव्हां वाख्याचा उपद्रव गांवांत चालू असतो, तेव्हां पटकीवरचें औषध घरीं बाळगावें, आणि कोणास वाखा झाल्यास त्यास लागलेंच द्यावें. वाखा झालेल्या मनुष्यास बिछान्यावर निवांत पडूं द्यावें, आणि त्याचें शरीर गरम ठेवावें. थंड पाणी बेतानें थोडथोडें पिऊं देण्यास हरकत नाहीं; त्यापासून कांहीं फायदा होतो. वाखा झाल्यावर चांगल्या वैद्यास तर लागलेंच बोलवावें.

पटकीचा वाखा झालेल्या मनुष्याची हग व ओक, जेथें तिच्या योगानें पाणी व हवा बिघडणार नाहीं, अशा ठिकाणीं जमिनींत पुरावी. त्याचीं अंथरूणें व कपडे जाळून टाकावे, किंवा त्यांस गंधकाची धुरी देऊन त्यांतील विषारी कण घालवावे. आणि नंतर धुवून स्वच्छ करावे.

ज्या जाग्यावर मनुष्यास वाखा होतो, ती जागा राहण्यास फार भयंकर असते. घरांत कोणास वाखा होईल तर तें घर सवड झाल्यास सुमारें १० दिवस सोडावें. जमीन जर मातीची असली, तर ती खणून नवी जमीन करावी, आणि घरांतील खोल्यांत पुनः राहूं लागण्यापूर्वी त्यांत गंधक जाळावा.

खेड्यापाड्यांत अडाणी लोक भुतांखेतांपासून वाखा होतो, असें समजून त्यांचें शांतवन करण्याकरितां रात्रभर नाचत भजन करितात व दुसरे कांहीं प्रकार करितात. याप्रमाणें रात्रभर उघड्या हवेंत राहिल्यानें व थकल्यानें अनेक वेळां रोग कमी न होतां जास्त बळावतो. स्वच्छता, रोगनिवारणाचे साधारण उपाय, आणि स्वच्छ पाण्याचा

पुरवठा यांकडे दुर्लक्ष केल्यामुळें पटकीचा वाखा होतो, हें नेहमीं ध्यानांत ठेवावें. भुतांखेतांपासून हा आजार होत नाहीं, व भुतेंखेतें मुळींच नाहींत.

**४७. देवी**—या रोगानें जे अनर्थ होतात व जी खराबी होते, त्याविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे. लंकेंत ह्मणजे **सिंहलद्विपांत** या आजारास **बडारोग** असें ह्मणतात.

पूर्वीं देवी आलेल्या मनुष्याच्या देवींतील लस घेऊन दुसऱ्या निरोगी व धडधाकट मनुष्याच्या कातडीच्या खाली रक्तांत घालून तोडगा करीत. येणेंकरून ज्या मनुष्याच्या अंगांत याप्रमाणें लस घालीत त्यास फोड्या येत. परंतु बहुधा त्या हलक्या येऊन स्वाभाविक देवींइतक्या भयंकर नसत तथापि कधीं कधीं फार देवी येऊन तोडगा केलेलीं मनुष्यें मरत या उपायानें देवींचा आजार समूळ नाहींसा होत नसे; ह्मणून ही तोडगा करण्याची चाल आतां बहुतेक बंद झाली आहे

**डाक्टर जेनर** यानें शोधून काढिलेली युक्ति याहून फार चांगली आहे, व तिचें थोडें वर्णन पूर्वीं दिलें आहे या रीतीनें ज्या देवी काढितात, त्यांस गोस्तनदेवी असें ह्मणतात. कारण देवी काढण्यास जी लस घेतात, ती प्रथमतः गाईपासून घेतात. गाईच्या द्वारें देवींचें स्वरूप बदलतें. अजूनही कधीं कधीं गाईपासूनच लस घेतात. परंतु ज्यांस गाईच्या लशीनें देवी काढिल्या आहेत, त्यांची लस घेतल्यासही तोच परिणाम होतो; ह्मणून साधारणपणें अशा लशीचाच उपयोग करितात.

देवी काढवितेवेळीं योग्य काळजी न घेतल्यामुळें कधीं कधीं अंगावर जास्त देवी उठतात. अशा देवी आल्या ह्मणजे देवी काढणें हें व्यर्थ आहे, असें अडाणी लोक स

जनतात. परंतु चांगली लस न मिळाल्यामुळें किंवा उठलेल्या देवी फुटल्यामुळें असा प्रकार होतो. देवी काढविल्यावर निदान तीनचार ठिकाणीं फोड्या चांगल्या उठल्या पाहिजेत; आणि कांहीं दिवसपर्यंत त्यांस चोळूं व खाजवूं न देण्याविषयीं जपलें पाहिजे. अगदीं लहानपणीं देवी काढवाव्या, व आणि मनुष्य मोठें झालें ह्मणजे पुनः देवी काढवाव्या. याप्रमाणें केल्यास देवीचा आजार बहुतेक नाहींसा होईल.

४८. सर्व सुधारलेल्या देशांत आतां याप्रमाणें देवी काढवितात. कित्येक देशांत तर मूल जन्मल्यावर अमुक दिवसांच्या आंतच त्या मुलास त्याच्या आईबापांनीं देवी काढविल्या पाहिजेत, असा कायदा आहे.

ह्या देशांत सरकारानें देवी काढणारे लोक नेमिले आहेत, व ते लोक त्यांजकडे येतील त्यांच्या फुकट देवी काढितात. समंजस लोक आपण होऊन यांजकडून आपल्या मुलांस देवी काढवितात, व त्यांच्या मुलांचा या आजारापासून बचाव होतो. परंतु अडाणी लोकांस असें वाटतें कीं, जी देवता या रोगाचें बीजारोपण करिते, तिचा देवी काढविल्यानें आपणांवर कोप होईल: ह्मणून अशा लोकांचीं मुलें केव्हां केव्हां मरतात; किंवा जन्माचीं थोटीं, पांगळीं, किंवा आंधळीं अशीं होतात; ह्मणजे त्यांस जन्माचें एकादुसरें व्यंग प्राप्त होतें. प्रत्येक रोग देवानें पाठविला आहे, ह्मणून त्यावर औषध घेऊं नये; कारण तेणेंकरून देवाचा आपणावर कोप होईल, असें ह्मणणें जितकें वेडेपणाचें आहे, तितकीच ही समजूत वेडेपणाची आहे.

१. बीं पेरणें. २. शरीराचा कोणताही एखादा अवयव जायबंद होणें, किंवा कुरूप होणें.

देवी हा रोग मोठा स्पर्शजन्य[1] आहे. ज्यास पूर्वी देवी आलेल्या असतात, त्यास देवी आलेल्या मनुष्याची उस्तवारी करण्यास लावावें. इतरांनीं त्या घरांत राहूं नये. देवी आलेल्या मनुष्याच्या खोलींत पुष्कळ स्वच्छ हवा येऊं द्यावी. देवी आलेल्या मनुष्याचे कपडे व अंथरुणें देवींतून उठल्यावर जाळून टाकावीं हें उत्तम. परंतु असें न केल्यास कपड्यांस गंधकाची धुरी देऊन त्यांतील देवींच्या लशीची घाण घालवावी, आणि नंतर त्यांस चांगलें धुवावें.

देवी आलेल्या मनुष्याजवळ जातांयेतां व बसतांउठतां जितकें जपलें पाहिजे, तितकें लोक जपत नाहींत, यामुळें हा रोग पुष्कळ वेळां पसरतो. परंतु या विषयीं चांगलें जपलें तर एकदोन घरांच्या पलीकडे रोग फैलावत नाहीं. परंतु देवी काढविणें हा देवींच्या रोगापासून बचाव करून घेण्याचा सर्वांत उत्तम उपाय आहे.

## अपघात.

४९. बुडून मरणें—पाण्यांत बुडून माणसें मरतात; याचें कारण बुडालेल्या मनुष्याच्या फुफ्फुसांत पाण्यांतून हवा जाऊं शकत नाहीं. जो मनुष्य बुडून बहुतेक मेल्यासारखा दिसतो, त्यास कोणत्या तरी उपायांनीं श्वासोश्वास करण्यास लाविलें, तर तो जिवंत होतो.

बुडालेल्या मनुष्यास पाण्यांतून बाहेर काढल्यावर प्रथमतः त्याचें तोंड व नाकपुड्या स्वच्छ धुवाव्या. नंतर हवेस आंत जाऊं देण्याकरितां त्याचें तोंड उघडून जीभ हळूच बाहेर ओढावी. त्याच्या मानेभोंवतीं व छातीभोंवतीं जर

---

१. स्पर्शानें पसरणारा.

कांहीं कपडे व दागिने घट्ट झालेले असतील, तर ते सैल करून काढून टाकावे.

नंतर त्यास उताणें निजवून त्याचें डोकें व खांदे यांखालीं उशा वगैरे देऊन त्यांस उंच करावें. नंतर त्याच्या फुफ्फुसांत हवा घालविण्याकरितां आपल्या दोन्ही हातांनीं त्याच्या कोंपरांवरच्या भागांस ह्मणजे दंडांस धरून वर उचलावें, आणि डोक्यावर त्यांस एकत्र जुळवावें. अशा स्थितींत सुमारें दोन सेकंदपर्यंत धरून नंतर हातांसकट दंड खालीं घेऊन छातीच्या दोहों बाजूंवर त्यांस जोरानें दाबून धरावें. याप्रमाणें खालून वर व वरून खालीं हात नेण्याची क्रिया दर मिनिटास १५ वेळ या मानानें एकतास पर्यंत, किंवा जरूर पडल्यास जास्त वेळ चालवावी. याचा उद्देश असा असतो कीं, असें करितां करितां आपोआप श्वास चालू व्हावा. पीस घशांत फिरवून त्यानें गुदगुल्या केल्यासही उपयोग होतो.

नंतर त्यास गरम कपड्यांत गुंडाळून व त्याचें अंग चोळून त्याच्या शरीरांत रुधिराभिसरण[१] चालू करावें व अंगांत गरमी आणावी. गरम वाळूच्या पिशव्यांनीं किंवा गरम पाण्याच्या बाटल्यांनीं त्यास शेकावें.

त्यास गिळण्याची शक्ति आली ह्मणजे चमचाभर गरम काफी, किंवा ऊन पाण्यांतून देशी दारू द्यावी. असे योग्य रीतीनें उपाय केल्यानें जे मनुष्य तीन तीन तास पर्यंत मरून पडलेले असे दिसले तेही उठले आहेत.

९०. **जखमा**—जर जखम लहानच असेल, तर तिजवरील रक्त न धुतां जखम फडक्यानें बांधावी, किंवा तिज-

---

१. रक्तवाहिन्यांतून जें रक्त वाहतें त्या क्रियेस रुधिराभिसरण ह्मणतात.

वर मलमपट्टी लावावी, ह्मणजे ती चांगली बरी होते. परंतु जखमेंत जर कांहीं घाण गेली असेल, तर कोमट पाण्याची बारीक धार जखमेवर धरून प्रथमतः जखम धुवावी. जखमेवर फडकें टाकून किंवा पट्टी बांधून तिजवर केव्हांही माशांस बसूं देऊं नये. कारण माशा जखमेंत शिरल्यास आंडीं घालतात व त्यांपासून किडे पडतात. ज्या अवयवास जखम झाली असेल त्यांतून रक्त वाहण्याचें बंद करण्याकरितां जखमेच्या वरचा भाग दोरीनें किंवा फडक्यानें गच्च आंवळून बांधावा, आणि तो अवयव उचलून धरावा.

**लचक किंवा करक**—यास मुख्य औषध ह्मटलें ह्मणजे दुखावलेल्या भागास अगदीं न हालवितां पूर्ण विसावा देणें हें होय. लचकलेल्या भागासभोंवतीं फडकें गुंडाळून बरें वाटेल त्याप्रमाणें त्यास ऊन किंवा थंड पाण्यानें भिजवावें. सांधा कांहीं दिवस कमजोर असतो, याकरितां फार जपलें पाहिजे.

**हाडाचा सांधा निखळणें**—हाडाचा माथा आपल्या जाग्यावरून निसटला ह्मणजे हाड निखळलें असें ह्मणतात. निखळलेलें हाड हवें तसें हालवितां येत नाहीं, व त्याचा आकारही बदललेला असतो. अशा मनुष्यास एकदम डाक्टराकडे किंवा इस्पितळांत न्यावें.

**हाडें मोडणें**—शरीरांतील कोणत्याही अवयवाचा आकार बदलला, व तेथल्या हाडांस हात लाविला असतां त्यांचीं टोंकें एकमेकांवर घांसतात असें दिसलें, ह्मणजे हाडें मोडलीं आहेत असें समजावें. अशा वेळीं डाक्टरास किंवा वैद्यास एकदम बोलवावें. ज्याचें हाड मोडलें आहे त्याची हालचाल जितकी कमी होईल तितकी चांगली. नाहीं तर हाडांचीं टोंकें मांसास फाडून बाहेर निघतील.

**घशांत अडकणें व श्वास कोंडणें**—घशांत कांहीं अडकलें किंवा चिकटलें असल्यास त्यास बोटानें बाहेर ओढून काढण्याचा किंवा आंत सारण्याचा यत्न करावा. पाटीवर बरीच मोठी चपाटी किंवा धक्का मारिल्यानें किंवा तोंडावर थंड पाणी मारल्यानेंही कधीं कधीं घसा मोकळा होतो.

९१. **आंग भाजणें**—जर एकाद्या बायकोचें लुगडें पेटलें तर तिनें इकडे तिकडे पळून वाऱ्यानें जास्त पेटूं न देतां जमिनीवर पडून लोळावें, ह्मणजे विस्तव विझेल. जवळ पाणी असल्यास तें तिच्या आंगावर मारावें. अगर पेटलेल्या कपड्यासभोंवतीं जाड कपडा घट्ट गुंडाळला, तर त्यानेंही आग कोंडून विझते.

अंग थोडकें भाजल्यास थंड पाण्याची पट्टी भाजलेल्या जाग्यावर ठेवावी, ह्मणजे आराम वाटतो. कातडी जळून गेली नसल्यास भाजलेल्या ठिकाणीं तूप किंवा तेल लावणें चांगलें. फोड आले असल्यास त्यांस फोडावें. परंतु त्यांवरील कातडी काढूं नये. कारण कातडीनें त्याखालील नाजूक भागाचा बचाव होतो. फार अंग भाजलें असल्यास एकदम डाक्टरास बोलवावें किंवा त्यास इस्पितळांत डाक्टराकडे न्यावें.

**साप चावणें इत्यादि**—जर मनुष्याच्या हातापायांस विषारी साप किंवा कुत्रा चावला असेल, तर शरीराच्या इतर भागांत विष पसरूं नये ह्मणून चावल्या ठिकाणच्या जरा वरच्या बाजूस पट्टीनें किंवा दोरीनें घट्ट आंवळून बांधावें. नंतर चावल्याठिकाणीं सर्पाच्या दोन्ही दातांनीं केलेल्या जखमेच्या तळापर्यंत चाकूनें किंवा सुरीनें कापावें. ज्यास सर्प चावला आहे, तो मनुष्य असें कापूं न देईल

तर लोखंडाची बारीक सळई लालभडक करून त्या जागीं लावून डागावें. जखमेवर ऊन पाणी घालून खूब रक्त वाहूं द्यावें. गरम ब्रांडी किंवा दुसरी कोणतीही दारू पाण्यांत मिसळून दर पाव तासास पिण्यास द्यावी. जेथें हे उपाय करण्याजोगे नसतील, तेथें जखमेस तोंड लावून रक्त ओढून घ्यावें. मात्र ओढणाऱ्या मनुष्याच्या जिभेवर किंवा ओंठावर कोणत्याही प्रकारची जखम, फोड, किंवा व्रण असूं नये. विंचू, गोम किंवा गांधिलमाशी यांच्या चावण्यापासून जी जखम होते, त्या जखमेंतून वेग येतात. त्या जखमेवर व्हिनिगर (शिरक्या) मध्यें किंवा मिठवण्यामध्यें चिंधी भिजवून ठेविली तर वेग बरेच कमी होतात.

विष—विषप्रयोग झाल्यास पहिली गोष्ट ह्मटली ह्मणजे ओकारीचें औषध देऊन वांतीच्या योगानें विष बाहेर पाडणें ही होय. एक मोठासा चमचाभर मोहरीची पूड किंवा मीठ पाण्यांत कालवून दिल्यानें वांती होते. घशांत पिसानें गुदगुल्या करून व ऊन पाणी पिण्यास देऊन चांगली वांती होऊं द्यावी.

अफीण व धोत्रा या विषांनीं गुंगी येऊन गाढ झोंप लागते. अशा मनुष्यास ओकारी देऊन ओकविल्यावर नंतर पुष्कळ काफी थोड्या पाण्यांत तयार करून ती पिण्यास द्यावी, आणि नंतर त्यास सपाट जमिनीवरून उंच जागीं व तेथून पुनः खालीं असें फिरवावें. पितळेच्या भांड्यावर जो हिरवा जंग जमतो, त्याचें विष लागलें असल्यास कोंबड्याच्या अंड्यांतील पांढरा मगज पाण्यांत का-

१. विंचावर आमोनियाचें पाणी फार उपयोगी औषध आहे. हें मिळाल्यास याचे ३० थेंब थोडक्या पाण्यांतून दर पावतासास द्यावे.

ळून द्यावा. आंडीं न मिळाल्यास दूध आणि तेल मिसळून द्यावें. परंतु प्रथम त्यास वांतीचें औषध देऊन त्यास सडकून ओकावयास लाविलें पाहिजे.

## डाक्टर (वैद्य) आणि दवाखाने.

८२. **डाक्टर किंवा वैद्य**—जर आपलें घड्याळ बिघडलें, तर आपण शेजाऱ्याकडे दुरुस्त करण्यास न देतां घड्याळें नीट करणाराकडे नेहमीं देतों. या प्रमाणें आपणास दुखणें आलें ह्मणजे गांवच्या अडाणी व गैरमाहीत लोकांस औषधें न विचारितां एकदम वैद्याकडे जावें. अशा अडाणी लोकांकडे गेलें असतां एक एकप्रकारचा उपाय सांगतो, व दुसरा दुसऱ्याप्रकारचा उपाय सांगतो.

ज्यास वैद्यशास्त्राचें चांगलें शिक्षण मिळालें असेल, अशा चांगल्या वैद्यास आपली प्रकृति दाखवावी. जो मांत्रिक उपायांविषयीं बडबडतो, किंवा आपल्या औषधांच्या गुणांविषयीं बढाई मारतो, अशा केवळ अडाणी वैद्याकडे जाऊं नये.

चांगल्या वैद्याचें आपण औषध घेऊं लागलों ह्मणजे त्यावर पूर्ण विश्वास ठेवावा, आणि तो सांगेल त्याप्रमाणें वागावें. एका वैद्यास सोडून दुसऱ्या वैद्याकडे उगाच जाऊं नये.

**इस्पितळें व दवाखाने**—ह्या देशांत ठिकठिकाणीं इस्पितळें व दवाखाने स्थापिलेले आहेत. त्यांत नेहमीं

१. इस्पितळांत रोग्यांस ठेवून औषधें देतात, व इतर उस्तवारी करितात. दवाखान्यांत रोग्यांस पाहून औषधें मात्र देतात; यांस इंग्रजींत डिस्पेन्सऱ्या म्हणतात.

उत्तम औषधें ठेवून त्यांवर हशार डाक्टरांच्या (वैद्यांच्या) नेमणुका करितात.

कित्येक अडाणी लोकांस इस्पितळांत जाणें आवडत नाहीं: कारण त्यांस वाटतें कीं, इस्पितळांत गेल्यास आपणांस मरण येईल. इस्पितळांत कांहीं लोक मरतात, ही गोष्ट खरी आहे. परंतु याचें कारण बहुधा असें असतें कीं, गुण येण्याची आशा नाहीं, अशी स्थिति होईपर्यंत लोक इस्पितळांत येत नाहींत.

दुखणें आलें म्हणजे एकदम चांगल्या डाक्टरास किंवा वैद्यास प्रकृति दाखवावी, अगर एकदम दवाखान्यांत किंवा इस्पितळांत जावें. कोंवळ्या झाडास जसें सहज उपटून काढितां येतें, तसें मोठ्या वृक्षास काढितां येत नाहीं. हीच रोगाची अवस्था आहे.

नंतर डाक्टर किंवा वैद्य सांगेल त्याप्रमाणें वागावें. कित्येक लोक दिलेलीं औषधें घेत नाहींत, किंवा निदान सांगितल्याप्रमाणें घेत नाहींत. अशा मनुष्यांस गुण आला नाहीं, तर फारसें आश्चर्य नाहीं.

घाईनें किंवा उतावळेपणानें औषधांत फेरबदल करूं नये. कांहीं रोगी थोडा वेळ इस्पितळांतील औषध घेतल्यावर एकाद्या अडाणी वैद्याकडे धांवतात; आणि याप्रमाणें जेव्हां रोग अगदीं असाध्य होतो, तेव्हां ते पुनः परत इस्पितळांत येतात.

## ११. जननमरणाची नोंद[१].

**९३.** सरकारानें आलीकडे सर्व ठिकाणच्या **जननमरणाची नोंद** ठेवावी, असा नियम केला आहे; आणि दर

१. जे लोक जन्मतात व जे मरतात त्यांचीं टीप ठेवणें.

१० वर्षांनीं चांगली कसोशीनें खानेसुमारी ( लोकांची मोजदाद ) घेण्याची वहिवाट सुरू केली आहे. अडाणी लोकांस याचा उपयोग समजत नाहीं. पुष्कळांस वाटतें कीं, अधिक कर बसविण्याकरितां ही खटपट आहे. परंतु करांशीं याचा बिलकूल संबंध नसून उलट यापासून लोकांवाच फार फायदा होतो.

प्रत्येक बापास आपलीं मुलें निरोगी व सुखी राहावीं असें वाटत असतें. मुलें मोठीं झाल्यावर कधीं कधीं दुसऱ्या गांवीं जातात, तेव्हां त्यांचा समाचार कळावा, ह्मणून तो त्यांस पत्रें पाठविण्यास सांगतो.

सरकाराचेंही करणें कांहींसें यासारखेंच आहे. चांगला राजा हा केवळ लोकांचा मायबाप आहे. राजाची प्रजा कोट्यावधि असली, ह्मणजे त्यांची स्थिति कशी आहे हें, त्याचे कामगार जेव्हां जननमरणाची नोंद पाठवितात, तेव्हां त्यास समजतें. जेव्हां जननाची संख्या वाजवीपेक्षां कमी असते, तेव्हां त्यावरून असें समजतें कीं, लोकांची स्थिति चांगली किंवा भरभराटीची नाहीं. तसेंच मरणाची संख्या असावी त्याहून फाजील झाली ह्मणजे त्याच्या कारणांची चौकशी करून तीं कारणें दूर करण्याविषयीं यत्न करितां येतो. मुलांकडून पत्रें आलीं नाहीं तर त्यांचा समाचार बापास कळणार नाहीं, किंबहुना तीं मेलीं किंवा जिवंत आहेत, हेंही समजणार नाहीं. अशा स्थितींत बापास आपल्या मुलांच्या हितासाठीं कांहीं तजवीज करितां येणार नाहीं; त्याचप्रमाणें जननमरणाची माहिती कळली नाहीं तर सरकारास प्रजेच्या हिताकरितां कांहीं करितां येणार नाहीं.

इंग्लंड देशांत जननमरणाची नोंद बऱ्याच दिवसां-

असून ठेवींत आले आहेत; व त्यापासून फार फायदा झाला आहे. येणेंकरून लोकांची शरीरसंपत्ति सुधारण्याकरितां अनेक उपाय करितां आले आहेत. पूर्वी लष्करांत दर हजारीं दरसाल सुमारें १८ शिपाई मरत; परंतु आतां दरसाल सारे ८ मरतात. या देशांतही याचप्रमाणें रोगराई कमी होऊन मरणाची संख्या कमी व्हावी असा सरकारचा इरादा आहे.

## १२. वर सांगितल्याप्रमाणें वागण्याची जरूरी.

५४. बाप आपल्या मुलांस पुष्कळ चांगला उपदेश करील; परंतु मुलें जर त्याकडे लक्ष देणार नाहींत, व त्याप्रमाणें चालणार नाहींत तर सर्व व्यर्थ होईल. हीच गोष्ट शरीरप्रकृतीस लागू आहे. शरीरप्रकृति चांगली व बळकट कशी ठेवावी, याचा रस्ता दाखविला; परंतु त्याच्या मननापासून वाचणारांचें हित होणें न होणें हें केवळ त्यांत सांगितल्याप्रमाणें त्यांच्या वागण्यावर अवलंबून राहील.

बंगाल इलाख्यांतील एका मोठ्या खेड्यांत पुष्कळ लोक तापानें मेले. याचें कारण काय असावें याची चौकशी करण्याकरितां माजिस्त्रेट साहेब तेथें गेले. तेथें त्यांस असें आढळलें कीं, घाणेरड्या सांचलेल्या पाण्याच्या डबक्यांतलें लोक पाणी पितात, व त्यापासून त्यांस ताप येतो. तेव्हां त्यांनीं स्वच्छ पाण्याच्या १० नव्या विहिरी खणविल्या; परंतु माजिस्त्रेट साहेब परत गेल्यावर त्यांस कळलें कीं, लोक त्या विहिरींचें पाणी पीतच नाहींत. हें पाणी चांगलें आहे, असें लोक कबूल करीत, परंतु जुन्या घाणेरड्या

डबकांचें पाणी पिण्याची आपली वहिवाट फार दिवसांपासून आहे, ह्मणून आपण त्यांचेंच पाणी पितों, असें ते ह्मणूं लागले. हा केवढा मूर्खपणा! चांगल्या चाली असतील त्याप्रमाणें आपण चालावें; परंतु ज्या वाईट असतील त्या सोडून दिल्या पाहिजेत.

गरीब अडाणी लोकांस स्वच्छ राहण्यास लाविलें ह्मणजे त्यांवर मोठा जुलूम केला, असें त्यांस प्रथम वाटतें. परंतु हळू हळू त्याचा फायदा त्यांस कळूं लागेल. आपल्या शरीरप्रकृतीविषयीं ते फार हयगय करितात, परंतु त्यांसच मुख्यत्वें दुखण्यामुळें फार हाल भोगावे लागतात. श्रीमंत लोकांपाशीं आजारीपणांत पोटास खाण्यास अन्न आणि उस्तवारी करण्याकरितां नोकर असतात; परंतु गरिबांपाशीं यांतील एकही नसतें.

शरीरप्रकृति चांगली राहावी अशी जर तुमची इच्छा असेल, तर स्वच्छ हवा, स्वच्छ पाणी, आणि चांगलें ( न बाधणारें ) अन्न मिळविण्यास यत्न करा; आणि स्वच्छतेविषयींही फार काळजी घ्या. घाण हें रोगाचें माहेरघर आहे.

---

# प्रश्न.

( १ ) आरोग्यास काय ह्मणतात? आपण बरे असलों म्हणजे आपणास काय करितां येतें? दुखणें आल्यानें काय फरक पडतो? कोणास सुखी ह्मणतां येईल व कोणास दुःखी म्हणतां येईल? मुलास दुखणें आलें म्हणजे काय होतें? आई आजारी पडली ह्मणजे काय होतें? बाप आजारी पडला ह्मणजे किती दुःखकारक गोष्टी घडण्याचा संभव असतो? आरोग्याची खरी योग्यता आपणास खरोखर केव्हां समजते?

( २ ) दुखणें येतें याविषयीं अडाणी लोकांची काय समजूत आहे?

( ३ ) आरोग्यविद्येचें ज्ञान कशाला म्हणतात? इंग्लंडांत तापाच्या आजाराच्या संबंधानें काय फरक पडला आहे? तसेंच महारोगाविषयीं काय फरक पडला आहे? देवीपासून पूर्वी किती अनर्थ होत असे? इंग्लंडांत पूर्वीच्या मानानें देवीपासून कमी लोक मरतात याचें कारण काय? या छोट्या पुस्तकाचा उद्देश काय?

(४) आपल्या जीवरक्षणास कशाची अत्यंत अवश्यकता आहे हवा आहे हें आपणास कसें कळतें? पृथ्वीसभोंवतीं काय आहे? वायुसमुद्र किती खोल आहे! पेलाभर कापी घेतली तर त्यांतून कोणते पदार्थ आपल्या पोटांत जातात? हवेच्या घटनेविषयीं, ह्मणजे हवा कशाची बनली आहे याविषयीं पूर्वीच्या लोकांची काय समजूत होती? आतां विद्वान लोकांनीं त्याविषयीं काय शोध लाविला आहे!

( ५ ) आपल्या सभोंवतीं कोणत्या तीन रूपांचे पदार्थ आढळतात? घन, पातळ, आणि वायुरूप पदार्थ कशास ह्मणतात? ज्या वायूंची हवा बनलेली आहे, त्यांस वेगळे काढून त्यांचें वजन करितां येईल कीं काय? त्यांपैकीं एका वायूस काय म्हणतात? व त्याचे उपयोग काय आहेत? दुसऱ्या कोणत्या वायूशीं हवा मिसळलेली आहे, व असें मिश्रण असण्याचा हेतु काय? हवेंत आक्सिजन व नैत्रोजन हे कोणत्या प्रमाणानीं असतात?

( ६ ) हवेंत तिसरा कोणता पदार्थ आहे व त्याची घटना काय आहे? कार्बानिक आसिडवायूचे ज्योतीवर आणि तिच्या प्रकाशावर काय परिणाम घडतात? वनस्पतींस त्याचा कसा उपयोग होतो? हवेंत कार्बानिकआसिडवायु किती आहे? हवेंत आणखी दुसरा

कोणता पदार्थ आहे, व त्याचा उपयोग काय? हवेंत जे चार पदार्थ आहेत, त्यांचीं नांवें सांगा.

(७) कोणत्या विषानें फार लोक मरतात? कलकत्त्यांतील अंधार-कोठडींतील मनुष्यांची काय अवस्था झाली? हवा बिघडण्याची एक रीति कोणती? हवेच्या योगानें आपल्या शरीरावर कोणतें फायदेकारक कार्य नेहमीं घडतें? आपण जी हवा श्वासाबरोबर घेतों ती कोठें जाते व काय करिते? येणेंकरून अशुद्ध रक्तावर काय परिणाम होतो?

(८) जी हवा आपण श्वासाबरोबर बाहेर सोडितों, तिजबरोबर कोणते तीन पदार्थ बाहेर पडतात? जर आपण एका कोंदट खोलींत निजलों, तर आपल्या सभोंवतालची हवा कशानें भरून जाते? जी हवा तुम्ही श्वासाबरोबर बाहेर टाकितां, तिजमध्यें पाण्याची वाफ आहे, हें तुम्हांस कसें कळतें? उश्वासाबरोबरच्या पाण्याच्या वाफेंत काय असतें? कोंदट जागीं राहणाऱ्या लोकांच्या पोटांत कसली हवा जाते?

(९) दुसऱ्या कोणत्या रीतीनें हवा बिघडते? झांकण असलेल्या भांड्यांत दिवा लवकर कां विझतो? तिसऱ्या कोणत्या रीतीनें हवा बिघडते? प्राणी मेल्यावर आणि वनस्पति निर्जीव झाल्यावर त्यांचें काय होतें? कुजलेल्या पदार्थांपासून कसकशा रीतीनें हवा बिघडते?

(१०) हवा जर शुद्ध झाली नाहीं तर लवकरच पृथ्वीची स्थिति काय होईल? हवा शुद्ध होण्याचे मुख्य तीन प्रकार कोणते? वायूंचें अभिसरण कशास म्हणतात? हवेस स्वच्छ करण्यास वाऱ्यापासून कसा उपयोग होतो? वनस्पति काय शोषण करितात, व काय बाहेर टाकितात?

(११) ताज्या हवेचे उपयोग कोणते? ताज्या हवेची अत्यंत जरूरी केव्हां असते? आपल्या जवळच्या हवेस कोणत्या पदार्थांनीं बिघडूं देऊं नये? स्वच्छ हवेची फार जरूरी कोणास असते? आसपास स्वच्छ हवा असून आणखी तिची जरूरी कोठें असते? फुफ्फुसांत हवा शिरण्यास कसा प्रतिबंध होतो? आपल्या शरीरांत हवा शिरण्यास दुसरे आणखी अडथळे कोणते होतात?

( १२ ) पाणी नसलें तर काय होईल? आपल्या शरीरापैकीं किती भाग पाण्याचा बनलेला आहे? इतकें पाणी असण्याचें कारण काय असावें? हें पाणी जातें कोठें? पाणी वाईट असलें तर काय होतें? पुष्कळ आजार कशापासून उत्पन्न होतात? पिण्याशिवाय पाण्याचा दुसरा उपयोग कोणता? वनस्पतींस पाण्याचा काय उपयोग होतो?

( १३ ) पाण्याचा मोठा पुरवठा कोणापासून होतो? समुद्रांत नद्यांचें पाणी जात असूनही समुद्र तुडुंब भरून कां जात नाहींत? सूर्याच्या उष्णतेनें पाण्यावर काय परिणाम घडतो? वर गेलेलें पाणी पुनः खालीं कसें येतें? पावसाळ्यांत नद्यांची स्थिति कशी होते?

( १४ ) पावसाळ्यांत नद्यांस जें गढूळ पाणी येतें, तें कसें स्वच्छ होतें? पाणथळ जागचें पाणी वाईट असण्याचें कारण काय? त्यांतील विष अंशतः कसें नाहींसें करितां येतें? नद्यांचें पाणी बिघडण्याचे निरनिराळे प्रकार कोणते? कोणत्या नद्यांचें पाणी असें फार बिघडतें? नद्यांचें पाणी स्वच्छ राखण्यास कोणते उपाय योजावे?

( १५ ) तळ्यांचें पाणी कसें बिघडतें? कोणत्या तळ्यांचें पाणी वाईट असतें? याकरितां काय तजवीज करावी? तळ्यांचें पाणी स्वच्छ कसें राखावें? कोणत्या कारणाकरितां दुसरें एक निराळें तळें असणें जरूर आहे? मनुष्यांस वाईट पाण्यापासून कोणते विकार होतात? तसेंच गुरांस कोणते रोग होतात? अशा तळ्यांपासून चांगलें पाणी बहुधा कसें पैदा करितां येतें?

( १६ ) उत्तम विहिरींस पाणी कोठून येतें? पृष्ठभागचें पाणी ज्या विहिरींत जातें, त्यांचें पाणी वाईट कां असतें? या देशांतील विहिरींत साधारण दोष कोणते असतात? विहिरींचें पाणी स्वच्छ राखण्यास कोणते उपाय योजावे? विहिरींचें पाणी कशानें फार बिघडतें? विहिरीजवळ घाण सांचली तर त्यापासून पाणी कां बिघडतें?

( १७ ) चांगलें पाणी कशास ह्मणतात? पाण्यास जड किंवा कठीण आणि हलकें किंवा मृदु केव्हां ह्मणतात? इंग्लंडांतील बहुतेक शहरांस हल्लीं पाण्याचा पुरवठा कसा केलेला आहे? पाणी बिघडलें असल्यास त्याचा उपयोग करण्यापूर्वी त्यास काय करावें?

पाणी कसें गाळून स्वच्छ करितात ? पिण्यास पाणी हाच उत्तम पदार्थ कां ? मादक दारूपासून काय परिणाम होतात ?

( १८ ) शरीरांतील मलिन पदार्थांचा निकाल लावण्याविषयीं शरीराचा कसा यत्न चाललेला असतो ? मलिन पदार्थ त्वचेंतून कसे बाहेर पडतात ? घाम म्हणजे काय ? घामाबरोबर काय बाहेर जातें ? घाम बाहेर पडण्याचीं जीं बारीक द्वारें आहेत, त्यांचीं तोंडें कशानें उघडीं राहतात ? तीं चोंदलीं तर काय परिणाम होतो ? शरीराप्रमाणें आणखी काय स्वच्छ ठेविलें पाहिजे ?

( १९ ) किती वेळां आपण आंघोळ करावी ? आंघोळ करण्यास उत्तम वेळ कोणती ? आंघोळ करण्यास स्वच्छ पाणी कां घ्यावें ? आंघोळ केल्यावर काय करणें जरूर आहे ? कधीं कधीं आंघोळ करण्यानें कित्येकांस आजार कसा येतो? ऊन पाण्यानें कोणी आंघोळ करावी? आजारी मनुष्याचें आंग कसें धुवावें?

( २० ) दगडाच्या पुतळयास अन्न खावें लागत नाहीं; मग आपणासच त्याची जरूरी कां असते? आगगाडीच्या यंत्राच्या अंगीं काम करण्याचें सामर्थ्य कशानें येतें ? आपणास शक्ति कशी येते ? अन्न खाल्ल्यानें काय भरून येतें ? शक्तीशिवाय अन्नापासून आपल्या शरीरास आणखी काय प्राप्त होतें ? शरीरांत दररोज किती उष्णता उत्पन्न होते ?

( २१ ) निरनिराळया अन्नांपासून परिणाम कसे घडतात ? आपणास अन्नाची अवश्यकता कशाकरितां असते ? लहान मुलांस कोणत्या पदार्थानें सर्व अवश्य गोष्टी प्राप्त होतात ? मनुष्यांचें मुख्य अन्न काय असतें ? निरनिराळया धान्यांत काय फरक असतो ? दुसऱ्या कोणत्या जातीच्या अन्नांपासून शक्ति वाढते ? तेल खाल्ल्यानें काय परिणाम होतो ? जे मुख्यत्वें भात, तूप आणि साखर खातात, त्यांजवर काय परिणाम होतो ?

( २२ ) कोणत्या जातींचीं अन्नें शरीरास हितकरें नसतात? अन्नाविषयीं फार काळजी घेणें केव्हां जरूरें असतें ? अशा वेळीं काय काय वर्ज करावें ? मसालेदार पदार्थांचा उपयोग कसा करावा ? पानसुपारी ( व तंबाकू ) खाल्ल्यापासून काय अनहित होतें ? तंबाकू ओढण्याची संवय लावून न घेणें हें उत्तम आहे असें कां म्हणतात ?

याहून फार अपकार कशापासून होतात ? अन्न शिजविण्याच्या संबंधानें कोणती काळजी घेतली पाहिजे ?

( २३ ) कोणत्या वेळीं आपण जेवावें ? नियमितकाळ मध्यें टाकून कां जेवण करावें ? सकाळीं कामास जाण्यापूर्वी आपण न्ह्यारी कां करावी, ह्मणजे थोडेंसें कां खावें ? मुख्य जेवण करण्याच्या दोन वेळा कोणत्या ? कोणत्या वेळीं जेवण करूं नये ? अन्न खाऊन पुष्कळ लोक कशी आपणांस इजा करून घेतात ? अन्नाचें चर्वण कां चांगलें झालें पाहिजे ?

( २४ ) सावटींत वाढलेलीं झाडें कशीं दिसतात ? उजेड नसला तर मनुष्यांवर काय परिणाम होतो ? अंधार असलेल्या घरांविषयीं लोक काय ह्मणतात ? घरांत उजेड असला ह्मणजे त्यापासून काय फायदा होतो ? गोषांत राहण्याच्या चालीपासून कोणास इजा सोसावी लागते ? उन्हांत उघडें फिरल्यानें कधीं कधीं काय परिणाम होतात ? उन्हापासून बचाव करण्याकरितां कोणते उपाय योजावे ?

( २५ ) वापरण्याच्या कपड्यांत कसकसा फेरबदल केला पाहिजे ? हिंवाळ्यांत बंगाल इलाख्यांत पुष्कळ लोक कशानें मरतात ? शरीराचे अत्यंत नाजूक असे दोन भाग कोणते ? त्यांचा बचाव कसा करावा ? रात्रीं कपडे कां बदलावे ? कोणत्या प्रकारच्या कपड्यांपासून इजा होते ?

( २६ ) स्नायु ह्मणजे काय ? स्नायु बळकट कशानें होतात ? व्यायामानें श्वासोच्छ्वासावर काय परिणाम होतो ? व्यायामानें शरीरांतील मळ कसा बाहेर जातो ? व्यायामापासून याशिवाय दुसरा कोणता फायदा होतो ? जे व्यायाम घेत नाहींत, त्यांची [illegible] काय होते ?

( २७ ) खेळ कोणास आवडतात ? खेळण्यापासून मुलांचें काय हित होतें ? कोणत्या ठिकाणीं मुलांस अतिशय कमी व्यायाम मिळतो ? व्यायाम न मिळाल्यामुळें कधीं कधीं कोणाचें नुकसान होतें ? अशांची स्थिति कित्येक वेळां काय झाली आहे ? व्यायामानें मेंदूस कशी बळकटी येते ? व्यायाम केव्हां घेऊं नये ?

( २८ ) झोंप न घेतली तर आपली अवस्था काय होईल ? झोंपेपासून आपलें हित काय होतें ? झोंपेच्या संबंधानें लोकांकडून

उलट दोष घडतात ते कोणते ? तान्ह्या मुलांस दिवसांतून किती तास झोंप पाहिजे ? मुलें व मुली यांनीं किती तास झोंप घ्यावी, व थोर मनुष्यांनीं किती घ्यावी ? झोंपेविषयीं काय ह्मण आहे ?

( २९ ) वाईट स्वप्नें पडण्याचा संभव कशापासून असतो ? स्वप्न ह्मणजे काय ? स्वप्नापासून फक्त काय समजतें ? कोणत्या प्राण्यांस स्वप्नें पडतात ? जमिनीवर केव्हां निजलें असतां हरकत नाहीं ? जमिनीवर निजलें असतां केव्हां अपकार होतो ? बिछान्यावर निजल्यानें तापापासून कसा बचाव होतो ? जमीन ओलसर असली तर काय करावें ? बिछान्यांतील कपडे स्वच्छ कां ठेविले पाहिजेत ?

( ३० ) कोंदट खोलींत निजल्यापासून कशी प्रकृति बिघडते ? निजण्याच्या कोणत्या वाईट चालीमुळें ताजी हवा मिळण्यास अडथळा होतो ? उघड्या जागीं केव्हां निजलें असतां चालेल ? उघड्या जाग्यांत केव्हां निजूं नये ? वाऱ्याचा झोंत वाहत आहे अशा ठिकाणीं निजल्यापासून अपकार कां होतो ? शरीर विशेषें करून रात्रीं केव्हां गरम ठेविलें पाहिजे ?

( ३१ ) कोणत्या प्रकारच्या जागीं घरें बांधूं नयेत ? कशा प्रकारचीं जागा घरें बांधण्यास पसंत करावी ? आणखी कोणत्या प्रकारची जागा घरें बांधण्यास योग्य नाहीं असें ह्मणतात ? घरांच्या जमिनी उंच कां कराव्या ? घरांचीं छपरें उतरतीं कां असावीं ? अरुंद व वांकड्या गल्ल्यांत काय दोष आहे ? सवंग मिळालीं तरी कोणतीं घरें घेऊं नयेत ?

( ३२ ) जेव्हां एका बाईनें आपल्या बहिणीस प्रकृति कशी आहे ह्मणून विचारलें, तेव्हां तिनें काय उत्तर दिलें ? प्रकृति बिघडण्याचें बहिणीनें काय कारण सांगितलें ? त्या बाईनें बहिणीच्या घरांतील कोणता दोष काढिला ? तेव्हां बहिणीनें काय उत्तर दिलें ? बाईनें बहिणीस काय करावयास लाविलें ? व त्याचा परिणाम काय झाला ?

( ३३ ) घरांत हवा खेळणें ह्मणजे काय ? घरासंबंधीं पहिली जरूरीची गोष्ट काय पाहिली पाहिजे ? प्रत्येक मनुष्यास किती जागा असावी ? झोंपड्यांमध्यें कमी जागा असली तरी चालतें, याचें कारण काय ? विटांच्या घरांत ताज्या हवेची कमताई फार कां पडते ? कोणत्या खोल्या निजण्यास अगदीं वाईट समजाव्या ? निजण्याच्या खोलींतील हवेचा पुरवठा कधीं कधीं कशानें कमी होतो ?

( ३४ ) जिवंत प्राण्यांच्या योगानें जशी हवा बिघडते. तशी आणखी कशानें बिघडते ? हवा खेळण्यास किती खिडक्या असणें जरूर आहे ? वाईट हवेस कसें बाहेर घालवावें, व स्वच्छ हवेस कसें आंत घ्यावें ? कार्बानिक आसिडवायूचे मनुष्यांवर विषकारक परिणाम कसे घडतात ? कोणत्याही खोलींतील हवा स्वच्छ आहे किंवा नाहीं हें आपणास कसें सांगतां येईल? बायकांच्या राहण्याच्या खोल्यांत कोणकोणत्या गोष्टींचा चांगला पुरवठा असला पाहिजे ?

( ३५ ) भिंतींस चुना वगैरे लावण्याची दुरुस्ती दरसाल किती वेळां करावी ? घरें रोज सारविल्यानें काय वाईट परिणाम होतो ? घरांतील केरकचरा कोठें टाकूं नये ? त्याची व्यवस्था कशी करावी ? केर टाकण्याचा खड्डा घराजवळ कां असूं नये? असे खड्डे लोक घराजवळ कां करितात ? त्यापासून काय परिणाम होतो? तारखान्यांतील मैलापासून जी घाण सुटते, ती कशी घालवितां येईल? तारखान्यांतील मैलापासून हल्लीं कोणता उपद्रव होतो ? त्यापासून कोणतें हित करून घेतां येईल?

( ३६ ) घरांच्या आजूबाजूंच्या स्थितीविषयीं कोणती खबरदारी ठेविली पाहिजे? घरांत गुरें व घोडीं वगैरे कां बांधूं नयेत? खताचें उकिरडे कोठें करावे ? खळगे व खोल जागा कां भरून काढाव्या? गटारांविषयीं कोणता बंदोबस्त ठेविला पाहिजे ? दलदलीच्या जाग्यापासून होणारा उपद्रव कमी करण्यास कोणते दोनच उपाय चांगले आहेत ? त्यांपासून कुजकट हवा न येण्यास कशानें प्रतिबंध करितां येईल ?

( ३७ ) शहरें व खेडीं यांच्या आरोग्याविषयीं देखरेख ठेवण्याचें काम कोणाचें आहे? कोणत्याही गांवचें आरोग्य राखण्यांत सर्वांचें हित कसें आहे ? कोणतीं कामें मुख्यत्वें अधिकाऱ्यांनीच केलीं पाहिजेत? गांवचा गदळ म्हणजे काय ? इंग्लंडांत हा गदळ नेण्याविषयीं काय बंदोबस्त केला आहे ? तसा हिंदुस्थानांत करण्यास कोणत्या अडचणी आहेत ? गदळ नेण्याकरितां थोड्या खर्चानें कशाचें नळ करितां येतील ?

( ३८ ) सार्वजनिक तारखान्यांविषयी कोणती खबरदारी घेतली पाहिजे ? गांवच्या रस्त्यांतील केरकचऱ्याची कशी व्यवस्था करावी? पावसाचें पाणी वाहून जाण्याकरितां गटारें कशीं करावीं ?

ताज्या हवेचा पुरवठा कशानें वाढवितां येईल? रंगारी व ढोर यांच्या धंद्याच्या जागा गांवांत कोठें असाव्या? प्रेतें पुरण्याच्या व जाळण्याच्या मसणवटींविषयीं कोणते नियम असावे?

( ३९ ) औषधें घेऊन प्रकृति दुरुस्त करण्यापेक्षां दुसरा चांगला मार्ग कोणता? कित्येक लोक सारक औषधें कशाकरितां घेतात? त्यांपासून अपकार कां होतो? कोणत्या वेळीं सारक औषध घेणें मोठें धोक्याचें असतें? कोणता आजार झाला म्हणजे एकदम औषध घेतलें पाहिजे? चिल्लर दुखणीं पुष्कळ वेळां कशीं बरीं होतात?

( ४० ) पुष्कळ आजारी कशामुळें मरतात? दुखण्यांत कोणत्या गोष्टीकडे प्रथम लक्ष दिलें पाहिजे, व त्याचें कारण काय? स्वच्छतेविषयीं काय तजवीज केली पाहिजे? अन्नाविषयीं काय काळजी घेतली पाहिजे? रोग्यास शांततेची व ममतेची कां जरूरी असते?

( ४१ ) कोणत्या चार गोष्टींची तान्ह्या मुलांस अवश्यकता असते? तान्ह्या मुलांचें खाणें काय असावें? मुलांस देवी कधीं काढवाव्या? मुलांस कशानें फार अपकार होतात? त्यांस स्वच्छ राहण्याची सवय कां लाविली पाहिजे? रात्रीच्या वेळीं मुलांस कशाविषयीं जपलें पाहिजे?

( ४२ ) हिंदुस्थानांत कोणत्या आजारानें फार लोक मरतात? बहुतेक जातींचे ताप येण्यास जें कारण घडतें, त्यास काय ह्मणतात? **मलेरिया** किंवा कुजकट हवा मुख्यत्वें कोठें उत्पन्न होते? या हवेपासून भयकारक परिणाम केव्हां घडतात? इंग्लंडांतील हींवताप कसा नाहींसा झाला? तापावर औषध देतेवेळीं एतद्देशीय वैद्य कोणती चुकी करितात?

( ४३ ) तापावर कोणतें उत्तम औषध माहीत आहे? ताप न यावा याकरितां कोणत्या नियमांनीं चालावें? जेव्हां तापाची धाम आलेली असते, तेव्हां कोणती काळजी घेतली पाहिजे? अत्यंत दुष्ट ताप कशानें येतात अशी समजूत आहे? हें विष शरीरांत कसें जात असावें?

( ४४ ) हगवण कशाला ह्मणतात? हगवणीचा उपद्रव बहुधा कशानें होतो? हगवण लागलेल्या मनुष्यांस पुष्कळ वेळां कशानें गुण येतो? आंव झाली हें कसें समजतें? आंव झाली तर काय केलें पाहिजे? आंव झाली तर फार जपावें कां लागतें? हगवण व आंव टाळण्याचे उपाय कोणते?

# सूचना.

मूळ पुस्तक राजे सर टी. माधवराव ह्यांनीं इंग्रजींत लिहिलें आहे. त्याच्या आधारानें हें पुस्तक तयार केलें आहे. ह्यांत, मूळ पुस्तकांतल्या ज्या गोष्टी अप्रासंगिक वाटल्या, त्या गाळिल्या आहेत, आणि त्यांत थोड्या कोठें कमी वाटल्या, त्या घातल्या आहेत. आणि हें सर्वांस सहज कळण्यासारखें अगदीं सुलभ भाषेनें लिहिलें आहे.

आमच्या राष्ट्राचा अभ्युदय आमच्या मुलांच्या पराक्रमावर अवलंबून आहे. ह्मणून, आमच्या देशाचें हित करण्याचा उत्तम उपाय ह्मटला ह्मणजे आमचीं मुलें उत्तम प्रकारें तयार करणें हा आहे तत्संबंधाचा हा प्रयत्न आहे. ह्यास परमेश्वर यश देवो.

**वि. कों. ओक.**



# उपोद्घात.

आपलीं मुलें निरोगी, सुखी, बुद्धिवान्, आणि उपयोगी अशीं निपजून, आपल्या कुलाचा लौकिक वाढवितील, अशा प्रकारें त्यांस लहानाचीं मोठीं करणें, हें स्वदेशाभिमानाचें उत्तम लक्षण आहे, असें मी समजतों. शिवाय, आपल्या मुलांविषयीं आपलें प्रेम प्रदर्शित करण्यासही तो मार्ग उत्तम आहे. हें जसें मला वाटतें, तसें पुष्कळांस वाटेल, असें मनांत येऊन, मी ह्या चार ओळी आपल्या कुटुंबांतल्या माणसांच्या बोधार्थ लिहिल्या आहेत. आणखी हा बोध इतर कुटुंबांसही उपयोगीं पडेल, असें वाटल्यावरून ह्याच्या थोड्याशा प्रती छापून काढिल्या आहेत.

ह्या माझ्या प्रयत्नानें ह्या अत्यंत महत्वाच्या विषयाकडे आमच्या देशांतल्या कुटुंबवत्सलांचें लक्ष्य जर लागलें, तर माझे श्रम सफल झाले असें मला वाटून, मला फार संतोष होईल.



# बालसंगोपन सूचना.

---

## मुलांचें संगोपन करतांना साचे जे मुख्य हेतू लक्षांत ठेवावयाचे, ते हे:—

१ शरीरास इजा होते, हातपाय मोडतात, किंवा मरण येतें, अशा प्रकारच्या अपघातांपासून स्वतःचें संरक्षण करण्याविषयीं मुलास शिकविणें.

२ मुलांची प्रकृति चांगली निरोगी राहील, अशी योजना करणें.

३ मुलांची अवलोकन शक्ति आणि विचारशक्ती क्रमाक्रमानें आणि हळू हळू वाढत जाईल असें करणें.

४ ज्या वस्तु मुलांच्या दृष्टीस पडतात, त्या वस्तूंविषयीं त्याचें ज्ञान वाढविणें.

५ मुलांस आपल्या आईबापांची आणि गुरूची आज्ञा मानण्याची संवय लावणें.

६ चांगल्या रीतिभाती, सद्वर्तन, आणि लौकिक हीं शिकविणें.

७ सारांश, मोठेपणीं दुनियेमध्यें सुखानें आणि अब्रूनें कालक्रमणा करितां यावी, अशा पद्धतीनें मुलांस तयार करणें.

**मुलांस कोणत्या कोणत्या गोष्टी करूं द्याव्या**—साधारणपणें लहान मुलांस इकडे तिकडे धांवणें, नाचणें, उड्या मारणें, एकामेकांच्या मागें पळणें, बोलणें, खेळणें, हंसणें, गाणें, कोणाचें कांहीं पाहिलें ह्मणजे तसें करणें, पशुपक्ष्यांसारखे शब्द करणें, इत्यादि गोष्टी फार आवडतात. त्या त्यांस स्वस्थपणें करूं द्याव्या. आईबापांनीं त्यांचें निवारण करूं नये. मुलें स्वसंतोषानें जें कांहीं करतात, त्यापासून त्यांस सुख होतें. ह्मणून, मुलांच्या ज्या कृत्यांपासून दुसऱ्यांस इजा होत असेल, त्या कृत्यांचें मात्र निवारण करावें. आणखी आपण मुलांस जें काय करूं नका ह्मणून सांगतों, त्यामध्यें आपलें कारण काय असतें, हें त्यांच्या लक्षांत येईल असें करावें. आणखी कोणत्याही संस्थेचें किंवा उत्तम राज्यपद्धतीचें मुख्य तत्व हेंच असतें, हें त्यांच्या मनांत ठसावें.

**दररोजचीं संकटें**—हीं कशीं टाळावीं, हें मुलांस अगदीं लहानपणापासून शिकवायास लागावें. त्यांतलीं कांहीं थोडीं संकटें येथें सांगतों:—

वाट चुकून भलतीकडे जाणें.
विहिरींत पडणें.
विस्तवानें भाजणें.
उंच जाग्यावरून खालीं पडणें,
गोम, विंचू, साप इत्यादिकांचा दंश होणें.

गाडीखालीं सांपडणें.

घोड्याबैलाची लात लागणें.

पचायाचें नाहीं, बाधायाचें, असें कांहीं खाणें.

बोरें, जांबळें इत्यादि लहान फळें एकदम तोंडांत घातल्यामुळें त्यांच्या बिया घशांत अडकून गुदमरणें.

खडी साखरेचे मोठमोठे खडे किंवा बदामासारखीं कठिण कवचीचीं फळें दांतांनीं फोडून, त्यांस इजा करून घेणें.

**मुलाला त्याचें स्वतःचें काम करूं द्यावें**-स्वतःच्या सोईकरितां आणि सुखाकरितां जीं कामें मुलास करतां येण्यासारखीं असतात, तीं त्यास करूं द्यावीं, त्यांत त्यास मदत करूं नये. त्यांतले कांहीं प्रकार सांगतों.

स्नानाच्या वेळेस आंगावर पाणी घेऊं द्यावें.

त्याला आपलें आंग घांसूं द्यावें.

त्याला आपलीं भांडीं पुसूं द्यावीं.

त्याला आपला पोषाक करूं द्यावा.

त्याला आपले केंस विंचरूं द्यावे.

त्याला आपले हातांनीं जेवूं द्यावें.

त्याला आपलीं खेळणीं संभाळून ठेवूं द्यावीं.

खुर्ची एका ठिकाणावरून उचलून दुसरे ठिकाणीं न्यावयाची असल्यास, ती त्याची त्याला नेऊं द्यावी.

त्याला एकादी वस्तु पाहिजे असली, तर ती त्याला स्वतः जाऊन आणूं द्यावी.

खेळ मांडावयाचा असला, तो त्याला स्वतः मांडूं द्यावा.

मुलानें आपल्या डोक्यावर छत्री आपले हातानें धरिली पाहिजे. ती चाकराकडून धरावीणें हें फार वाईट आहे.

आपल्या आईबापांस कामें करूं लागण्याची इच्छा मुलांस फार असते. तीं कामें तीं जितकीं करतील, तितकीं त्यांस करूं द्यावीं. त्याच्या योगानें त्यांस चांगली संवय लागते. आपलीं स्वतःचीं कामें मुलांस जितकीं करतां येतलि, तितकीं त्यांजकडून करवावीं, हें फार चांगलें आहे. कांकीं मोठेपणीं त्यास चाकर नौकर ठेवण्याचें सामर्थ्य येईलच, असा कांहीं नियम सांगवत नाहीं. चालतां येत नसलें, किंवा फार दूर जावयाचें असलें तर मात्र मुलाला कडेवर किंवा खांद्यावर घ्यावें; एरव्हीं घेऊं नये. श्रीमंतांच्या मुलांस देखील आपलीं स्वतःचीं कामें करायांस शिकवावें; कामें करणें हें लाजिरवाणें आहे किंवा आपल्या पदवीला अयोग्य आहे, असें त्यांच्या मनांत येऊं देऊं नये.

**क्रूरपणाचा अन्याय आणि जुलूम**—मुलाला मरेमरेतों मारावें, आणि तो मोठ्यांनीं रडूं लागला ह्मणजे, धमकावून त्यास 'तोंड मीट' ह्मणून सांगावें, हें बापास

किती अन्यायाचें आहे बरें! मुलाला तर रडल्यावांचून रहावत नसतें; ह्मणून तें रडत असतें; आणि बापाला वाटतें कीं, हें हट्टा हट्टानें रडतें आहे; ह्मणून तो संतापून त्याला मार मार मारतो. हें पाहिलें ह्मणजे फार वाईट वाटतें. असें बापानें कधीं करूं नये. अथवा कधीं कधीं मुलाचें कांहीं दुखतखुपत असल्यामुळें तें रडत असतें; तें बापाला कळत नाहीं; आणि बापाला तो हट्ट वाटतो; त्यावरूनही मुलास फार मार खावा लागतो. एकादे वेळेस एकादा धोंडाबिंडा मूल आपल्या पायावर पाडून घेतें आणि त्याच्या दुःखानें मोठ्यांनीं रडूं लागतें. तेव्हां देखील, बाप त्यावर रागें भरून त्याच्या वेडेपणाबद्दल त्याला मारूं लागतो. हें फार वाईट आहे. अशा वेळीं त्या मुलाची कींव केली पाहिजे. त्याला कोठें काय लागलें असेल तें पाहिलें पाहिजे, तेथें हात फिरविला पाहिजे, आणि ममतेनें मुलाला गोंजारून तसें न करण्याविषयीं त्याला सांगितलें पाहिजे, तें कोणीकडेसच राहतें. आणि उलट मुलास मार खावा लागतो. तसेंच, भातबीत उतरीत असतां किंवा उकरीत असतां मुलीचा हात भाजून ती रडूं लागली ह्मणजे, कारण न पाहतां आणि तिची काकळूत न करितां आई तिला पुष्कळ मारिते. तेंही वाईट आहे. त्या प्रमाणेंच, मुलग्याची बुद्धि प्रगल्भ दशेस आलेली नसल्यामुळें त्याला एकादा गहन विषय कळत नसतो आणि

बापाला वाटतें कीं, तो त्याजकडे चांगलें लक्ष देत नाहीं, ह्मणून तो त्याला समजत नाहीं, ह्मणून तो त्याला मारीत सुटतो. ह्मणजे मुलाचा अपराध कांहीं एक नसतां बापाच्या अजाणपणामुळें त्याला शिक्षा भोगावी लागते. हें सगळे प्रकार फार अनिष्ट आहेत; वाईट आहेत; हे टाळवतील तितके टाळावे.

**गोंदणें**—गोंदून घेऊन आपलें तोंड आणि हात रंगविणें हें पुष्कळ मुलींसच काय, पण प्रौढ बायकांस देखील आवडतं. पण तें कांहीं चांगलें नाहीं. देवानें रूप दिलें आहे, तें स्वच्छ आणि निरोगी ठेवून वागवावें, हें चांगलें आहे. हें मुलींच्या मनांत भरवावें आणि घरच्या यजमानिनींना गोंदण्याचा परिपाठ बंद करावा. तें अगदीं बंद करणें हें जर अशक्य वाटेल, तर त्यास जें वेडेंविद्रें रूप आहे तें नाहींसें करून, तें कांहीं सुरेख दिसेल असें करावें. आणि तें करवेल तितकें कमी करण्याचा प्रयत्न करावा.

**सगळ्यांत अतिशायित वेडेपणाची चाल**—ती कोणती, तर लहान मुलांच्या आंगावर सोन्यारुप्याचे मोलवान दागिने घालणें. त्याच्या योगानें दुष्ट लोकांस अपराध करण्याचा मोह पडतो. कितीही बंदोबस्त ठेविला तरी, मुलें घरच्या माणसांपासून दूर जावयास राहत नाहींत. आणि तीं दूर गेलीं ह्मणजे दागिन्यांच्या लोभानें दुष्ट लोक त्यांचा घात करितात. ह्या

दागिन्यांच्या पायीं आजपर्यंत कितीएक मुलें प्राणांस मुकलीं आहेत. ह्या कृत्यांत दागिने गमावल्यामुळें पैशाचें जें नुकसान होतें, तें, कसेंबसें भरून काढितां येतें; परंतु मारलेलें मूल कांहीं केलें तरी पुन: दृष्टीस पडत नाहीं. आणखी, मूल हातपाय पसरून मेल्याची गोष्ट वेगळी असते. पण ह्या प्रकरणांत मुलांस जें भयंकर मरण येतें, त्याची आठवण झाली ह्मणजे आंगावर रोमांच उभे राहतात. ह्यास्तव सावध व्हा; आणि मुलांच्या आंगावर दागिने घालण्याचें अगदीं टाकून द्या. तितकें न होईल तर सणावारीं मात्र ते त्यांच्या आंगावर कांहीं वेळपर्यंत घाला, आणि मग लागलेच काढून ठेवा. मुलाच्या आंगावर दागिने असतील तोंपर्यंत त्यावर **प्रत्यक्ष आईबापां**ची नजर असली पाहिजे. ह्या शिवाय दुसरा एक मार्ग असा आहे कीं, मुलांच्या आंगावर दागिने घालावयाचे ते खोटे ह्मणजे मुलाम्याचे किंवा चिनी मोत्यांचे घालावें; आणि ते असे खोटे दागिने आहेत असें सर्व लोकांस कळवावें. ह्मणजे चोरास दुष्टवासना होणार नाहीं. परंतु, हीही युक्ति कांहीं सुरक्षित नाहीं. दागिने मुलाम्याचे आणि खोट्या मोत्यांचे असून, चोराला कदाचित् ते खऱ्या सोन्यारुप्याचे आणि खऱ्या मोत्यांचे वाटतील, आणि त्यास दुष्टकर्म करण्यांची प्रवृत्ति होईल, असें भय आहे. ह्यास्तव, दागिने मुळींच घालूं नयेत, हा उत्तम पक्ष होय.

**निर्मळपणा आणि घरादाराची स्वच्छता**— ह्या दोन्हीं गोष्टी आईबापांची रीति पाहून, मुलांस उत्तम प्रकारें शिकतां येतात. ज्या घरांत मूल राहातें, तें घर जर चांगलें स्वच्छ असलें, आणि त्याच्या आसपासची जागा जर चांगली निर्मळ असली, तर, त्यांची संवय त्या मुलांस आपोआप लागेल; आणि घाणेरें घर आणि घाणीनें भरलेली त्याच्या आसपासची जागा, हीं त्याला स्वभावतःच आवडणार नाहींत. मुलांस नेहमीं सांगत असावें कीं, घाणेरडेपणा आणि दुर्गंधि ह्यांपासून दुखणीं येतात, आणि मरण येतें. आणखी, असे प्रकार शेजारीं पाजारीं जेव्हां घडतील, तेव्हां ते त्यांस अवश्य दाखवावे. तसेंच मुलांच्या मनांत असें भरवून द्यावें कीं, गढूळ आणि वाईट पाणी प्याल्यानें रोग होतात. निर्मळ पाणी ह्मणजे काय आणि गढूळ आणि वाईट पाणी ह्मणजे काय, तें त्यांस चांगलें समजावून सांगावें. तसेंच स्वच्छ हवा ह्मणजे काय आणि वाईट हवा ह्मणजे काय, हेंही त्यांस समजवावें; आणि एकंदरीनें त्यांच्या मनांते असें बिंबवावें कीं, प्रकृति चांगली निरोगी राहाण्यास निर्मळ पाणी आणि निर्मळ हवा हीं अत्यंत आवश्यक आहेत. ही गोष्ट लहानपणीं त्यांच्या मनांत चांगली भरली ह्मणजे ती त्यांस मोठेपणीं फार उपयोगी पडेल

**स्नान करणें**—साधारणपणें थंड पाण्यानें स्नान करणें हें हितावह आणि शक्तिवर्धक आहे. स्नाना-

च्या वेळीं पाणी प्रथमतः डोक्यावर घ्यावें, आंगावर घेऊं नये. अशक्तपणा आला असल्यास अथवा प्रकृति बिघडली असल्यास सोमाळ्या पाण्यानें स्नान करावें. प्रातःकाळीं स्नान करणें हें चांगलें; सायंकाळीं स्नान करणें तितकें चांगलें नाहीं. उन्हांत, उघड्या हवेंत, किंवा वाऱ्याच्या सोसाट्यांत स्नान करूं नये. स्नान करते वेळेस आंगाला शिकेकाई, साबण किंवा असाच एकादा मळ काढणारा पदार्थ लावावा; आणि स्नान झाल्यावर कोरड्या दणगट रुमालानें आंग खसखसून पुसावें. स्नान निवाऱ्याच्या जागीं आडवशास करावें. विहिरीचें निर्मळ पाणी स्नानास फार चांगलें. तळ्यांतल्या घाणेऱ्या पाण्यानें स्नान केलें असतां प्रकृति बिघडते. सगळें आंग, आणि विशेषेंकरून आडसंधींची जागा चांगली स्वच्छ धुवून पुसावी. तेथें मळ राहूं देऊं नये. आंग पुसायाचा रुमाल चांगला स्वच्छ, कोरडा, आणि कशाची घाणबीण येत नाहीं, असा असावा.

**खाणें**—विद्वान लोकांच्या शोधांवरून आतां असें ठरलें आहे कीं, प्रौढ माणसांपेक्षां लहान मुलांस अधिक पौष्टिक अन्न पाहिजे. त्यांस नुसता भात बस होत नाहीं. मुलाच्या नेहमींच्या खाण्यांत बाजरी, किंवा गहूं अवश्य पाहिजे. त्याप्रमाणेंच, वरण, तूप, दहीं, ताक, हींही पाहिजेत. शिवाय, ज्या लोकांस जातीसंबंधानें प्रत्यवाय नाहीं, त्यांच्या मुलांस थोडेंबहुत मांस मिळा-

कें, तर तेंही चांगलें. तें अगदीं बेताचें, दुसऱ्या खाण्याच्या प्रमाणांत असावें. मुलास तीनदां जेऊं घालावें. तें बहुतकरून प्रहरदाहा घटकांच्या अंतरानें घालावें. त्याच्या वेळा नियमित असाव्या. खाण्याच्या पदार्थांत पर्याय करावे; ह्मणजे एकच प्रकारचें अन्न तिन्हीवेळां देऊं नये; वेगळ्या वेगळ्या प्रकारचें द्यावें. त्यानें तोंडाला रुचि चांगली राहाते. आणखी, एका प्रकारच्या खाण्याचा वीट आल्यावर तर खाण्यांत बदल अवश्य करावा. हें आमच्या देशांतल्या आयांस फार चांगलें साधतें. लहान मुलांना गोड खाणें ह्मणजे जीवकाप्राण वाटतें. तें फार चांगलें आहे; आणि तें देवानेंच लावून दिलें आहे. कांकीं, मुलांची वाढ चांगली होण्यास गूळ व साखर अत्यंत आवश्यक आहे. ह्मणून, गोड पदार्थ मुलांस पाहिजेत तितके खाऊं द्यावे; पण, ते अजीर्ण होईपर्यंत मात्र खाऊं देऊं नयेत. याप्रमाणेंच मुलांस फळें खाऊं द्यावीं. मुलांस खायास पोटभर घालावें. भूक लागली असें ह्मटल्याबरोबर मुलांस खायास द्यावें. त्यांस भुकेलीं राहूं देऊं नयेत. मुलांनीं अन्न घाई घाईनें गटागट गिळून खाऊं नये, तर, सावकाश, चांगली चव घेऊन, आणि चावून चावून अगदीं बारीक करून मग तें गिळावें. कांहीं आयांना असें वाटत असतें कीं, मुलें जितकें जितकें अधिक खातील तितकें तितकें त्यांस चांगलें. पण ती चूक

आहे. मुलांस आग्रहानें असें कांहीं एक खायाला घालूं नये. नको ह्मटल्याबरोबर त्यांला खाण्याला घालण्याचें बंद करावें. पुष्कळ जेवीत नाहींत ह्मणून मुलांस मारूं नये. सारांश, मुलांस आग्रहानें कांहीं कोंबून भरवूं नये. स्वाभाविक रीतीनें ज्याची गरज असेल, तेवढें द्यावें, अधिक देऊं नये, हा मार्ग उत्तम दिसतो.

**दांत**—मुलांचे दांत मातीनें कधीं घांसूं नयेत; राखुंडीनें किंवा बदामाच्या सालींच्याच राखेनें घांसावें; दांत घांसायाचे कुंचे मिळतात, त्यांनींही दांत घांसले तर ते चांगले स्वच्छ होतात. कांहीं लोक मिठानें दांत घांसतात. तें बरोबर नाहीं, असें वैद्यांचें ह्मणणें आहे.

**मुलांचे पोषाक**—हा नुसता सुंदर दिखाऊ असण्यापेक्षां उपयोगी असावा, हें विशेष लक्षांत ठेविलें पाहिजे.

**विणकर**—मुलांच्या कपड्याची विणकर चांगली जाड असावी; बारिक नाजूक असूं नये; कांकीं, मुलें आपल्या कपड्यांची ओढाताण फार करितात, ह्मणून ते लवकर फाटतात.

**रंग**—पांढऱ्या स्वच्छ रंगाचा कपडा सहसा घेऊं नये. कांकीं तो लवकर मळतो.

**सभ्यपणा**—मुलांचे सगळे कपडे चांगले सभ्यपणाचे ह्मणजे सभ्यपणास शोभतील, असे असावे. मुलांसउघडींबाघडीं फिरूं देऊं नयेत.

**शीतोष्णापासून संरक्षण**—शरीरास शीतोष्णापासून इजा होऊं नये, अशा प्रकारें मुलांचे कपडे करावे. ह्यावरून हें उघड आहे कीं, ऋतुमानाप्रमाणें मुलांचे कपडे वेगळे वेगळे असावे. ह्मणजे आंगावर कपडे घातल्याच्या योगानें गरमी फार होऊं नये, तशी थंडीही लागूं नये. थंडीची बाधा होऊं नये ह्मणून, विशेषेंकरून, गळ्यापासून कंबरेपर्यंत शरीरास फार जपलें पाहिजे. कांकीं, देहाचे मुख्य अवयव कायते त्यांत आहेत.

**स्वच्छपणा**—कपडे अगदीं स्वच्छ असावे; ह्मणून ते वारंवार धुतले पाहिजेत, त्यांस कधीं घाण येऊं नये.

**सोईस्करपणा**—कपडे सईल किंवा ढिले असावे; ते असे कीं, हातपाय इकडे तिकडे वळविण्यास त्यांपासून कधीं अडचण होऊं नये. मुलाला नेहमीं चळवळ करावीशी वाटत असते, तिला कपड्याचा अडथळा नसावा. रुधिराभिसरण आणि कोठ्याचे व्यापार ह्यांस व्यत्यय येईल, इतके तंग कपडे मुलाला कधीं घालूं नयेत. आंगावर घट्टे किंवा वण पडत, इतके तंग पोषाक कधींही करूं नयेत. असे वण मुलग्यांच्या आणि मुलींच्या कंबरांवर पुष्कळ आढळतात.

कांकीं, मुलगे धोतरें घट्ट नेसतात आणि मुली साड्या घट्ट नेसतात. मुलींच्या चोळ्या देखील कधीं कधीं इतक्या तंग केलेल्या असतात, कीं, त्यांच्या योगानें श्वासोच्छ्वासास अडचण पडते, आणि त्यामुळें कधीं कधीं दुखणें देखील येतें.

**आंथरूण**—ह्याच्या संबंधानेंही वर सांगितलेल्या गोष्टी लक्षांत ठेवाव्या. निजून उठल्याबरोबर आंथरुणाची वळकटी करूं नये. तर तें बराच वेळ तसेंच उघडें राहूं द्यावें; ह्मणजे, त्यावरून वारा वाहून, त्याची सगळी घाण नाहींशी होते. मूल निजलें ह्मणजे त्याच्या तोंडावर पांघरूण घालणें ही मोठी चूक आहे. कांकीं, त्याच्या श्वासोच्छ्वासाबरोबर जी हवा बाहेर पडते, ती बाहेर निघून जाण्यास त्यानें अडथळा होतो. आणखी, त्याच त्याच हवेचा श्वासोच्छ्वास पुनः पुनः करणें हें प्रकृतीस फार वाईट आहे. त्यानें दुखणें येतें.

**हातरुमाल**--मुलाजवळ नेहमीं एक हातरुमाल असावा, ह्मणजे त्यानें त्याला, पाहिजे तेव्हां नाकतोंड पुसतां येतें. आंगावरच्या दुसऱ्या वस्त्रास नाकतोंड पुसणें हें फार घाणेरें आहे. तें मुलास कधीं करूं देऊं नये. लग्नाकार्याच्या समारंभांत किंवा सणावारीं घेण्यास वेगळे चांगले हातरुमाल असावे. आणखी,

असे चांगले तऱ्हेतऱ्हेचे रुमाल वेगळ्या वेगळ्या प्रसंगास असणें हें मुलांस आणि आईबापांस एक मोठें भूषण वाटावें. ह्यांत आईबापांची चतुराई दिसून येते.

**डोक्याचे केंस**—मुलांच्या डोक्याचे केंस कधींही गच्च बांधू नयेत. ते ढिले बांधावे त्याप्रमाणेंच फणीनें ते खसाखस मोठ्या जोरानें विंचरूं नयेत. त्यानें डोक्यास त्रास होतो. ते चांगले निर्मळ ठेवून हळूच ढिले चापचोपीनें बांधलेले असावे.

**व्यायाम**—ह्याच्या संबंधानें कांहीं नियम आवश्यक आहेत.

व्यायाम हा मुलांच्या शरीरप्रकृति चांगल्या राहण्यास आवश्यक आहे.

व्यायाम मुलें आपोआप करितील, तितका तो त्यांस चांगला असतो.

व्यायाम जितका आनंददायक असेल, तितका चांगला असतो.

व्यायाम जितका सहजगत्या होईल, तितका चांगला.

ह्यावरून हें उघड झालें कीं, तालमींतला व्यायाम कांहीं फारसा चांगला नाहीं.

व्यायाम करावयाचा तो उघड्या हवेंत करावा; घरांत कोंडलेल्या जागेंत करूं नये. ह्मणजे तेथें हवा मोकळी आणि स्वच्छ असावी. मग ती कोठें शेतांत असो, किंवा कोठें समुद्रकांठीं असो.

व्यायाम तरी अगदीं थकून गेल्यावर मग कधींही करूं नये. व्यायाम केल्यावर लागलेंच मुलास स्नान घालूं नये कीं खाऊं घालूं नये. व्यायाम हा जसा मुलांस आवश्यक आहे, तसा मुलींसही आवश्यक आहे. ही गोष्ट आमच्या देशांतल्या लोकांच्या लक्षांत येत नाहीं. ज्या मुलींस लहानपणीं पुष्कळ व्यायाम मिळतो, त्या मोठेपणीं चांगल्या बळकट आणि निरोगी बायका होतात, आणि त्याची प्रसूती सहज होते. पण, ज्यांस लहानपणीं व्यायाम मिळत नाहीं, त्या मोठेपणीं नाजूक आणि अशक्त बायका होऊन, त्यांस प्रसूति ह्मणजे केवळ प्राणसंकट होतें. मुलांस स्वभावतःच खेळण्याची इच्छा असते, आणि त्या खेळानें त्यांस व्यायाम पुष्कळ होतो. ही योजना परमेश्वरानें करून ठेविली आहे. ती मुलांच्या आरोग्यास आणि शरीरवृद्धीस अत्यंत आवश्यक आहे. ह्मणून मुलें खेळण्याकारितां इकडे तिकडे धांवूं लागलीं ह्मणजे त्यांस रागें भरणें, आणि एके जागेवर निमूटपणें बसविणें हें वेडेपण आहे. त्यांस पाहिजे तितकें हिंडूं द्यावें आणि खेळूं द्यावें, मुलांस आणि मुलींस पुष्कळ व्यायाम होईल, असे खेळ आपल्यांत पुष्कळ आहेत. ते खेळ जुने ह्मणून टाकून देणें हें चांगलें नाहीं. ते चालू ठेवावेत ते आपल्या लोकांच्या रीतीभातींस फार चांगले आहेत. त्यांच्या योगानें मुलांस आनंद हो-

थाम होतो. हे खेळ बंद करून त्यांच्या ऐवजीं दुसरे चालू करणें हें काम कांहीं सुकर नाहीं. कांकीं, आपल्या देशांतल्या सर्व प्रकारच्या लोकांचा ह्या खेळांशीं संबंध आहे.

**झोंप**—मुलास नऊ दाहा तास अवश्य पाहिजे. ती कमी करूं नये. सायंकाळीं मुलास जेवणाच्या आधीं निजूं देऊं नये; निजलेल्या मुलास मुद्दाम आपण होऊन जागें करून जेवणास बसविणें हें फार वाईट आहे. मुलांनीं आपल्या आईबापांच्या, किंवा चाकरांच्या अगदीं जवळ निजूं नये. त्यांस रात्रींतून एकदा लघवीस उठवावें.

**हातचाळा**—पुष्कळ कारखाने हातचाळ्यावर चालतात ह्मणून, लहान मुलांस ज्या कितीएक गोष्टी हातांनीं करावयाची फार हौस असते, त्या गोष्टी त्यांस मोठ्या आनंदानें करूं द्याव्या. त्यांच्या योगानें त्यांचें हस्तकौशल्य वाढेल, आणि त्यांचे आंगीं चैतुरपणा येईल. गोट्यांनीं खेळणें, चाकूनें लेखण्या करणें, मेणाचीं चित्रें करणें, सुईनें शिवणें, कातरीनें नानाप्रकारच्या आकृति कापणें, चित्रें कापणें, आखणें, चित्रें काढणें, लिहिणें, फळें कापणें, दोऱ्यांच्या आकृति करणें, दोऱ्यांचीं कोडीं सोडविणें, फुलांच्या माळा करणें, इत्यादि गोष्टी मुलांस खुशाल करूं द्याव्या. त्याच्या योगानें, त्यांस उद्योगाची संवय लागते, मनाची एका-

भ्रता करतां येते, आणि हातांस व बोटांस चपळता प्राप्त होते.

**शरीर आणि मन**—ह्यांच्या संबंधानें कांहीं सिद्धांत अगदीं ठरून गेले आहेत. ते हेः—शरीर आणि मन ह्यांचा संबंध फार निकट आहे. तीं दोन्हीं एक सारख्या महत्वाचीं आहेत. ह्मणून त्या दोहोंकडे एकसारखें लक्ष पुरविलें पाहिजे. त्या दोहोंचीं अभिवृद्धि एकसारखी झाली पाहिजे. जर शरीराची पुष्कळ अभिवृद्धि केली तर मन मागें राहतें,—म्हणजे मनाचें नुकसान होतें. त्याप्रमाणेंच, जर मनाची अभिवृद्धि पुष्कळ केली, तर शरीर मागें राहातें,—म्हणजे शरीराचें नुकसान होतें. सध्यां आमच्या लोकांत, मनाच्या अभिवृद्धीच्या नादानें शरीराचें नुकसान होत चाललें आहे. असें करूं नये. शरीर सुदृढ असावें, आणि मन सुदृढ असावें, अशी तजवीज ठेविली पाहिजे. ह्यांपैकीं शरीराच्या सुदृढतेकडे आधीं लक्ष दिलें पाहिजे.

शरीर रोगी आणि अशक्त आहे, आणि विद्या पुष्कळ आहे, तर कांहीं तितकें सुख होत नाहीं; पण शरीर चांगलें निरोगी आणि सशक्त आहे, आणि विद्या बेताची आहे, तर सुख पुष्कळ होतें.

हावऱ्या बापाला असें वाटत असतें कीं, माझ्या मुलानें एकदा लवकर मोठें विद्वान व्हावें; म्हणून तो

त्याच्या डोक्यावर शिकण्याचें ओझें अगदीं लहानपणीं लादतो. पण तें फार वाईट आहे. आणि तें मोठें मूर्खपण आहे. कांकीं, त्या ओझ्याच्या भारानें मुलाचें शरीर अगदीं अशक्त होऊन जातें; आणि शरीर अशक्त झालें ह्मणजे पुढें विद्या होत नाहीं; आणि प्राप्त झालेल्या विद्येचा उपभोग घेतां येत नाहीं. एकूण त्यापासून सुख होत नाहीं.

मन काय आणि शरीर काय, कांहीं एका नियमित प्रमाणानें ? तीं वाढावीं, अशी योजना विधात्यानें करून ठेविली आहे. त्या योजनेस साह्य करणें एवढेंच बापाचें काम असावें. तें मारून मुटकून वाढविण्याचा प्रयत्न त्यानें करूं नये.

मूल जर फारच अभ्यास करूं लागलें, तर, त्यास धमकावून बेताचा अभ्यास करायास सांगावें. अतिशयित अभ्यास करण्यास—ह्मणजे शक्तिबाह्य अभ्यास करण्यास—उत्तेजन देऊं नये.

मुलगा तेरा वर्षांचा असतां प्रवेश परीक्षेंत उतरला ह्मणजे बस आहे. आकराव्या वर्षीं उतरण्याची घाई त्याच्या मागें लावूं नये.

मुख्य धोरण एवढेंच ठेवावयाचें कीं, अतिशयित किंवा बेताबाहेर अभ्यास केल्यानें शरीराला इजा होऊं नये, आणि अशक्तता येऊं नये.

**मज्जा आणि मन**—हीं दोन्ही मुलामध्यें असतात. ह्यांतल्या कोणाकडे विशेष लक्ष द्यावें ? ह्याचा निर्णय

बापानें करावा. त्यांत एवढें पहावें कीं, मूल मोठें झाल्यावर त्याला विशेष उपयोगीं काय पडेल. लोहाराला मज्जा अधिक उपयोगीं पडतात; सोनाराला मन अधिक उपयोगीं पडतें; कारकूनाला मज्जांची गरज लागते, त्यापेक्षां ती शेतकऱ्याला अधिक लागते; पंडिताला हमालापेक्षां मज्जांची गरज कमी लागते; आणि विद्वानापेक्षां योद्ध्यांस मज्जांची गरज अधिक लागते. हें लक्षांत ठेवावें कीं, पृथ्वीवरच्या सर्व देशांत आणि त्यांत विशेषेंकरून हिंदुस्थानांत, मनाच्या परिश्रमांपेक्षां मज्जांच्या परिश्रमांची वाण फार आहे. निर्वाहास मिळण्यास मज्जांचे श्रम ह्मणजे शारीरश्रम अधिक पाहिजेत आहेत. आणि मनुष्याच्या निर्वाहास शारीरश्रम हा अगदीं खातरीचा मार्ग आहे; तसा प्रकार मानासिक श्रमांचा नाहीं. कोठेंही झालें तरी धडधाकड्या हमालाला काम थोडेंबहुत तरी मिळतें; पण, एकाद्या मोठ्या पंडितास काम मिळायाची फार मारामार पडते.

**औषधें**–आपल्या मुलांची काळजी कांहीं आईबापें फारच वाहतात; आणि त्यांस तीं औषधें मनस्वी देतात. पण तें बरें नाहीं. आवश्यक वाटेल तेव्हांच औषध द्यावें; एरव्हीं देऊं नये. इतर प्राण्यांच्या मुलांस जशीं कधीं कांहीं औषधें लागत नाहींत, तशीं माणसांच्या मुलांस देखील औषधाची गरज सहसा लागत नाहीं. मुलें औषध घेत नाहींत, तेव्हां त्यांस

धरून पालथीं पाडून, तें पाजीत असतात. ही रीति अगदीं रानवळ आहे. आईबापांचें वजन मुलांवर असें असावें कीं, त्यांनीं सांगितल्याबरोबर, मुलांनीं हूंचूं न करितां औषध घ्यावें. हें वजन कसें ठेवावें, ह्याचें विवेचन ह्या पुस्तकांत दुसरीकडे केलें आहे. मुलें लहान आहेत, तोंच त्यांना गोस्तनदेवी काढून घ्याव्या; ह्मणजे त्यांना आंगच्या देवी यावयाच्या नाहींत. कांहीं आईबापें ह्या गोष्टीची हयगय करितात, आणि देवी काढवणें लांबणीवर टाकितात, त्यामुळें त्यांचीं मुलें देवी येऊन मरतात. तसेच मुलांचें डोळे वरचेवर येतात. त्यांस औषधें दवाखान्यांत मिळतात, तीं घ्यावीं. असें न करितां, कांहीं आईबापें आपलीं मुलें वैदूंच्या किंवा सटरफटर वैद्यांच्या हातीं सोंपितात. त्याचा परिणाम असा होतो कीं, त्या मुलांच्या डोळ्यांस जन्माची खोड जडते. तें फार वाईट आहे. डोळे हें इंद्रिय सर्व इंद्रियांत श्रेष्ठ आणि अत्यंत उपयोगी आहे. त्याची उपेक्षा आईबापांनीं कधींही करूं नये.

**मूल सुखी तर बाप सुखी, आणि मूल दुःखी तर बाप दुःखी असें असावें.**—ह्यांत मोठी मौज आहे. ज्याच्या योगानें मुलास आनंद होतो, त्याच्या योगानें आपणासही आनंद होतो असें बापानें दाखवावें. तेणेंकरून मुलाचा आनंद दुणावतो. ज्या गोष्टी कर-

ण्यांत मुलास आनंद होतो, त्या गोष्टी करण्यासदेखील बापानें लागावें.

आपला खेळ आपल्या समजुतीप्रमाणें छानदार मांडून, तो पाहायास हौसेनें जर मूल बापास बोलाऊं लागेल, तर त्यानें तो अवश्य जाऊन पाहावा, आणि त्याविषयीं आपला संतोष प्रदर्शित करावा.

मुलास कधीं कधीं लहानसें घर बांधावेंसें वाटतें, तेव्हां बापानें त्याला त्या कामाकरितां लहान लहान काटक्या तासून द्याव्या. त्याप्रमाणेंच त्या घरावर फुलांच्या माळा सोडाव्या, असें मुलाच्या मनांत आल्यास त्याला फुलें मिळवून द्यावीं, आणि आपण माळा करूं लागावें. आणखी त्या माळा नीट सुरेख दिसत अशा त्यावर घालण्यास त्यास मदत करावी.

मुलांनीं अगत्यानें बोलाविलें तर, बापानें त्यांच्या भातुकलीला देखील आनंदानें जावें.

मुलाच्यां मनांत आपली होडी पाण्यांत सोडावयाची असली तर त्या कामांत बापानें त्यास साह्य करावें. ह्मणजे, त्या होडींत त्याला एक लहानशी बैठक करून द्यावी, किंवा दोन वल्हीं करून द्यावीं.

अशा अनेक प्रकारांनीं बापास आपणा स्वतःला करमणूक करतां येऊन, मुलांच्या आनंदास भर घालतां येईल.

अशा रीतीनें वागल्यानें बापावर मुलांची प्रीति फार जडते, आणि त्यांवर त्याचें वजन पडतें. त्याप्रमाणेंच, मुलांस लहानसाहान अडचणी आल्या किंवा दुःख झालें, तर त्याविषयीं बापानें वाईट वाटल्यासारखें दाखवून दुःख प्रदर्शित करावें. मुलांस शिक्षा करावयाचा प्रसंग येतो, तेव्हांदेखील, त्याबद्दल आपणास दुःख झालें आहे, व निरुपायास्तव, फार नाखुषीनें आपण ती करीत आहों, असें त्यानें मुलांस दाखवावें. कांहीं बाप आपल्या मुलांस अशा रीतीनें वागवितात कीं, तो घरांतून गेला म्हणजे त्यांस मोठा आनंद होतो. हें फार अनिष्ट आहे. मुलांस ज्या रीतीनें वागवायास पाहिजे, त्या रीतीनें वागविलें म्हणजे, बाप घरीं राहिला असतां त्यांस आनंद होतो. सारांश, बाप हा आपणांस सुख देणारा आहे, दुःख देणारा नाहीं, असें मुलांच्या मनांत भरलें पाहिजे.

**बाप वागतो तशीं मुलें वागतात.**—हें लक्षांत ठेवावें कीं, दुसरे कसें वागतात तें पाहून आपण तसें वागावें, अशी वृत्ति मुलांच्या ठायीं फार असते.

जर बाप चांगल्या रीतीनें वागत असला, तर, तें पाहून, मुलें, आपोआप त्याप्रमाणें वागूं लागतील. हें काम, त्यानें कितीही बोध केला तरी व्हावयाचें नाहीं.

बाप जर पावलों पावलीं रागावत असला, तर मूल तसेंच रागीट होईल.

बाप जर सभ्य रीतीनें वागत असला, तर, त्याचें पाहून मूल तसें वागूं लागल. ह्मणून, मुलाच्या समक्ष चांगल्या रीतीनें वागण्याविषयीं बापानें फार सावधगिरी ठेविली पाहिजे. ह्मणजे, ज्यारीतीनें मोठेपणीं आपल्या मुलानें वागावें असें बापास वाटत असेल, त्या रीतीनें त्यानें स्वतः आपलें वर्तन ठेविलें पाहिजे.

ही गोष्ट कुटुंबांतल्या सगळ्या मोठ्या माणसांनीं लक्षांत ठेविली पाहिजे.

त्यावरून, मुलांस वाईट संगतीपासून दूर ठेवणें हें फार अगत्याचें आहे, हें सहज लक्षांत येईल.

**मुलांच्या आंगचे-सद्गुण आणि दुर्गुण**– मुलांच्या आंगच्या कोणत्या चांगल्या गुणांस ते वाढतील असें उत्तेजन देत असावें, आणि त्यांच्या आंगचे कोणते वाईट गुण नाहींतसे होत असा बोध त्यांस निरंतर करावा बरें ?

ह्याचें उत्तर उघड आहे. जगामध्यें जे गुण चांगले ह्मणतात, ते गुण मुलांच्या आंगीं वाढत असें त्यांस उत्तेजन देत असावें; आणि जे गुण वाईट असे ठरलेले आहेत, ते नाहींतसे होत, असा त्यांस बोध करीत असावें.

आईबापांची, भावंडांची, घरच्या इतर माणसांची आणि चाकर माणसांची देखील मर्जी कशी संपादावी,

आणि त्यांची प्रीति आपणांवर कशी ओढून घ्यावी, हें बापानें मुलांस शिकवावें. एवढेंच केवळ नाहीं, तर, शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या आणि साधारण सर्व लोकांच्या प्रीतीस आपण कसें पात्र व्हावें, हेंही त्यांस शिकवावें.

सत्यशीलता आणि प्रामाणिकपणा हे गुण मुलामध्यें निरंतर विद्यमान असावे, ह्याविषयीं विशेष लक्ष दिलें पाहिजे.

तसेंच, लोकांत वागण्याच्या रीतिभाती त्याला चांगल्या लागलेल्या असाव्या, ह्याविषयींही आईबापानीं फार जपलें पाहिजे.

**नौकर**–घरांतल्या हलक्या प्रतीच्या नोकरांच्या संगतीनें, अथवा त्यांचें पाहून, मुलांस भलभलत्या गोष्टी करण्याची संवय लागत असते; ती न लागावी ह्याविषयीं सावधगिरी ठेवावी.

मोठमोठ्या संभावित कुटुंबांतल्या मुलांस अशा प्रकारच्या नौकरांच्या योगानें वाईट संवय लागून, त्यांच्या पायीं त्यांची फार हानि झाल्याचीं कितीएक उदाहरणें आह्मांला ठाऊक आहेत.

**आवडतें अन्न सहज पचतें; आवडतें ज्ञान सहज लक्षांत राहातें**—हे दोन सिद्धांत लक्षांत ठेवा, आणि त्याप्रमाणेंच उद्योग चालूं द्या.

मुलास अन्न आवडतें कसें करावें, हें पुष्कळ लोकांस बरेंच ठाऊक असतें; परंतु, त्याला ज्ञान आवडतें कसें करावें, हें ठाऊक नसतें.

ह्मणून, ज्ञान आवडतें कसें करावें, ह्याविषयीं कांहीं सूचना येथें करितों.

प्रत्येक मुलाच्या अंतःकरणांत जिज्ञासा असते; तिच्या योगानें त्यास आसपासच्या वस्तूंविषयीं ज्ञान संपादण्याची इच्छा साहाजिक होते. तें ज्ञान संपादण्यास त्याच्या इंद्रियांचे उद्योग चाललेले असतात, आणि, त्यांपासून जें ज्ञान होतें, त्याच्या योगानें त्याला आनंद होत असतो. वस्तु दृष्टीस पडते तिला हात लावावा, ती हालवावी, ती चाखून पाहावी, तिचा वास घ्यावा, आणि ती वाजवून पाहावी, असा त्याला नादच असतो, ह्या नादानें त्याला पुष्कळ वस्तूंची माहिती होते; आणि त्याचें ज्ञान दिवसानुदिवस वाढत जातें. हे सगळे उपाय योजून होण्यासारखे ज्ञान असतें तें झाल्यावर, त्या वस्तूंत विशेष कांहीं नाहीं, असें मुलाला वाटूं लागतें; आणि मग तें त्या वस्तुकडे लक्ष देईनासें होतें. आणखी मग त्याला दुसऱ्या एकाद्या नव्या वस्तूकडे लक्ष द्यावेसें वाटतें.

ह्यावरून हें उघड झालें कीं, मुलाचें ज्ञान वाढविण्यास बापानें त्याला नेहमीं नव्यानव्या वस्तु दाखविण्याचा क्रम ठेविला पाहिजे. एवढेंच केवळ नव्हे,

तर ज्या वस्तु मुलानें पूर्वी पाहिल्या असतील, त्या वस्तु दुसऱ्या वस्तूंच्या सान्निध्यानें किंवा संमीलनानें कशा दिसतात, त्यांच्यांत विशेष गुण कोणते आहेत, आणि त्या वस्तूंचा संबंध इतर वस्तूंशीं काय आहे, हें मुलास समजून सांगितलें ह्मणजे त्याला फार आनंद होतो, आणि त्याच्या मनाचें रंजन होतें. उदाहरण, एक वेळूची काठी घ्या. ती मुलाला चांगली ठाऊक झा-लेली असली तरी, आणखी दोन काठ्या घेऊन त्या तीन एकत्र बांधिल्या ह्मणजे तिवई होते, तिजवर खेळा-ची पेटी ठेवायास सांपडते. त्यांत आणखी एक काठी घातली ह्मणजे, त्या काठ्यांची चौकट करतां येते. चौकटीला चार कोन असतात; चार बाजू असतात; त्यांत सामेरासमोरच्या बाजू बरोबर असल्या तर बऱ्या दिसतात; लहान मोठ्या असल्या तर वाईट दिसतात. हें दाखविलें ह्मणजे मुलांस चमत्कार वाटतो. त्याप्र-माणेंच खेळायाचे पत्ते कांहीं वेळ पाहिल्यावर त्यांत कांहीं विशेष नाहीं, असें मुलाला वाटूं लागतें. पण त्या पत्त्यांचें घर करून त्याला दाखविलें, ह्मणजे, त्याचें मन तिकडे वेधतें, आणि तशीं घरें तें करूं लागतें. तशीच, धातूची तार असते, तींत कांहीं विशेष नाहीं, असें मुलाला वाटलेलें असतें. ती तार वर्तुळाकार केल्यानें कशी दिसते, तिकोनी केल्यानें कशी दिसते, तिचा चौकोन बनवितां येतो, ती लांब करून ठेविली

आणि एकाद्या काठीनें वाजविली ह्मणजे तिचा आवाज चमत्कारिक होतो, इत्यादि गोष्टी मुलास दाखविल्या ह्मणजे, त्या तारेची त्याला मौज वाटूं लागते. असेंच, एकादें लहानसें भिंग असतें, त्याचें मुलाला कांहीं वाटत नसतें. पण, त्यावर काजळ धरून त्यांतून कसें दिसतें तें त्याला दाखवावें, आणखी, वेगळ्या वेगळ्या रंगाचे आणि वेगळ्या वेगळ्या आकारांचे कांचेचे तुकडे मुलास देऊन, त्यांतून वस्तूकडे पाहायास सांगावें, ह्मणजे त्यास पुष्कळ मौज वाटेल. आणखी त्यांत, अंतर्गोल, बहिर्गोल अशा कांचा जर मुलास दाखवायास सांपडतील, तर मग तर त्याला नाना प्रकारच्या पुष्कळ गोष्टी कळून अत्यानंद होईल.

साधारण जास्वदीच्या फुलाचें मुलाला कांहीं वाटत नसतें. पण, ते कुसकुरून कागदावर चोळावें, आणि त्यावर चुन्याच्या पाण्यानें ल्याहावें; ह्मणजे लागलींच तांबडीं लाल अक्षरें उठतात. तीं पाहून मुलास मोठा चमत्कार वाटतो. त्या प्रमाणेंच, चुन्यामध्यें हळद मिसळली कीं लागलाच तांबडा रंग होतो, हें पाहून मुलास नवल वाटतें, आणि त्याची जिज्ञासा उत्तेजित होते.

पिपाणीचें पान ह्मणजे मुलाला कांहीं वाटत नसतें. पण, त्याची पिपाणी करून तुह्मी वाजवूं लागा, कीं

लागलीच, मूल तुमच्या हातांतून ती घेईल, आणि वाजवूं लागेल. माडाची विरी ह्मणजे कांहीं नाहीं. पण, तिचें गलबत करून पाण्यांत सोडा, कीं मुलाला गंमत वाटेल. जुनें वर्तमानपत्र उगाच केरासारखें पडलेलें असतें; त्याचा पतंग करा आणि तो उडवा ह्मणजे मुलाचें मन त्यानें वेधलेंच. नरोटी ह्मटली ह्मणजे कांहीं नाहीं. पण तिच्या बुडाला एक बारीकसें भोंक पाडून ती पाण्यांत सोडा; ह्मणजे, ती हळू हळू पाण्यानें भरत आहे असें पाहून मुलाला चमत्कार वाटेल, आणि ती चटकन बुडून तळाला जाईल तेव्हां त्याला मौज वाटेल. त्यांतच, तें भोंक लहान ठेवून, त्यांतून पाणी येतां येतां, ती नरोटीबरोबर एका घटकेनें पटकर बुडावी, असें जर केलें, तर, मुलाला तें एक प्रकारचें घडयाळ वाटेल, आणि आनंद होईल; आणखी अशा प्रकारें ती नरोटी, मध्यंतरीं खंड न पडूं देतां, सात वेळ बुडाली, ह्मणजे एक प्रहर गेला असें त्यांस समजेल.

मुलाला वाळुकायंत्र दाखवावें; आणि त्यानें वेळ कशी मोजतां येते, तें समजावून सांगावें. एकाद्या गलासाच्या कांठावर जोरानें ओलें बोट फिरविलें ह्मणजे चमत्कारिक आवाज निघतो, तो ऐकून मुलास गंमत वाटते. रबराचा फुगा फुगवून मुलाला दाखवावा, आणि त्यांत हवा भरली आहे, असें समजून सांगावें.

त्यावरून त्याला असें समजावें कीं, हवा ही जरी दिसत नाहीं, तरी, ती इतर पदार्थांसारखी पृथ्वीवर असून, ती, दाबून लहान जाग्यांत भरतां येते. एक गलास घ्यावें त्याच्या बुडाला, थोडा डिंक लावून, एक लहानसें कागदाचें चिटोरें चिकटवावें; आणि मग तें गलास पाण्यानें भरलेल्या गंगाळांत अगदीं बरोबर उभें धरून, उघडें, तळापर्यंत बुडवावें, तरी, त्या गलासांतला कागद भिजत नाहीं. ह्याचें कारण असें कीं, त्या गलासांतली सगळी हवा तेथें जमून राहातें, त्यामुळें पाण्यास तेथें जाण्यास सवड मिळत नाहीं. हें मुलास चांगलें समजावून सांगावें. आणि, समुद्रांत बुडी मारण्याची घांट ह्याच धोरणावर केलेली असते, असें त्याच्या मनांत भरवून द्यावें.

बाटली किंवा कांचेची नळी पाण्यानें भरून मुलास पुष्कळ मौज करून दाखवितां येईल. थोडासा कापूर घ्यावा. तो, पाण्यानें भरलेल्या पातेल्यांत सोडून चेतवावा; आणि मग त्यावर, बरोबर पाण्यास तोंड लावून, गलास पालथें घालावें. ह्मणजे, कांहीं वेळानें त्या ज्योतीचें तेज कमी कमी होऊन, आणि ती जोती लहान लहान होऊन, कापूर शिलक असतांही, विझून जाईल. त्यावरून मुलास असें दाखवावें कीं, विस्तव पेटण्यास किंवा ज्वाला जगण्यास हवा आवश्यक आहे.

ओहऱ्याकडून हातभर लांब एक जस्ताची नळी करवावी; आणि तिच्या एका टोंकास बरीच उंच आणि दुसऱ्या टोंकास बरीच आंखूड परंतु तीन चार भोकें पाडलेल्या तोंडासुद्धा नळी अशा दोन नळ्या बसवाव्या त्याची आकृती अशी होईल:—



ही सगळी एक झालेली नळी मुलाला दाखवावी. ती उभी धरून, उंच नळीमध्यें पाणी ओतावें, आणि तें आंखूड नळींतून कारंज्यासारखें वर उडे असें करावें. तें पाहून मुलांस गमत वाटेल. त्या लहान नळींच्या तोंडास जीं भोकें पडलेलीं असतील त्यावर लहान लहान वाटाणें किंवा कर्दळीचे मणी ठेवावे, ह्मणजे ते आंतल्या पाण्याच्या जोरासारखे पटापट उडतील, आणि तें पाहून मुलांस मोठी करमणूक होईल.

आणखी पाणी जितक्या उंचीवरून प्रथम निघतें,

तेतकेंच वर चढतें, अधिक चढत नाहीं, हें मुलांस चांगलें समजून सांगतां येईल.

नंतर तें सगळें यंत्र, उभ्या नळ्यांचीं तोंडें जमिनीच्यावर राहात अशारीतीनें, पुरावें, आणि मग त्यांत पाणी घालून उडवावें; ह्मणजे मुलांना फार मौज वाटेल. आणखी मोठमोठ्या शहरांत पाण्याचा पुरवठा कसा करितात, त्याची कल्पना त्यांस चांगली होईल.

**पायरी पायरीनें जावयाचें**—चालतांना किंवा वर चढतांना मुलांस हळूहळू पायरीपायरीनें गेलें पाहिजे. हीच गोष्ट ज्ञानसंपादनास लागू आहे.

अशी कल्पना करा कीं, मडकीं कशीं करितात, हें तुमच्या मनांत मुलास समजावून सांगावयाचें आहे, तर, प्रथमतः त्याला चिकण मातीची रास दाखवावी. नंतर तींत पाणी घालून, ती मळून, तिचे गोळे कसे करतात तें दाखवावें. आणखी मग, त्यांतला एक एक गोळा चाकावर ठेविल्यावर, तें गरगर फिरत असतां, त्या गोळ्या भोंवता हात धरून त्याला भांड्याचा आकार कसा देतात, तें दाखवावें. त्यानंतर, ती मडकीं, चाकावरून काढून घेऊन, वाळूं देतात, कठिण होऊं देतात, आणि भट्टींत घालून भाजतात, हें त्यांस समजावून द्यावें. अशा रीतीनें मडक्यांविषयीं मुलाला माहिती अनायासें चांगली होईल.

त्याप्रमाणेंच, कापड कसें करतात हें मुलास समजून देण्यास लागावें. मुलाला प्रथम कापशीच्या झाडाजवळ नेऊन, तिच्या एका बोंडांतला कापूस काढावा. मग त्यांतल्या सरक्या कशा काढतात तें सांगावें. मग तो बारीक पिंजून त्याच सुत कसें काढितात तें सांगावें. मग तें सुत मागावर कसें मांडतात तें सांगावें. आणि मग त्यांत आडवट भरून कापड कसें तयार होतें तें सांगावें. एवढीं उदाहरणें बस आहेत. कोणत्याही प्रकारचें ज्ञान देते वेळेस हाच क्रम धरिला पाहिजे. मागचे सिद्धांत न शिकवितां, मुलास एकदम पहिल्या पुस्तकाचा सत्तेचाळिसावा सिद्धांत जर तुह्मी शिकविण्याचा प्रयत्न कराल, तर तुमचे श्रम अगदीं फुकट जातील. ह्मणून, पायरीपायरीनेंच गेलें पाहिजे. आणि त्यांतही, एका पायरीवर, पाय बरोबर बसल्याशिवाय तिच्या पुढच्या पायरीवर पाऊल ठेवितां कामास नये.

**मुलाचे ठायीं आनंदी वृत्ति उत्पन्न करावी**—मनुष्य वयानें केवढेंही असो, त्यास सुख होण्यास त्याचे ठायीं आनंदी वृत्ति अत्यंत आवश्यक आहे. ह्मणून ती मुलाचे ठायीं उत्पन्न करावी. ती उत्पन्न करण्याचा उत्तम मार्ग ह्मटला ह्मणजे मुलाशीं नेहमी हस्तमुख रहावें, आणि आपण स्वतः आनंदी वृत्तींत असावें. मुलाशीं आनंदानें बोलावें. रागाचें बोलणें टाकावें.

मुलाचें मन नेहमीं संतुष्ट ठेवावें. सहसा त्याच्या आनंदाच्या आणि सुखाच्या आड येऊं नये. असें वागल्यानें मुलाचें किती बरें होतें, हें मनांत आणिलें, आणि तें पुरें समजलें, ह्मणजे असें वागणें कांहीं कठिण वाटत नाहीं; सोपें वाटतें.

**चूक एकदम शुद्ध करण्यापेक्षां मन वळवून ज्याची चूक त्याजकडून काढविणें हें चांगलें**—ही गोष्ट मुलास वागविण्याच्या कामीं नेहमीं लक्षांत ठेविली पाहिजे. ह्मणजे, चंद्र पळतो आहे, आणि ढग स्थिर आहेत, असें जर मुलाच्या मनांत भरलें असलें, तर, तें खोटें आहे, असें एकदम त्यास सांगून टाकण्यापेक्षां, तो चंद्र एकाद्या झाडाच्या फांद्यांच्या मधून पहायास लावून तो स्थिर आहे, आणि ढग पळत आहेत, असें त्याच्या प्रत्ययास आणून द्यावें.

**गोष्टी सांगणें**—मुलांस गोष्टी फार आवडतात. मुलांनीं कांहीं चांगलें काम केलें ह्मणजे त्याबद्दल त्यांस आईबापांनीं चांगल्या गोष्टी सांगून खुष करावें. आणखी गोष्टींनीं केवळ करमणुकच होईल असें नव्हें, तर बोधही होईल. त्या गोष्टी अगदीं लहान लहान असाव्या, आणि त्या सोप्या भाषेनें सांगाव्या. त्या मुलांच्या असाव्या; मोठ्या माणसांच्या नसाव्या. त्या सहज रीतीनें घडण्यासारख्या आणि लहान मुलांस आवडण्यासारख्या असाव्या. त्या गोष्टी खरोखर घड-

लेल्या आहेत अशा दिसाव्या; कल्पित आहेत, अशा दिसूं नयेत.

साक्षात्कार, भुतें, जादू, टाणाटोणा, मंत्र, इत्यादिकांच्या गोष्टी मुलांस कधीं सांगूं नयेत.

हें लक्षांत ठेवावें कीं, चित्रांवरून जसे जगांतले पदार्थ समजतात, तसे गोष्टींवरून मनुष्यांचे व्यवहार समजावे, अशा प्रकारच्या पुष्कळ चांगल्या गोष्टी बापास येत असाव्या. अशा गोष्टी चांगल्या पुस्तकांत पुष्कळ आढळतात.

अशा गोष्टी जर येत नसल्या, तर, बापानें, शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या गोष्टी मुलांस सांगाव्या. ह्मणजे असें:— अमक्या अमक्याच्या मुलाला आंगावरच्या दागिन्याकरितां चोरांनीं अशाअशा प्रकारें मारिलें. हें त्यांस सांगावें.

किंवा, एक अमकातमका मुलगा निष्काळजीपणानें झाडावर कसा चढत होता, आणि त्यामुळें त्याचा पाय निसटून तो कसा खालीं पडला, आणि त्याचा पाय मोडला, हें सांगावें. तसेंच, कोण्या मुलीच्या साडीस कशी आग लागली, आणि त्यामुळें ती कशी भाजली, हें सांगावें. अशा अनेक गोष्टी सांगाव्या.

**पदार्थज्ञान**—मुलास बापानें पदार्थज्ञान करून द्यावें. त्यास साहित्य पाहिजे तितकें असावें.

तांदूळ, गहूं, बाजरी, ज्वारी, हरभरे, तुरी, इत्यादि खाण्याचीं धान्यें; तसेंच अनेक प्रकारचें बीं, अनेक धातु, अनेक प्रकारचें लांकूड, अनेक प्रकारचे दगड, कापूस, लोंकर, रेशीम, कातडें, मध, लहानसा छापखाना, तेल्याचा घाणा, कुंभाराचें चाक, कापड विणण्याचे माग, साखर तयार करण्याचा कारखाना, सरक्या काढण्याचें यंत्र.

असे आणखीं किती पदार्थ सांगावे? त्याचप्रमाणें कांहीं झाडें बीं पेरून उगवतात, कांहीं झाडांच्या फांद्या लागतात, कांहींचीं कलमें होतात, हे प्रकार मुलास दाखवावे. उंदीर धरण्याचा सांपळा दाखवावा, आणि, त्यावरून, रानांत हत्ती, वाघ इत्यादिकांस कसें धरितात तें दाखवावें. अशा प्रकारें मुलास दररोज कांहीं तरीं नवें ज्ञान शिकवितां येईल. आणखी असें होतां होतां मुलाचें ज्ञान पुष्कळ होईल, त्यापासून त्याला आनंद वाटेल, आणि त्याची ज्ञानग्रहणाची शक्ति वाढेल.

**अंकगणित**—मुलांस नुसतें अंकज्ञान देऊं नये तर, संख्या ह्मणजे काय तें त्यांस कवड्या, सागरगोटे, बदाम किंवा दुसरीं फळें मोजून दाखवून समजून द्यावें. पाटीवर नुसते चार काढायास शिकविल्यानें मुलास चार ह्या संख्येची कल्पना यावयाची नाहीं. त्याला चार सागरगोटे, किंवा जांब, किंवा चार आंबे दाखवि-

त्यानें चार ह्मणजे काय तें चांगलें कळेल. आणखी, अंकगणितांतल्या बेरीज, वजाबाकी इत्यादि विषयांचें ज्ञान त्यांस असेंच प्रत्यक्ष रीतीनें करून द्यावें. तें चांगलें ठसतें.

**मुलाची विचारशक्ति वाढवावी**—विचारशक्ति ल्हानपणीं जितकी वाढवावी, तितकी ती मोठेपणीं माणसास उपयोगीं पडते. मुलास कोणतीही गोष्ट सांगावयाची ती सरळ सोप्या भाषेनें, आणि सहज समजे अशा रीतीनें सांगावी. अमुक गोष्ट कर किंवा करूं नको असें जेव्हां मुलांस सांगावयाचें, तेव्हां, तसें सांगण्याचें कारण काय, हें त्याला सांगावें. मूल कांहीं सांगूं लागलें किंवा विचार करूं लागलें, तर त्यांत त्यास उत्तेजन द्यावें. तसेंच, मुलें आपसांत बोलत असतात तेव्हां तें लक्षपूर्वक ऐकावें, त्यांत कांहीं चुक्या असल्यास त्या शुद्ध कराव्या, त्यांत जें काय चांगलें असेल त्यांबद्दल त्यांस शाबासकी द्यावी, आणि तसें बोलणें चालविण्याविषयीं त्यांस उमेद येईल असें करावें. त्या प्रमाणेंच मुलांत एकाद्या गोष्टीचा वाद पडल्यास, त्यांनीं ती गोष्ट वडिलांस विचारावी, आणि त्यांचा अभिप्राय खरा मानावा, अशी संवय त्यांस लावावी. ह्या कल्यांत कितीही त्रास पडला, तरी त्यास कंटाळूं नये. मुलाची विचारशक्ति हळू हळू वाढविणें ही एक मोठी आनंदजनक गोष्ट आहे. आणि तिचें महत्व कळलें

ह्मणजे, ती सिद्धीस नेण्याचे शेंकडों उपाय आपोआप दृष्टीस पडतात.

**मुलांच्या प्रश्नांचीं उत्तरें द्यावीं, आणि प्रश्न करण्याविषयीं त्यांस उत्तेजन द्यावें**---नवीन पदार्थ पाहिला ह्मणजे मुलास त्याविषयीं प्रश्न विचारण्याची इच्छा अगदीं सहज होते. ती दाबूं नये. त्या प्रश्नांवरून असें समजावें कीं, मुलास ज्ञान संपादण्याची इच्छा आहे; आणि तें एक सुचिन्ह आहे. "चूप बस" असें ह्मणून मुलाची शोधकेच्छा दाबूं नये; तर करवेल तितका प्रयत्न करून, त्या प्रश्नांचीं उत्तरें आनंदानें देण्याचा प्रयत्न करावा. ह्मणजे असें:—

**मूल**---बाबा, हें काय?

**बाप**—हें दडपण आहे.

**मूल**—हें कशाला येथें कागदांवर ठेवलें आहे!

**बाप**—हे कागद वाऱ्यानें उडून जाऊं नयेत ह्मणून.

**मूल**---येथें एकादा दगड ठेवला असता तर नसतें का काम झालें?

**बाप**---होय झालें असतें. पण, दगड अगदीं वाईट दिसला असता; पण, हें दडपण किती छान दिसतें बरें!

पुनः—

**मूल**—बाबा हा तांबडा कागद कसला?

**बाप**—मुला, तो शाई टिपण्याचा आहे.

**मूल**—तो कशाला हवा ?

**बाप**—शाई टिपायाला.

**मूल**—शाई टिपायाला कशाला हवी ? वाळत नाहीं का ?

**बाप**—वाळते, पण त्याला वेळ लागतो; आणि त्यामुळें वेळ फुकट जातो.

अशा रीतीनें सोप्या प्रश्नांचीं उत्तरें द्यावीं. त्यांचा त्रास करूं नये. त्यानें मुलास आनंद, होऊन त्याचें ज्ञान वाढेल. मोठे ज्ञानी असतात, त्यांचें ज्ञान देखील असेंच थोडेंथोडें जमून पुष्कळ झालेलें असतें. तें त्यांना पायरीपायरीनें मिळालेलें असतें.

असें जें ज्ञान पायरीपायरीनें होतें, तें मनांत चांगलें ठसतें; तसें एकदम पुष्कळ संपादलेलें ज्ञान ठसत नाहीं !

**वस्तूचें वर्णन न करितां वस्तू दाखवावी:**— मांजर ह्मणजे काय हें मुलास वर्णन करून सांगण्यापेक्षां त्याला प्रत्यक्ष मांजर दाखविलें असतां, त्यास मांजराविषयीं अधिक ज्ञान होईल, आणि तें त्याच्या मनांत चांगलें ठसेल, हें उघड आहे. ह्मणून शब्दज्ञानापेक्षां पदार्थज्ञानाकडे लक्ष विशेष असावें.

मुलास ज्या पदार्थाची माहिती करून द्यावयाची असेल, तो पदार्थ हर प्रयत्न करून, त्यांस प्रत्यक्ष

दाखवावा. त्याला पशु, पक्षी, मासे, इत्यादि प्राणी जिवंत दाखवून, त्यांविषयीं माहिती सांगावी; आणि तोच क्रम इतर वस्तूंविषयीं ठेवावा.

झाडें, त्यांचीं पानें, फुलें, फळें, इत्यादि पदार्थांची माहिती अशाप्रकारें करून द्यावी.

मुलाला प्रत्येक वस्तू चांगली सावकाश पाहूं द्यावी. घाई करूं नये. आणखी, वस्तूची माहिती मुलानें आपण आपल्या ज्ञानेंद्रियांच्या द्वारें प्रथम मिळवेल तितकी मिळवावी. विशेष माहिती होण्यास वस्तूंचें अंतरंग मुलास दाखवावें. ह्मणजे असें:—फळ फोडून दाखवावें, किंवा पांखराचें घरटें उलगडून दाखवावें.

ही शिक्षणपद्धति जितकी बरोबर रीतीनें चालवितां येईल, तितकें मुलाचें ज्ञान विशेष बिनचूक होईल, आणि त्याच्या ज्ञानग्रहणशक्तींचें उन्मीलन विशेष चांगल्या प्रकारें होईल. ह्या पद्धतीची उपेक्षा केली ह्मणजे मुलाच्या ज्ञानांत संदिग्धपणा, अर्धवटपणा, आणि सरासरी अजमास, हे दोष येतात. ह्याचे पुष्कळ अनुभव आले आहेत. आणखी हे दोष वयाबरोबर वाढले ह्मणजे मोठेपणीं ज्ञानवृद्धीस फार विघ्नभूत होतात. मी आगगाडीविषयीं पुष्कळ वाचिलें होतें; तरी तींत बसून प्रवास करीपर्यंत ती मला बरोबर कळली नव्हती. त्याप्रमाणेंच, बर्फाविषयीं मीं बरेंच वा-

चलें होतें, तरी बर्फाचा तुकडा माझ्या दृष्टीस पडेपर्यंत बर्फ ह्मणजे काय तें मला कळलें नव्हतें.

आकाशांतून जें बर्फ पडतें, त्याला इंग्रजींत ' स्नो' ह्मणतात. तें कसें असतें, त्याची कल्पना मला अद्याप बरोबर आलेली नाहीं. त्याचप्रमाणें बर्फावर घसरत जाण्याची जी इतकी मौज युरोपांतल्या लोकांस वाटते, तिची कल्पना मला नाहीं.

कितीही वर्णन केलें, तरी, प्रत्यक्ष पाहिल्यावांचून समुद्र ह्मणजे काय तें कोणास कळावयाचें नाहीं.

अंकगणित शिकतांना मुलें पौंड, शिलिंग, पेन्स नेहमीं ह्मणतात; पण त्यांतलें कांहीं एक त्यांनीं पाहिलेलें नसतें. त्याप्रमाणेंच त्यांना इंग्लिश वजनें, मापें कळत नसतात. त्यांचीं नांवें मात्र त्यांस ठाऊक असतात.

**कारणें सांगावीं**—चांगलीं गोष्ट होवो, किंवा वाईट गोष्ट होवो, तिचें खरें कारण मुलास समजून सांगावें.

समजा, एकाद्याचें घर जळालें तर, स्वैपाक घरांत विस्तव अव्यवस्थित ठेविल्यानें, किंवा विडी भलत्याच ठिकाणीं टाकल्यानें, किंवा दारूकाम विस्तवाजवळ ठेविल्यानें तें जळालें कीं काय हें नीट सांगावें.

एकाद्या मुलाला बक्षीस मिळालें, तर, त्यानें अभ्यास पुष्कळ केल्याचें तें फल आहे, असें सांगावें.

ह्मणजे ह्यांत सांगावयाचें एवढेंच कीं, कोणत्याही बऱ्यावाईट गोष्टीचें कारण अनुकूल काल, प्रतिकूल काल, सुदैव दुर्दैव, इष्टानिष्ट ग्रह, किंवा प्रारब्ध हें सांगूं नये.

पुष्कळ अंशीं, अनेक गोष्टींमध्यें, मनुष्याच्या बुद्धीनें आणि उद्योगानें, हित साधितां येतें, आणि विघ्न टाळितां येतें. ही कल्पना मुलांच्या आणि मोठ्या माणसांच्या अंतःकरणांत जितकी जितकी भरेल, तितकी तितकी ती त्यांच्या कल्याणास अधिकाधिक साधनीभूत होते.

**एकादी गोष्ट मुलास सांगून देण्यापेक्षां ती त्याला स्वतः शोधून काढितां यावी, हें चांगलें**— ह्मणजे असें:—मुलानें जर विचारिलें कीं, समुद्राचें पाणी पिण्यास चांगलें लागतें काय? तर, त्याला त्याचें उत्तर आपण न देतां, त्याला समुद्रकांठीं न्यावें, आणि तें पाणी त्याला तोंडांत घ्यायास सांगावें; ह्मणजे, त्याच्या प्रश्नाचें उत्तर त्याला बरोबर कळून, त्याचें कारणही कळेल. पण, त्या प्रयोगापासून मुलास इजा होऊं नये, हें लक्षांत ठेवावें.

त्याप्रमाणेंच, शिजलेला भात, उकडलेला बटाटा, इत्यादि पदार्थ रुजतील कीं नाहीं, तें मुलास स्वतः सांगण्यापेक्षां ते त्याजकडून रुजत घालवावे, आणि

काय होतें तें पाहायास सांगावें; आणि मग ते न रुज-ण्याचें कारण त्यास दाखवावें.

**. दुसऱ्यापासून मिळविलेल्या ज्ञानापेक्षां स्वतः-च्या विचारानें मिळविलेलें ज्ञान मुलास अधिक उपयोगी पडतें**—असें समजा कीं, मोर ह्मणजे काय हें मुलास समजून घ्यावयाचें आहे. तर, त्याला तें वर्णन ऐकून कदाचित् समजावयाचें नाहीं. तें पहातें तेव्हांच बरोबर कळेल.

तोच प्रकार जलमार्गाचा आहे. गलबतांत बसून गेल्याशिवाय तो कळावयाचा नाहीं.

मुलाला स्वतःच्या अनुभवानें जें ज्ञान मिळतें तें त्यांचें स्वतःचें खरें ज्ञान होय; आणि जें दुसऱ्याच्या तोंडून किंवा वाचून मिळतें, तें उसनें घेतलेलें संदिग्ध ज्ञान होय.

ह्यांतलें खरें किंवा स्वतःचें ज्ञान मिळण्यासारखें न-सतें, तेथें दुसऱ्या प्रकारचें ह्मणजे दुसऱ्यापासून घेतले-लें ज्ञान पतकरलेंच पाहिजे.

**इंद्रियें हीं ज्ञानाचीं द्वारें आहेत तीं नेहमीं च-पल आणि दक्ष ठेवावीं**—ह्याचा मुख्य उपाय एवढाच कीं, त्या इंद्रियांचा उपयोग चाळून पाळून वेगळ्यावेग-ळ्या पर्यायांनीं, आणि आनंदवृत्तीनें करावा. ह्यासंबं-धाची मुलाची योजना बापानें करावी.

नेत्रेंद्रिय, श्रवणेंद्रिय, घ्राणेंद्रिय, रसनेंद्रिय, आणि स्पर्शेंद्रिय हीं इंद्रियें ज्ञानसंपादनाचे मार्ग आहेत. ह्यांच्या शक्तींची अभिवृद्धि किती होईल ह्याविषयीं कांहीं अनुमान करितां येत नाहीं.

मुलास वस्तूचें जें ज्ञान होतें, तें, ह्यांतल्या कोणच्या तरी एका किंवा अनेक इंद्रियांच्या उपयोगानें होतें. ह्यावरून हें उघड आहे कीं, तीव्र इंद्रियांच्या मुलास, वस्तुज्ञान, मंदेंद्रियांच्या मुलापेक्षां अधिक होतें.

**चित्रें पाहण्याची अभिरुचि**—ही फार मनोरंजक आहे. ही मुलांच्या ठायीं उत्पन्न करावी. मुलांस चित्रें स्वभावतःच आवडतात. त्यांस प्रथम साधीं चित्रें दाखवावीं. तीं त्यांच्या नेहमींच्या पाहण्यांतल्या पदार्थांचीं असावीं.

पदार्थांचे जसे रंग असतात, तसे रंग दिलेलीं चित्रें आरंभीं पाहण्यास फार चांगलीं असतात.

साधीं एकेरीं चित्रें पाहतां आल्यावर मग, एकांत एक काढलेलीं अशीं चित्रें दाखवावीं.

असें कांहीं वेळ केलें ह्मणजे नुसत्या काळ्या रंगानें छापलेलीं चित्रें देखील मुलांना चांगलीं समजतील.

इंग्रजी लोकांमध्यें चित्रकला पूर्णतेस आली आहे. त्यांचीं चित्रें पाहतां आलीं पाहिजेत.

कोणत्याही घराचें, झाडाचें किंवा पर्वताचें चित्र काढलेलें असतें, तेथें बहुधा माणसाचें एक तरी चित्र का-

ढिलेलें असतें. तें अशासाठीं कीं, त्यावरून त्याच्या उंचीचें अनुमान सहज करितां यावें. हें मुलास दाखवावें.

चित्रांचे अवयव, माणसांच्या किंवा जनावरांच्या अवयवांप्रमाणें, प्रमाणांत असतात, हें मुलांस दाखवावें.

मुलाला चित्रें काढायास आवडेल, तर त्यास यथा शक्ति साह्य करावें. चित्रें काढण्याची कला फार उत्तम आहे.

**गायन**--मुलास कधीं कधीं गाणें आवडतें. आणि कांहीं चांगले स्वर कानीं पडल्याबरोबर तें त्यासारखा स्वर काढण्याचा प्रयत्न करितें. तें फार चागलें आहे. अशी आंगची अभिरुचि मुलाच्या ठायीं आढळली कीं ती वाढविण्याचा प्रयत्न करावा. गातां येणें ही एक फार मनोरम कला आहे. तिनें जनाचें मन मोहतां येतें. मोठाले राजे देखील उत्तम गायनश्रवणानें अगदीं मोहित होऊन जातात. ह्मणून, सवड असल्यास मुलास गाणें शिकवावें.

**सृष्टिसौंदर्य**-हें मुलांच्या लक्षांत आणून द्यावें. एकादें सुंदर फूल मुलाला दाखवावें; त्याचे रंग त्याला सांगावे; आणि त्याच्या सौंदर्याचें वर्णन करावें; ह्मणजे मुलांना सौंदर्य कळूं लागेल; आणि तीं फुलांची शोभा आपोआप वर्णूं लागतील.

सकाळीं फिरायास गेल्यावर नाना प्रकारचीं आणून तीं मुलांस दाखवावीं.

वर दहिंवर पडलें आहे, अशीं सुंदर ताजीं फुलें हळूच कशीं तोडावीं, हें मुलांस दाखवावें.

फुलें हातांनीं चुरगुळूं नयेत, तर नीट जपून परडींत ठेवावीं, असें मुलांस शिकवावें.

फूल त्याच्या डेंटासुद्धां आणि त्याच्या मागच्या कांहीं पानांसुद्धां तोडलें तर तें विशेष सुंदर दिसतें, तें मुलांस समजावावें, आणि तशीं फुलें तें तोडूं लागलें तर तीं त्याला तोडूं द्यावीं; आणखी, फुलें केळीच्या पानावर किंवा एकाद्या सुंदर ताटांत ठेविलीं ह्मणजे कशीं सुंदर दिसतात, ते त्यांस प्रत्यक्ष दाखवावें.

फुलें जर पाण्याच्या आश्रयास ठेविलीं नाहींत, तर तीं कशीं लवकर कोमेजतात, हें त्यांस दाखवावें. तसेंच, तीं, वेगळ्या वेगळ्या रंगांच्या प्याल्यांत ठेवलीं ह्मणजे त्यांची शोभा कशी बदलते, तेंही त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आणावें.

अशा प्रकारें फुलांविषयींची मुलांची अभिरुचि वाढवितां येईल. आणि तीपासून त्यांस आनंद होईल.

फुलें सुंदर दिसतात, हा त्यांचा एक उपयोग आहे; आणि त्यांस सुवास येतो, हा दुसरा उपयोग आहे. हे दोन्ही उपयोग मुलांच्या मनांत भरवावे.

मुलांस बागांतून, मळ्यांतून आणि शेतांतून हिंडवावें, आणि त्यांस नानाप्रकारचें सृष्टिसौंदर्य दाखवावें. हें

सगळें सहज करितां येण्यासारखें आहे. ह्यापासून आनंद होऊन, शिवाय, मुलांच्या ठायीं अशी अभिरुचि उत्पन्न होईल कीं, ती त्यांस मोठेपणीं फार आनंददायक होईल. ह्या गोष्टीकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. कां कीं, ही सृष्टिसौंदर्याची अभिरुचि आमच्या लोकांत फार कमी आहे. आणखी, अशा प्रकारच्या अभिरुचीपासून सुख होणें हें असें आहे कीं त्यास कांहीं पैसे पडत नाहींत. विचारपूर्वक अवलोकन करण्याची सवय असली ह्मणजे बस्स झालें. ह्मणून, अशा प्रकारचीं सस्तीं सुखें जीं आहेत, तीं संपादण्याचे प्रयत्न अवश्य करावे; सोडूं नयेत.

**मुलांस शिक्षा**—मुलास काठीनें झोडपणें ही शिक्षा सर्वांत वाईट आहे, ती कधींही करूं नये. त्याप्रमाणेंच, हातानें थोबाडांत मारणें, चापट्या मारणें, कान उपटणें, पाठीवर रपाटे मारणें, हात धरून घुसळणें, गचांड्या देणें, हेंही फार वाईट आहे. तें कदापि करूं नये.

शिक्षेचा उद्देश हा असावा कीं, मुलाची वृत्ति पालटावयाची; ती शरिरावर सक्ति करून वळवायाची नाहीं, तर मनावर सक्ती करून पालटावयाची.

बक्षीस द्यावयाचें तें अशा करितां कीं, त्यापासून मुलास आनंद व्हावा; त्याप्रमाणेंच, शिक्षा करावयाची ती अशाकरितां कीं, तीपासून त्याच्या मनास दुःख व्हावें.

आणखीं, मुलास आनंद देण्यास जसे फारसे प्रयास पडत नाहींत, तसें त्यास दुःख देण्यासही प्रयास लागत नाहींत.

मुलास शिक्षा करावयाची ह्मटली ह्मणजे, बहुतकरून, अशी असावी:—त्याला बक्षीस द्यायाचें तें देऊं नये; तें कांहीं वेळ अडकवून ठेवावें; तें अमुक वेळपर्यंत मिळायाचें नाहीं ह्मणून सांगावें; किंवा, तें कधीं मिळावयाचें नाहीं, असें करावें.

अशा प्रकारें मुलास शिक्षा करण्याचे पुष्कळ प्रकार योजतां येण्यासारखे आहेत.

समजा कीं, मुलानें कांहीं असद्वर्तन केलें, तर त्याला ह्मणावें की, तूं असा वाईट रीतीनें वागलास ह्मणून तुला जी अमूक चांगली वस्तु बक्षीस देणार होतों, ती आतां देणार नाहीं. तुला मी बरोबर फिरायास नेणार नाहीं. तुला पदार्थ संग्रहालय पहायास नेणार नाहीं. तुला इतर मुलांबरोबर खाऊं देणार नाहीं. मी तुझ्याशीं बोलणार नाहीं. मी तुला कांहीं देणार नाहीं. आणि त्याप्रमाणें करावें. ह्मणजे त्या शिक्षेचा उपयोग उत्तम होतो.

चाबूक, चेंडू, इत्यादि वस्तु मुलास खेळायास दिल्या असतां, त्यांनीं जर तो दुसऱ्यांस त्रास देऊं लागला, तर त्या वस्तु लागल्याच त्यापासून छिनावून घ्याव्या.

बुद्ध्या दांडगाई करून किंवा निष्काळजीपणा करून जर एकादें खेळणें मुलग्यानें मोडलें, तर, त्याला दुसरें घेऊन देऊं नये. त्याचें मूर्खपण त्यास भोगायास लावावें.

दुसऱ्या कोणाची कांहीं वस्तु जर मुलानें हिसकावून घेतली, तर ती, त्यापासून घेऊन ज्याची त्याला परत द्यावी.

दुसऱ्या मुलाची वस्तु जर मुलानें मोडली, चोरली, तर, तिच्या मोबदला, त्याची एकादी वस्तु त्या दुसऱ्या मुलास त्याजकडूनच देववावी.

मुलानें कांहीं खोडी केली, तर ती लागलीच त्याजकडून निस्तरवावी. ह्मणजे असें:—कागदाचे तुकडे तुकडे करून जर त्यानें सगळ्या खोलीभर पसरले, तर, ते लागलेच त्याजकडून निवडवून, बाहेर केराच्या टोपलींत टाकवावे; किंवा जर भिंतीवर कांही रेघोट्या ओढल्या, तर त्या लागल्याच त्याजकडून पुसवाव्या; अथवा, त्यानें दुसऱ्या मुलाचें जर कांहीं खेळणें मोडलें तर तसें दुसरें खेळणें या मुलाच्या खाऊच्या पैशातून त्याजकडून विकत घेववून, तें त्या मुलास द्यावें. असें तें खेळणें त्या मुलाकडून भरून देववावें.

सारांश, साधारण प्रौढ माणसें ज्याप्रमाणें एकमेकांशीं वागतात, त्याप्रमाणें मुलांस एकमेकांशीं वागण्यास शिकवावें. ह्मणजे, सर्व मुलें मोठीं झाल्यावर ज्या न्याय्य

रीतीनें त्यांस एकमेकांशीं वागण्यास भाग पडावयाचें आहे, त्याच न्यायरीतीनें, सूक्ष्म प्रमाणानें, मुलांस एकमेकांशीं वागण्यास शिकवावें. ह्मणजे, पुढें प्रौढपणीं दुनयेंत कसें वागावयाचें, हें त्यांस लहानपणापासून हळू हळू सहज कळून येईल.

आपल्या हातून कांहीं असद्वर्त्तन झालें तर त्या बद्दल आपण खेद करावा, आणि तो बोलून दाखवावा, आणखी तसें असद्वर्तन पुनः कधीं व्हावयाचें नाहीं असें अभिवचन द्यावें, ही रीति मुलास लावून द्यावी.

वाईट ह्मणणें, ताकीद देणें, लावून बोलणें, नापसंती स्पष्ट दाखविणें, आणि कान उघाडणी करणें, ह्या सगळ्यांचा समावेश शिक्षेंत व्हावा; आणि त्यांचा उपयोग प्रसंगानुसार करावा.

तरी, ह्या विषयीं बोलतांना तोंडांतून वाईट असभ्य शब्द कधीं निघूं देऊं नये.

मुलानें अपराध खरोखर केला आहे कीं नाहीं, असा संशय असेल तेथें बापानें कसें वागावें, तर, अशा प्रसंगीं आपल्या वरिष्टांनीं आपणास ज्या रीतीनें वागवावें असें त्याला वाटेल, त्या रीतीनें वागवावें.

जो अपराध मुलाच्या हातून चुकून अकस्मात झाला आहे, ह्मणजे मुलानें बुद्ध्या समजून केला नाहीं— त्या अपराधाबद्दल त्याला कधीं शिक्षा करूं नये. असे अपराध ह्मटले ह्मणजे दऊत पालथी होणें, चित्र मळणें,

पाटी फुटणें इत्यादि होत. हे अपराध मुलें बुद्धया कधीं करीत नाहींत.

मुलें पळपकड करतात, मोठ्यानीं बोलतात, गद-गदां हंसतात; पशुपक्ष्यासारखीं ओरडतात, त्याबद्दल त्यांस शिक्षा करूं नये. पण तें करूं नको ह्मटल्यावर जर तीं न ऐकतील, तर मात्र त्यांस शिक्षा करावी.

आईबापांचें न ऐकल्याबद्दल तर मुलांला शिक्षा केलीच पाहिजे. परंतु, ज्या गोष्टीपासून मुलांस लागलेंच दुःख भोगावें लागतें, त्या गोष्टीबद्दल वेगळी आणखी शिक्षा करूं नये; कां कीं तें दुःख हीच शिक्षा असते. ह्मणजे असें:—पाया खालीं न पहातां धांवल्यामुळें मूल पायरीवरून खालीं पडलें आणि त्याचे ओंठ फुटले, तर त्याला त्याबद्दल आणखी शिक्षा करूं नये; झाली शिक्षा ती बस झाली, असें समजावें. आणखी, पुढें सावध राहाण्यास तेवढी खरोखर बस होते.

अशी आपोआप जी शिक्षा होते, ती, माणसांनीं केलेल्या शिक्षेपेक्षां अधिक गुणाकारी होते, हें नेहमीं लक्षांत ठेवावें.

**बक्षीस आणि शिक्षा**—चांगल्या कृत्यांबद्दल बक्षीस देणें आणि वाईट कृत्यांबद्दल शिक्षा करणें, हें जसें प्रौढ माणसांच्या व्यवहारांत, सगळीं कामें बरोबर चालण्यास, आवश्यक आहे, तसें तें, मुलांस वागविण्याच्या कामींही आवश्यक आहे.

मोठ्या माणसांप्रमाणें, मुलांस चांगल्या गोष्टी केल्यांबद्दल बक्षीस दिलें पाहिजे, आणि वाईट गोष्ट केल्याबद्दल शिक्षा केली पाहिजे. त्या विषयींचीं साधारण मूलतत्वें उभयपक्षीं एकसारखींच आहेत.

त्यांत अंतर ह्मणण्यासारखें येवढेंच असतें कीं, प्रौढांचीं बक्षिसें आणि शिक्षा हीं मोठीं आणि प्रखर असतात, आणि मुलांचीं बक्षिसें आणि शिक्षा हीं लहान आणि सौम्य असतात.

बक्षिसें वारंवार आणि मोठमोठीं देऊं नयेत. नाहीं तर, मुलें पावलोंपावलीं बक्षिसें मागतील, आणि तें एक खर्चाचें काम होईल. तें बरें नाहीं.

त्या प्रमाणें शिक्षाही वारंवार करूं नये. कांकीं त्याच्या योगानें मुलें कोडगीं होतात.

बक्षीस हे सद्वर्तनाच्या प्रमाणानें असावें, आणि शिक्षाही असद्वर्तनाच्या प्रमाणानें असावी. बक्षीस देण्याचा हेतु सद्वर्तनास उत्तेजन देण्याचा आहे, आणि शिक्षेचा हेतु असद्वर्तन मोडण्याचा आहे; हे दोन हेतु बरोबर साधतील अशी तजवीज ठेवावी.

सारांश, बक्षीस किंवा शिक्षा ह्यांतलें कांहींही बेता बाहेर नसावें. ह्मणजे ती अगदी बेताबाताचीं असावीं. फाजील नसावीं.

मुलांस बक्षिसें निःपक्षपातानें द्यावीं. त्यांत प्रतारणा नसावी. ह्मणजे ह्यांत त्यांचें आचरण राजासारखें असावें.

मुलांस शिक्षाही न्यायानें आणि निश्चयानें करावी. त्यांत चलविचल होऊं देऊं नये. ह्मणजे ह्यांत बापाचें आचरण न्यायाधीशासारखें असावें.

अशा प्रकारें मुलांशीं वागल्यानें, त्यांस पुढें दुनयेमध्यें कसें वागावें हें सहज कळेल. आणि त्यांस कोणत्याही प्रकारची अडचण पडावयाची नाहीं.

मुलास बक्षीस द्यावयाचें किंवा शिक्षा करावयाची ती, मुलावर बापाची प्रीति किंवा अप्रीति असेल, त्या मानाची नसावी, तर तें प्रमाण, त्याच्या सद्गुणाशीं किंवा दुर्गुणाशीं असावें.

बायकोच्या आग्रहानें मुलाला फाजील बक्षीस देऊं नये, आणि त्याची शिक्षाही कमी करूं नये.

मुलास कृतकर्माचा पश्चात्ताप झाल्यास आणि पुनरपि तसें न करण्याविषयीं तो वचन देत असल्यास शिक्षा कमी करण्यास किंवा मुळींच रद्द करण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं.

रागाच्या सपाट्यांत मुलाला बापानें कधींही शिक्षा करूं नये.

अति बक्षिसें दिल्यानें मुल शेफरतें, आणि अति शिक्षा केल्यानें तें कोडगें होतें.

आपणास बक्षीस मिळालें हें अमक्या चांगल्या गोष्टिबद्दल, असें मुलास कळलें पाहिजे.

त्याचप्रमाणेंच झाली शिक्षा ती अमक्या वाईट कृत्याबद्दल, असें मुलाला कळलें पाहिजे.

अशी व्यवस्था चालविली ह्मणजे सद्वर्तन म्हणजे काय, दुर्वर्त्तन म्हणजे काय, आणि त्याचे वेगळेवेगळे परिणाम कोणते, हें मुलास चांगलें कळेल.

घाईघाइनें बक्षीस देऊं करूं नये आणि एकदा देऊं केल्यावर तें देण्यास टळूं नये; तशीच, घाईघाईनें शिक्षा देण्याचा विचार करूं नये, आणि एकदा विचार झाल्यावर ती केल्यावाचून राहूं नये.

म्हणजे, मुलाला असें पक्कें कळलें पाहिजे कीं, बक्षीस आणि शिक्षा, हीं मिळालीं तर मिळालीं, असें कांहीं व्हावयाचें नाहीं; तर तीं एकदा बापाच्या तोंडातून निघालीं कीं प्राप्त व्हावयाचींच; चुकावयाचीं नाहींत.

सद्वर्तन हें, बक्षिसाकरितां करावयाचें नव्हे, तर तें चांगलें आहे म्हणून करावयाचें; तसेंच असद्वर्तन हें, शिक्षेच्या भयानें करावयाच नाहीं, असें नव्हे, तर तें वाईट म्हणून करावयाचें नाहीं, असें मनांत धरून वागण्याची संवय मुलास लाविली पाहिजे.

बक्षिसें आणि शिक्षा त्यांची यथायोग्य योजना आईपेक्षां बापाच्या हातून अधिक चांगल्या प्रकारें होते. कां कीं, आईपेक्षां बापाचे ठायीं स्वभावतःच तारतम्य आणि निश्चय हीं अधिक असतात.

**मुलांचीं बक्षिसें**—मुलाला जें कांहीं आवडतें तें त्यास बक्षीस होय.

मुलांस खूष होण्यास फार मोठीं बक्षिसें लागत नाहींत. म्हणून त्यांस बक्षिसें पुष्कळ प्रकारचीं देतां येतात. त्यांत चित्रें, टोप्या, घड्याळें, दउती, पिशव्या, काठ्या इत्यादि अनेक वस्तूंचा समावेश होतो. त्याप्रमाणेंच, कीर्तनास नेणें, नाटकास नेणें, पोंहायास नेणें, बाजारांत नेणें, घोड्यावर बसवून बाहेर पाठवणें, इत्यादिकांचा उपयोगही बक्षिसाप्रमाणेंच करितां येतो.

**कुणग्याचा पैसा**—दरमहा मुलाला कांहीं पैसे देण्याचा परिपाठ आहे. त्यापैशाचें पाहिजे तें करण्यास त्याला परवानगी असते. तो पैसा मुलाचा हक्काचा म्हणून देऊं नये, तर, सद्वर्तनाबद्दल बक्षीस म्हणून द्यावा.

प्रौढपणीं चांगलें काम केल्याबद्दल जसा पगार मिळतो, तसा हा कुणग्याचा पैसा आपल्या सद्वर्तनाबद्दल आपणास मिळतो, असें मुलांस वाटावें.

ज्याप्रमाणें धनी आपल्या चाकरांस पगार वेळच्यावेळीं देतो, त्याप्रमाणें हा पैसा मुलांस वेळच्यावेळीं द्यावा.

असें केल्यानें, प्रौढपणीं आपण दुसऱ्याचें चाकर झालों असतां आपणांस काय मिळेल, हें मुलांस कळेल.

महिना भरल्याच्या अगोदर आपणास पगार मिळावा, असें त्यानें मनांत आणतां कामास नये.

पगार केव्हां मिळावा, हें त्यांचें त्याला कळूं लागेल.

त्याला तो पैसा महिनाभर कसा पुरवावा हें कळेल.

त्याला पया, पैसे, चवल्या, पावल्या, आणि अधेल्या ओळखतां येतील.

कोणत्या नाण्याच्या किती पट कोणतें नाणें आहे, हें त्याला कळेल.

त्या नाण्याचा दे घे करण्यास जेवढें गणित समजलें पाहिजे, तेवढें त्याला सहज समजेल.

मुलाच्या सगळ्याच वस्तु बापानें विकत घेऊं नयेत; तर, कांहीं वस्तु स्वतः मुलांकडूनही विकत घेववाव्या.

ह्मणजे नानाप्रकारच्या नाण्यांस किती किती पदार्थ विकत घेतां येतात, हें त्याला कळेल.

मुलांच्या अंतःकरणांत वस्तूच्या मालकी विषयींची कल्पना आपोआप उत्पन्न होईल.

मुलाला आपला पैसा संभाळतां येईल. तो त्यांस हात राखून खरचितां येईल. आणि हळू हळू थोडा थोडा त्याचा संग्रह करितां येईल.

श्रीमंत होणें ह्मणजे काय आणि दरिद्री होणें ह्मणजे काय हें त्याला कळेल.

हें सगळें ज्ञान त्यांस प्रौढपणीं फार उपयोगीं पडेल.

सारांश, मुलास ज्या गोष्टी अत्यंत आवश्यक ह्मणून शिकविल्या पाहिजेत, त्यांतलीच एक ही गोष्ट आहे कीं, त्यास पैशाचा योग्य उपयोग शिकवावा.

आणखी जो बाप असे पैसे कुणज्याकरितां देतो, तो आपला हितकर्ता आहे, असें मुलें मानूं लागतात.

मुलावर त्याचें वजन फार पडतें.

त्याचा बोध मुलाच्या मनांत अधिक बिंबतों; तोच बोध, तो पैसा न दिला तर तितका चांगला बिंबत नाहीं.

भावापासून, बहिणीपासून किंवा मित्रापासून उसनें घेतलेले पैसे नेमल्या मुदतीप्रमाणें मागणी होण्याच्या आधीं परत देण्यास मुलांस शिकवावें.

मुलाचें पैसे, मुलाची इच्छा असल्यास, बापानें आपले जवळ ठेवावे; त्यांतले लागतील तसतसे त्यास परत द्यावे; शिलक दाखवावी; त्या सगळयाचा हिशेब ठेवावा; आणि तो मुलास दाखवावा; ह्मणजे प्रौढपणीं मुलास सरकारी ब्यांकेशीं व्यवहार कारितां येईल.

मूल आपल्या वस्तु विकत घेऊं लागलें ह्मणजे त्याला वजनें, मापें, आणि गणती ह्यांची माहिती होते.

कोणता दुकानदार कोणत्या वस्तु कोणत्या किंमतीस विकतो, हें मुलास हळू हळू शिकवावें, म्हणजे महाग ह्मणजे काय आणि स्वतें ह्मणजे काय हें त्याला कळेल; आणि त्याच्या कारणांचा विचार करितांना त्यास वस्तूंमधले कमजास्त गुणदोष कळतील.

मूल जरा प्रौढ झाल्यावर, घरप्रपंचाचें सामान खरेदी करण्यास बापानें आपलेबरोबर मुलास घ्यावें, ह्मणजे त्याला बाजार करितां येईल.

**नीतिगुण**—दुनयेमध्यें आयुष्य स्वस्थपणें आणि सुखानें जाण्यास सद्गुण आवश्यक आहेत, ते मुलाचे ठायीं वाढविण्यास बापानें प्रयत्न करावा ; आणि जे दुर्गुण तद्विपरीत आहेत, ते नाहींतसें करण्याचा प्रयत्न करावा. त्यांचें टिपण येणेंप्रमणें:—

| सद्गुण. | दुर्गुण. |
|---|---|
| नम्रता. | गर्व. |
| सभ्यता. | उद्धटपणा. |
| संतोष. | असंतुष्टता. |
| उद्योग. | आळस. |
| न्याय. | अन्याय—पक्षपात. |
| भूतदया. | निर्दयपणा. |
| श्रेष्ठांस मान. | श्रेष्ठांशीं उद्धतपणा. |
| खर्चाचा बेतबात. | उधळेपणा. |

| | |
|---|---|
| कृतज्ञता. | कृतघ्नता. |
| सत्यशीलता. | असत्यशीलता. |
| प्रामाणिकपणा. | अप्रामाणिकपणा. |
| आस्था. | अनास्था-बेपरवाई. |

**धर्म**—ह्या संबंधाचीं कांहीं मूलतत्वें मुलाच्या अंतःकरणांत भरलीं पाहिजेत, तीं हीं:—

देव हा जगाचा उत्पन्नकर्त्ता आणि संरक्षणकर्त्ता आहे.

तो थोर आहे आणि चांगला आहे.

सर्व माणसांस सुख व्हावें, अशी त्याची इच्छा आहे.

ह्मणूनच, "परोपकाराय पुण्याय पापाय परपीडनं," असें आहे.

लोकांनीं आपणांपाशीं जसें वागावेंसें आपण इच्छितों, तसें आपण लोकांशीं वागावें.

**मुलाचें स्वतःचें वागणें**—आईबापें किंवा शिक्षक जवळ असतां, मुलें जशीं वागत असतात, तशीं तीं त्यांच्या पश्चातही वागत असावीं, हें इष्ट आहे. ह्यांत जर त्यांजकडून अंतर पडलें, तर, त्याची चौकशी करून, त्यांतला खरा प्रकार समजून घेऊन, त्याबद्दल यथायोग्य शिक्षा तावडतोब करावी.

मुलें खेळायास लागलीं असतां, त्यांजवर देखरेख करण्यास कोणी त्यांतलाच एकादा प्रौढ मुलगा ने-

मावा; आणि त्याच्या आज्ञेंत सर्वांनीं रहावें असें करावें.

मुलांत वाद उत्पन्न होतात, तेव्हां, ते त्यांनीं आपसांत मिटववे, ते त्यांनीं बापापर्यंत किंवा शिक्षकापर्यंत सहसा येऊं देऊं नयेत, असें त्यांस शिकवावें.

त्यांस तोडजोड कशी करावी, ती शिकवावी.

आपलें ह्मणणें तें खरें आणि बाकीच्यांचें सगळ्यांचें खोटें, असें मानण्याची जी वृत्ति मुलांमध्यें असते, ती काढून टाकण्याचा प्रयत्न करावा.

**न्यायदृष्टि**—गलबतास जसें सुकाणू असतें, तशी मनुष्यास न्यायदृष्टि आहे. शरीराला जसे नेत्र, तशी मनास न्यायदृष्टि आहे. ती मुलांमध्यें चांगली प्रगल्भ दशेस आणिली पाहिजे. आणखी सगळ्या शिक्षणाचें उत्तम फल काय ती तीच आहे.—तीच मुलांच्या कल्याणास जन्मभर साधनीभूत होणार आहे.

**शास्त्रसिद्ध गोष्टी**—शास्त्रसिद्ध गोष्टी ज्या आहेत, त्या सर्वत्र आणि सर्वदा खऱ्या ठरावयाच्या, त्या खोट्या व्हावयाच्या नाहींत, हें प्रमेय मुलांच्या मनांत ठसविण्याची संधी साधवेल तितकी साधावी.

त्याप्रमाणेंच, शास्त्रांच्या आधारानें ज्या गोष्टी खोट्या ह्मणून ठरल्या आहेत, त्या खोट्या आहेत, असें त्यांचे मनांत भरवावें. भुतेंखेतें, शकून, चेटकें, हीं अगदीं खोटीं—आणि भ्रांतिमूलक आहेत, असें त्यांच्या अंतःकरणांत बिंबवावें.

**अतिशयोक्ति**--मुलें एकादी गोष्ट फुगवून सांगूं लागलीं, तर बापानें लागलेंच तें बंद करावें. जेवढें खरें आहे, तेवढें मात्र सांगण्याविषयीं त्यांस बोध करावा.

**मुलांचे अपराध**—मुलांचे लहानपणचे अपराध हीं प्रौढ माणसांच्या मोठ्या अपराधांचीं, अत्यंत अल्प स्वरूपें असतात, हें मनांत ठेवून, ते अपराध केले असतां काय होतें, कोणत्या शिक्षा भोगाव्या लागतात, तें बापानें मुलास सांगावें. आणि तसे अपराध तें न करी, असें करावें; ह्मणजे मोठेपणीं ते अपराध त्याचे हातून होणार नाहींत.

मुलांचे अपराध ह्मणजे लहानसहान वस्तु चोरणें, चोरलेली वस्तु आपले जवळ ठेवणें, फसविणें, दुसऱ्यास उपद्रव करणें, एकाद्याच्या आंगावर चालून जाणें, एकाद्यास दुखापत करणें, शिव्यागाळ्या देणें, आळ घालणें, खोटी साक्ष देणें, दुसऱ्यानें ठेवायाला दिलेली वस्तु आपण बळकावणें, हे होत.

कैद्यांस बांधून फटके मारतात, त्यांस बेड्या घालतात, त्यांस रस्त्यावर खडी फोडावी लागते, त्यांस तुरुंगांत राहावें लागतें, त्यांस घरच्या माणसांस भेटतां येत नाहीं, ह्या गोष्टी मुलांस केव्हां केव्हां प्रत्यक्ष दाखवून अपराध केल्यानें असें दुःख होतें, असें त्यांच्या मनांत भरवावें.

**सरकारच्या अधिकाऱ्यांचा मान राखणें**—लहान मुलांस जशीं आईबापें संभाळितात, तसें सरकार लोकांस संभाळितें. ह्मणून सरकारच्या अधिकाऱ्यांचा मान राखणें हें आवश्यक आहे, असें मुलांस सांगावें.

मुलांनीं आईबापांची आज्ञा मानावी, तशी लोकांनीं सरकाराची आज्ञा मानावी.

**शाळेंत जाणें**—मुलांस शाळेंत पाठविण्याची घाई करूं नये. तीं आठ वर्षांचीं होतपर्यंत त्यांस घरींच थोडथोडें शिकवावें. तें खेळतां खेळतां मौजेनें शिकवावें. ह्मणजे त्यांस त्रास व्हावयाचा नाहीं.

मुलें शाळेंत जाण्याचा त्रास करितात; त्यास कारण बहुधा वाईट शिक्षक असतात. शिक्षक चांगला असला, ह्मणजे मुलांस शिकण्यास हौस येते. ह्मणून आईबापांनीं शिक्षक चांगला पाहून मुलें त्याजकडे पाठवावीं.

प्रथमारंभीं मुलांस देशभाषेच्या शाळेंत घालावें. आणि तेथें त्यांचा अभ्यास चांगला झाल्यावर मग त्यांस इंग्रजी शिकायास पाठवावें. स्वभाषेंतला सगळा अभ्यास चांगला झाल्यावांचून मुलांस इंग्रजींत घालूं नये. स्वभाषेंत अभ्यास चांगला झालेला असला ह्मणजे इंग्रजी शिकण्यास फार सोपें पडतें.

**मुलांनीं भाषा कोणत्या शिकाव्या?**—आधीं स्वभाषा चांगली शिकावी; आणि ती त्याला चांगली येण्यास फार प्रयास पडत नाहींत.

एकदम अनेक नव्या भाषा शिकण्याच्या अडचणींत मुलास घालूं नये. स्वभाषा चांगली आल्यावर मग त्यास त्याच्या भोंवतालच्या दुसऱ्या लोकांची भाषा शिकवावी.

**तोंडपाठ करणें**—ह्याविषयीं मुलांस फार आग्रह करूं नये. कां कीं, त्यांत फारशी ज्ञानवृद्धि नाहीं. आवश्यक वाटेल, तेवढें मात्र पाठ करवावें. वार, तिथी, नक्षत्रें, महिने, संवत्सर, राशी, कोष्टकें, पाढे, पावकीं, निमकीं वगैरे उजळणी, हीं तोंडपाठ करवावीं. तीं फार उपयोगीं पडतात.

**शाळेंत घातलेल्या मुलांविषयीं आईबापांनीं कोणत्या गोष्टीकडे लक्ष द्यावें?—**

१. प्रकृति चांगली आहे कीं नाहीं तें पहावें.

२. निर्वाहाचे पदार्थ मिळविण्याचें साधन त्यांस अवश्य मिळावें, ह्याविषयीं नजर ठेवावी.

मुलांस आधीं प्रथम असें कांहीं शिकवावें कीं, त्यावर त्यांस साधारणपणें आपला निर्वाह करितां यावा. असा व्यवसाय ह्मणजे बाप जो धंदा करीत असतो तो होय. तो हलका समजून शिकवायाचा नाहीं, आणि मोठ्या योगतेचा धंदा शिकवितांना मध्यें विघ्नें येऊन भलताच परिणाम होतो; असें झालें ह्मणजे मुलांचे हाल होतात. त्याला हें नाहीं आणि तेंही नाहीं, असें होतें. तें सहसा होऊं देऊं नये. बाजरी घरांत मि-

ळवून ठेवावी, आणि मग गहूं मिळवायाच्या उद्योगास लागावें.

पुष्कळ शिकून कांहीं एक मिळवितां येऊं नये, त्यापेक्षां थोडें शिकून निर्वाहापुरतें मिळवितां यावें, हें चांगलें. आणि असे निर्वाहास मिळविणारे लोक सध्याच्या वेळीं हिंदुस्थानाला पाहिजेत आहेत.

**लग्नें**—मुलगा सोळा वर्षांचा पुरा होईपर्यंत त्याचें लग्न करूं नये.

मुलगी दहा वर्षांची झाल्यावांचून तिचें लग्न करूं नये. मुलीचें लग्न बाराव्या वर्षापर्यंत ठेवण्यास देखील शास्त्रांत आधार आहे.

बालविवाह हा मुलांच्या प्रकृतीस अतिशयित बाधक असून, एकंदर समाजास फार अहितकारक आहे.

जीं आईबापें आपल्या मुली पैशाकरितां वृद्ध मनुष्यांस देतात, त्यांवर देवाचा कोप व्हावा, हें उघड आहे.

मुलांच्या लग्नांत पैसा उधळण्यापेक्षां तो त्यांस प्रौढपणीं उपयोगी पडेल असा राखून ठेवावा.

**मुलांस दुःखाची संवय लावावी**—मनुष्यास दुःखें सोसावीं लागावयाचींच ह्मणून तीं सोसण्याची थोडथोडी संवय लहानपणापासून असावी हें बरें.

आजारी माणसांच्या समाचारास जाते वेळेस मुलांस बरोबर घ्यावें. ह्मणजे, दुखणाइताचा समाचार कसा

घ्यावा हें त्यांस कळेल. पण त्यांत एक सावधगिरी ठेवावी कीं, तें दुखणें देवी, पटकी इत्यादिकांसारखें स्पर्शजन्य नसावें.

एकादे प्रसंगीं प्रेताबरोबरही मुलांस घेऊन चालावें. त्याच्या योगानें त्याविषयींचें त्यांचें भय नाहींसें होतें.

## सारांश.

ह्या जगांतल्या प्रपंचांतले सगळे व्यवहार चांगल्या प्रकारें करितां येतील, अशा प्रकारें मुलांस शिक्षण द्यावें. हेंच आईबापांचें मुख्य कर्तव्य आहे.



# ना० बाळ गंगाधर टिळक

## ह्यांचें

## संक्षिप्त चरित्र.



हें पुस्तक

**केशव बाळाजी सहस्त्रबुद्धे**

ह्यांनीं लिहिलें

तें

**पुणें येथें**

"जगद्धितेच्छु" छापखान्यांत छापविलें.

आवृत्ति पहिली.





इ. स. १८९७

ही

अल्पसेवा

करवीर राजगुरु

श्री वासुदेव पंडित

उर्फ

# श्रीबाबामहाराज

ह्यांसी

त्यांच्या अंगीं वसत असलेल्या सद्धर्मनिष्ठा,
लोकहितपरायणता, गुणग्राहकता, मान-
सिक औदार्य, सौजन्य वगैरे अनेक
अमूल्य गुणांवर लुब्ध होऊन
परवानगीशिवाय अर्पण
केली असे.

के० बा० सहस्त्रबुद्धे.

## प्रस्तावना.

॥ स जातो येन जातेन याति वंशः समुन्नतिम् ॥

उत्तम गवई होण्याला चांगल्या गायनपटु गुरूजवळ तालीम घ्यावी लागते, वळणदार अक्षर काढतां येण्यास बंडूनानांचे कित्ते गिरवावे लागतात, चांगले बोलतां येण्यास सकृद्दर्शनीं पुष्कळ पुस्तकांच्या वाचनाची व तदनंतर वाचलेल्या गोष्टी ध्यानांत ठेवून त्यांचा योग्य स्थलीं योग्य तेवढाच उपयोग करण्याची संवय संपादन करावी लागते, पक्का व्यवहारदक्ष होण्याची इच्छा असेल तर निरनिराळ्या व्यवहारांचे सूक्ष्मदृष्टीनें अवलोकन करावें लागतें, सारांश कोणत्याही कामांत व गुणांत तरबेज होण्यास सर्वच मनुष्यें कुशाग्र बुद्धीचीं व अत्युत्तम नसल्यामुळें सर्वसाधारणतः मनुष्यास प्रथमतः डोळ्यांपुढें एकादा कित्ता ठेवावा लागतो. आतां चांगल्या . वाईट गोष्टी कोणत्या ह्याचा निर्णय केल्याशिवाय मन मानेल तो कित्ता बरेच लोक आपल्यापुढें ठेवितात व ह्मणूनच फारच थोडे लोक उच्च पदवीप्रत पोंहोचलेले आढळतात. ज्याप्रमाणें कित्ता असतो त्याप्रमाणेंच बहुतेक उदाहरणांत वर्तनक्रम दृष्टीस पडतो.

आमच्या महाराष्ट्रांत सर्व बाजूंनीं व सर्व गोष्टींत कित्ता घेण्याजोगे पुष्कळ लोक असतील; ते आह्मांस अवगत नाहींत. आह्मांला जी कांहीं एक व्यक्ति दिसत आहे ती ज्यांचें चरित्र आतां आह्मी वाचकांस निवेदन करणार ती विभूति होय. गोब्राह्मण—प्रतिपालक

शिवछत्रपती राज्य करीत होते अथवा पेशवाई एन भरभराटींत होती, त्यावेळीं ज्याप्रमाणें अनुक्रमें समर्थ रामदासांना त्यांच्या निर्लोभ व निरालस राजसेवेबद्दल व गुणांबद्दल आणि राजकार्यधुरंधर नानांना त्यांच्या राजकारणपटुत्वाबद्दल मान मिळत होता, त्याप्रमाणेंच सांप्रतच्या देशस्वरूपाला अनुरूप असा मान लोकपक्षाची योग्य ती सेवा करीत असल्याबद्दल आह्मां हतभागी लोकांकडून—ह्यांच्या खऱ्या खऱ्या योग्यतेनुरूप तो पूर्णपणें देण्यास आह्मांला संधि नाहीं ही दुःखाची गोष्ट होय—चरित्रनायकांस मिळत आहे.

आमच्या मनांत सदरहू चारित्र लेख लिहिण्याचे आल्याला जवळ जवळ सहा महिने झाले; परंतु नानाप्रकारचे अडथळे येत येत व जगदीशाच्या कृपेनें त्यांतून पार [illegible] पडत जाऊन आज हा प्रस्तावनालेख लिहिण्यापर्यंत मजल आली ह्याबद्दल फार आनंद वाटतो. हा लेख जगापुढें ठेवण्यांत आमचे जे हेतु आहेत त्यांतील मुख्य हेतु ह्मटला ह्मणजे बळवंतरावजींनीं जी आजपर्यंत लोकसेवा केली तिचें व सर्वसाधारणपणें त्यांच्या निर्मल व निष्कलंक गृहस्थाश्रमाचे महाराष्ट्रीयांपुढें पुसट पुसट असें तरी चित्र उभें करणें हा होय. असें झाल्यानें प्रत्यक्ष नव्हे तरी पर्यायानें बराच फायदा होण्याचा संभव आहे. हें चरित्र लिहिण्यास आह्मी पात्र नाहीं ही गोष्ट उघडपणें कबूल करण्यास आह्मी मागेंपुढें पहात नाहीं. बळवंतरावजींचें चारित्र लिहिणें ह्मणजे कांहीं साधारण गोष्ट नव्हे. त्यांत नानाविध राजकीय व सामाजिक विषयांचा उहापोह

केला पाहिजे. परंतु असें करण्याची योग्यता आमच्या दुर्दैवानें आह्मांमध्यें नाहीं हें मोठ्या दुःखानें लिहितों. तरी उद्दिष्ट हेतूप्रमाणें चार दोन आढळलेल्या, ऐकिलेल्या व पाहिलेल्या गोष्टींची वेडीवांकडी संगति जोडून आह्मीं आपल्या मनाचें पारणें फेडून घेतलें आहे.

हें अल्प चरित्र लिहिण्यास सुरवात करण्यापूर्वी आह्मी **नामदारां**कडे कांहीं माहिती मिळविण्याच्या हेतूनें गेलों, परंतु आमच्या दुर्दैवानें कांहीं एक माहिती त्यांजकडून मिळाली नाहीं एवढेंच नव्हे, तर उलटपक्षीं आह्मीं इच्छिलेलें कार्य मोडून काढण्याविषयीं त्यांनीं यत्न केला; व ह्मणूनच नंतर आह्मीं त्या बाबतींत त्यांना एकही शब्द न विचारितां काम सुरू केलें व जगदीशाच्या कृपेनें आज तें ह्या स्वरूपाला येऊन पोहोंचलें.

सदरहू पुस्तक तयार करितांना आह्माला येथील रहिवासी **श्री. बाबुराव भालचंद्र ओंकार इनामदार** व आमचे मित्र **श्रीधर रामचंद्र दामले** आणि धुळें येथील वकील **गणेश बाळाजी साठे** ह्यांणीं जी अमोलिक मदत केली व ज्या उपयुक्त सूचना केल्या त्यांजबद्दल त्यांचे आह्मी आभारी आहों.

पुस्तकाच्या अंतरंगाबद्दल जर शिफारस करणें असेल अथवा दोष द्यावयाचा असेल तर त्या दोहींसही आह्मी एकटेच वांटेकरी आहों; परंतु त्याच्या छपाईसंबंधानें वगैरे जो कांहीं व्यवस्थितपणा व सुंदरपणा दिसत आहे त्याचें सर्वथैव श्रेय **जगद्धितेच्छु** छापखान्याचे म्यानेजर **गंगाधर गोविंद गोंधळेकर** ह्यांच्या हुषारीकडे व मेहनतीकडे आहे.

तसेंच हरएक तऱ्हेच्या दगदगीचें काम, व मोठ्या उत्सुकतेनें, आमचे ह्या धंद्याचे व्यवस्थापक **यज्ञेश्वर गोपाळ दीक्षित** ह्यांनीं केल्याबद्दल त्यांचे आभार मानल्याशिवाय आमचें अंतःकरण हलकें होत नाहीं. ज्याच्या साहाय्यावांचून हें काम आमच्या हातूनच तडीस जाणें जवळ जवळ अशक्य होतें अशा एका मित्राचा प्रस्तुतस्थलीं नामनिर्देश केल्याशिवाय आमच्या ह्या प्रस्तावनालेखाची परिसमाप्ति आमच्यानें करववत नाहीं; व म्हणूनच जरी त्यांनीं आपलें नांव न लिहिण्याविषयीं मित्रप्रेमभावानें आग्रह धरिला आहे व जरी ते आह्मास पूज्य आहेत ह्मणून त्यांच्या इच्छेविरुद्ध जाणें संकट वाटतें,तरी केवळ आमच्या मनाच्या समाधानार्थ त्यांच्या इच्छेविरुद्ध जाण्याचें धाडस करितों; हे आमचे मित्र ह्मटले ह्मणजे चिपळूणस्थ **मोरेश्वर सखाराम चितळे** हे होत.

असो, ज्या जगत्पालकानें आह्मांस ह्या कामीं प्रेरित केलें तो **बळवंतरावजींस**, मनुष्यजातीला जेवढें ह्मणून आयुष्य देण्याची त्याची शक्ति असेल तेवढें सर्व देवो व सवड असल्यास आमच्यासारख्या फुकट जन्मास येऊन धरणीला व्यर्थ भारभूत होणाऱ्या प्रत्येकांचें थोडथोडें कमी कमी करून तें सर्व त्यांना घालो, अशी प्रार्थना करून हा लेख आटोपता घेतों.

पुणें, शनिवार, घ. नं. ३०२ वद्याचा वाडा म्यु. दवाखान्यासमोर. १०–२–९७. } **केशव बाळाजी सहस्रबुद्धे.**

# ना० बाळ गंगाधर टिळक
## ह्यांचें
# संक्षिप्त चरित्र.



अयं निजः परो वेति गणना लघुचेतसाम् ।
उदारचरितानां तु वसुधैव कुटुम्बकम् ॥ १ ॥

विषयप्रवेश.

ज्याप्रमाणें एकाद्या नौकानायकानें भर तुफानांत सांपडून गेलेली आपली नौका विलक्षण कौशल्यानें सुरक्षित रीतीनें बाहेर काढण्याचा मनःपुरस्सर यत्न करीत असावें व हा त्याचा यत्न चालला असतां नौकेमधील उतारू लोकांनीं त्याचें अभिनंदन करून त्याला ईश्वराप्रमाणें लेखावें, त्याप्रमाणेंच आह्मीं भारतवर्षीय लोकांनीं आमची स्वराज्यरूपी नौका पारतंत्र्यरूपी तुफानांत सांपडल्यामुळें तिला होणाऱ्या अनंत यातनांपैकीं कांहीं यातना अंशतः तरी कमी करण्याचे जे मार्ग आहेत, त्यांपैकीं सांप्रतचे राज्यकर्ते आमच्या समाजरूढी, धर्मतत्त्वें वगैरे बाबींसंबंधें अनभ्यस्त असल्यामुळें गैरसमजुतीनें अथवा नजरचुकीनें त्या रूढी अगर तीं तत्त्वें वगैरे बाबतींत आह्मां प्रजाजनास त्रास होईल असें वर्तन त्यांजकडून घडून आलें तर वस्तुस्थितीची खरी खरी तसबीर त्यांना तिची सत्यता पटेल अशा रीतीनें त्यांजपुढें मांडून, त्यांजकडून

बद्दल हळहळ लागून राहिली; परंतु ते बढतीच्या जागेवरच जात असल्यामुळें राहण्याविषयीं कोणी आग्रह धरिला नाहीं. त्यावेळच्या शिक्षकवर्गांत शिक्षण देण्याची हातोटी कायती ह्यांनाच अवगत होती. हल्लींच्या शिक्षकमंडळांत विद्यार्थ्यांच्या हितास अत्यंत विघातक असे जे मनोविभागाचें—ज्यांतला संबंध त्यांत, शाळा सुटल्याबरोबर विद्यार्थी व आपण एकाच जागीं एकच खेळ खेळले तरी हरकत नाहीं, ह्यावेळीं विद्यार्थ्यांचें नातें नाहींसें होऊन स्नेह्याचेंच नातें समजणें रास्त—तत्त्व ह्याचा त्यांना विटाळ सुद्धां झाला नव्हता. आपल्या शिष्यवर्गाला मायबाप सरकारानें छापून प्रसिद्ध केलेल्या नियमांप्रमाणें नियमित काळांत ठराविक विद्यादानच केवळ न करितां त्यांस स्वतःच्या मुलांप्रमाणें समजून त्यांच्या हरएक प्रकारच्या शिक्षणाबद्दल ते काळजी घेत; व ह्मणूनच ते ज्या ज्या प्रांतांत होते त्या त्या प्रांतांत आजमित्तीला जाऊन त्यांच्याबद्दल चवकशी करितां तेथील लोक हळहळतात. पुस्तककर्ते ह्या नात्यानेंही त्यांनीं आपलें नांव मागें ठेविलें आहे. त्रिकोणमित्ती ( Trignometry ) वर ह्यांनीं जें एक पुस्तक लिहिलें त्याची फार वाहवा झाली. व्याकरण शास्त्रावरही ह्यांचें एक लहानसें पुस्तक आहे. ह्यांचा व सुप्रसिद्ध मंडलिक घराण्याचा गुरुशिष्याचाच संबंध होता. ह्यांचें वर्तन किती बालबोध असे हें समजून घेण्याची ज्यांची इच्छा असेल त्यांनीं ज्यास संधि सांपडेल त्यानें बळवंतरावजींचें वर्तन स्वतः पाहून अथवा तसें न झा-

ल्यास त्याजबद्दल हकीकत ऐकून आपल्या मनाचें पारणें फेडून घेतल्यास ठिक पडेल. त्यासंबंधानें यथायोग्य वर्णन करण्याची शक्ति आमच्या परिच्छिन्न ज्ञानामुळें आह्मामध्यें नाहीं हें आह्मीं उघड कबूल करितों. ह्यांचा अंत इ. स. १८७२ च्या आगस्ट महिन्याच्या शेवटच्या दिवशीं झाला. ह्यांजजवळ मृत्युसमयीं अर्थसंचय बातंबेतच होता. वडिलांच्या पश्चात् बळवंतरावांचीं अगदीं जवळचीं जिव्हाळ्याचीं माणसें ह्मटलीं ह्मणजे त्यांचे मामा व चुलते हे होत. ह्यांपैकीं मातुल पांडोबाअण्णा महाजन हे कांहीं काल वेंगुर्लें येथें व नंतर दापोली येथें सबजज्ज कोर्टांत वकील होते. नुसते मराठीच वकील होते खरे, परंतु साक्षीदार वगैरे तपासण्याचे कामांत व विशेषतः फौजदारी कामांत त्यांची फार ख्याति होती. ते परलोकवासी झाल्यास फार वर्षें झाली नाहींत. ह्यांचे चुलते हल्लीं येथें शाळाशास्तरचे कामावर आहेत. वडिलांच्या पाठीमागें बळवंतरावजी आपल्या चुलत्याच्या शब्दाबाहेर गेले नाहींत एवढेंच नव्हे, तर आमचे ऐकण्यांत असेंही येत आहे कीं, अजूनही त्यांच्या वर्तनांत काडीचा देखील फरक नाहीं. नाहींतर व्यवहारांत जीं उदाहरणें आपण हरघडीं पाहतों त्यांपैकीं शेंकडा नव्याणव उदाहरणांत अशा प्रकारचे संबंध एवढ्या मोठ्या योग्यतेचे झाल्यावरही दृष्टिगोचर होणें व असणें हें महत् कठिण आहे. बळवंतरावजी अल्पवयी असतांनाच त्यांची व त्यांच्या पित्याची जगदीशानें ताटातूट केली ही दुःखद गोष्ट नव्हे काय?

असो, ईशसत्तेनें आपल्या एकुलत्या एक आणि सद्गुणमण्डित व सन्मान्य चिरंजीवाचा अनुपमेय लौकिक ऐकण्यास गंगाधरपंत आजमित्तीला आह्मा मर्त्यांमध्यें हजर असते तर त्यांना कृतकृत्य वाटून त्यांचा यथार्थ आनंद गगनांत सुद्धां मावला नसता; परंतु सर्वसत्ताधीशाचे इच्छे पलीकडे कोणाच्यानें जाववणार ! जरी दुर्दैवानें तशी स्थिति नाहीं, तरी गंगाधरपंतांच्या शुचिर्भूत व निष्कलंक वर्तनानें त्यांस प्राप्त झालेल्या स्वर्गलोकच्या रमणीय व सुखकर अशा प्रशांत भागांतून त्यांना आपल्या पुत्राच्या उज्ज्वल कीर्तीचे त्याच्या देशबांधवांनीं उभारिलेले ध्वज पाहून आनंद होत असेल.

शिक्षणक्रमाविषयीं उल्लेख.

मनुष्य मात्राच्या उन्नतीस शिक्षण अत्यावश्यक आहे ही गोष्ट विस्तारानें सांगावयास पाहिजे असें नाहीं. ईश्वरानें इतर प्राण्यांपेक्षां आह्मा मनुष्यप्राण्यास श्रेष्ठतर बुद्धीची अलौकिक देणगी दिलेली आहे, ती देण्याचें कारण सुद्धां आह्मीं शिक्षण प्राप्त करून घ्यावें हेंच आहे. जे ह्या जगदीशाच्या अलौकिक देणगीचा उपयोग केवळ शिक्षणप्राप्तीच्या कामींच करितात तेच आपली स्वतःची व आपणाबरोबर आपल्या देशाची उन्नति करून घेतात. आजपर्यंत जगाच्या इतिहासांत ज्यांनीं आपलीं नांवें अजरामर करून ठेविलीं आहेत त्यांस तशीं नांवें संपादण्यास विशेष प्रकारचें शिक्षणच संपादावें लागलें आहे. असो, शिक्षण किती आहे व तें कोठपर्यंत संपादन करावयाचें

त्याची अमुक एक इयत्ता ठरवितां येत नाहीं. अगदीं बाळपणापासूनच शिक्षण घेण्याची क्रिया सुरू होते व त्या क्रियेला ज्या ज्या प्रकारचें वळण लागतें त्या त्या प्रकारें ती आपला अम्मल मनुष्यमात्रावर बसविते. लहानपणीं दिलें पाहिजे अशा शिक्षणाचा बोजा घरांतील वडील माणसांवर असतो; व समजूं उमजूं लागल्यावर संपादन करण्याच्या शिक्षणाचा बोजा ज्या त्या व्यक्ती वरच असतो. "बालपणांत अक्षयींचा मातृवियोग व तरुणपणांत अक्षयींचा पितृवियोग हीं दोन्ही मनुष्याला अनुक्रमें शरीरसामर्थ्य व विद्यार्जन ह्या कार्मी अत्यंत अनिष्ट होत " अशी जी एक ह्मण आहे तिच्या दुसऱ्या भागाची प्रतीति अनुभविण्याचा बळवंतरावजींना प्रसंग आला होता; परंतु परमपूज्य अशा वडिलांच्या पुण्याईनें, जगदीशाच्या कृपेनें, व स्वतःच्या बुद्धिसामर्थ्यानें ते त्यांतून पार पडले. श्री ग पासून तों ए बी सी शिकूं लागेपर्यंतचा त्यांचा सर्व अभ्यास रत्नागिरी . येथें गंगाधरपंतांच्या ( वडिलांच्या ) हाताखालींच झाला; तेव्हां त्यासंबंधें जास्त लिहावयास नकोच. मराठी अभ्यास आटोपून इंग्रजीस सुरवात करावयाची तोंच गंगाधरपंतांची पुण्यास असिस्टंट डेप्युटीच्या जागीं नेमणूक झाली व पुण्यास आल्यापासून ह्मणजे आपल्या वयाच्या दहाव्या वर्षापासून बळवंतरावजींचें इंग्रजी भाषेचें अध्ययन सुरूं झालें. इ. स. १८७२ च्या डिसेंबर महिन्यांत ह्मणजे वडील परलोकवासी झाल्यावर चार महिन्यांनीं ह्यांची प्रवेश परीक्षा

( Matriculation ) पास झाली. पुढें १८७५ सालीं एफ, एची; व इ. स. १८७६ त बि. ए. ची अशा त्यांच्या परीक्षा उतरल्या. ह्यांचा इंग्रजीचा शाळा व पाठशाळा ह्यांतील अभ्यास मुख्यत्वेंकरून पुण्यासच झाला. फक्त बि ए. च्या वेळीं पांच सहा महिने हे एलफिन्स्टन कालेजांत गेले होते. असें जरी झालें तरी त्यांना डेक्कन कॉलेजचा अभिमान असल्यामुळें बि. ए. च्या वेळेस डेक्कन कालेजचे विद्यार्थी ह्मणूनच हे परिक्षेस गेले होते. इ. स. १८७९ त ह्यांनीं एल एल बीची परीक्षा देऊन विश्वविद्यालयांतून कोष्टकी व नमुन्याचें ज्ञान प्राप्त झाल्याचे दाखले ह्मणून जे एकापेक्षां एक जास्त असे चढत्या प्रमाणाचे बिल्ले मिळतात त्यांपैकीं—अंगीं योग्यता व सामर्थ्य असतांही—उरलेल्या चतकोर अर्ध्याची हांव न धरितां आपला काल ज्ञानप्राप्तींत व देशसेवेंत घालविण्याचा कृतसंकल्प केला. पाठशाळेंत असतांनाच बळवंतरावजींच्या गणितशास्त्रांतील अप्रतिम बुद्धीबद्दल प्रसिद्धि झाली. असें ह्मणतात कीं गणितशास्त्राचे प्रोफेसर हॅथार्नथ्वेट हेही प्रसंगविशेषीं बीजगणितांतील गूढ प्रश्न बळवंतरावजीनीं सोडविलेले पाहून चकित होत. बीजगणिताच्या पुस्तकांत जे पाठ दिलेले असतात त्यांतील कांहीं विवक्षित उदाहरणें तीं कठिण असल्यामुळें विद्यार्थ्यांनीं सोडविलीं नाहीं तरी चालण्याजोगीं असतात, व ह्मणूनच गणितविषयाचे अध्यापक अशा प्रकारच्या उदाहरणांची एक यादी आपल्या शिष्यवर्गास देतात

व शिष्यवर्ग अशीं उदाहरणें सोडून देऊन उरलेलीं उदाहरणें करितात. बळवंतरावजींना अशा यादीचें कारण पडलें नाहीं. अध्यापकाच्या तोंडून ही यादी येण्यापूर्वीच त्यांच्या जवळ झाडून सर्व उदाहरणें सोडविलेलीं असत. बळवंतरावांच्या योग्यतेवर अध्यापकांचा एवढा जबरदस्त भरंवसा होता कीं, इतर विद्यार्थ्यांनीं कांहीं भानगडीचीं व कठिण उदाहरणें विचारलीं व त्यांचें समाधान करण्यास त्यांस फुरसत नसली तर ते "टिळ*कांच्या चोपडीवर पहा, किंवा त्यांना विचारा" असा जबाब देत.

शिक्षणक्रम आटोपून देशसेवेस सुरवात.

एल. एल. बीची परीक्षा उतरल्यानंतर एकादी मानाई नौकरी पटकावून गाडी घोडा वापरण्याच्या ऐषआरामाची कल्पना जर त्यावेळीं बळवंतरावजींच्या मनांत येऊन ती संपादन करण्याचे कामीं त्यांनीं किंचित् तरी आपली इच्छा दर्शविली असती तर त्या वेळच्या स्थित्यनुसार तेव्हांच त्यांना एकादा बडा हुद्दा प्राप्त झाला असता व आज मित्तीला खुशाल ते राव बहादूर बनून राहिले असते! पण एवढ्यानें काय झालें असतें? बळवंतरावजींच्या अविश्रांत परिश्रमांपासून आह्मां महाराष्ट्रीयांचा जो आजमित्तीला अकल्पित फायदा होत आहे

* ही हकीकत त्यांच्या सहाध्यायी मित्रांच्या तोंडून प्रत्यक्ष ऐकलेली आहे, तेव्हां तींत कमजास्तपणा असेल असें ह्मणण्यास आधार नाहीं.

त्याला आह्मी आंचवलों असतों. जगदीशाची आम्हां दीन बालकांवर कृपा होती ह्मणूनच त्यानें त्यावेळीं त्यांच्या अंतःकरणांत राजसेवेची कल्पना शिरूं दिली नाहीं. पाठशाळेंत असतां पासूनच कै. गो. ग. आगरकर व आमचे चरित्रनायक ह्यांच्या मनांत सरकारी नौकरींत न शिरतां लोकशिक्षणाच्या कामांत आपला देह झिजविण्याचे विचार प्रादुर्भाव पावले. परंतु कै. आगरकर हे एम. एची परीक्षा देण्यांत गुंतल्यामुळें एल. एल. बी पसार होतांच कोणत्या मार्गानें देशसेवा करावयाची वगैरे गोष्टींचा निर्णय ठरविण्याच्या विचारांत बळवंतरावजी होते तोंच त्यांना सुदैवानें ज्या महापुरुषानें आपलें नांव आपल्या सुरस, सालंकार, सुबोध, प्रौक्त व उदात्त आणि उन्नत विचारांनीं परिप्लुत अशा महाराष्ट्र भाषेच्या निःसीम सेवेनें अजरामर करून ठेविलें आहे ते कै. शास्त्रीबोवा सरकारी नौकरींत बंदे गुलामगिरी करण्यापेक्षां देशाच्या उन्नतीस कारणीभूत होईल असा स्वतंत्र धंदा काढून त्यांत आपलें आयुष्य खर्ची घालणें बरें अशा उद्देशानें आपल्या मानाच्या व किफायतीच्या हायस्कुलांतील नौकरीवर पाणी सोडून पुण्यग्रामीं आल्याचें कळलें. मग काय विचारतां? बळवंतरावजींना आपले मनोरथ तडीस नेण्यास एक कट्टा साहाय्यकारीच मिळाला. नंतर ते व शास्त्रीबोवा ह्या दोघांनीं हुषार व खटपटी कै. नामजोशांचें साहाय्य घेऊन “ मानवी सुधारणेचें पाऊल पुढें पडत जाऊन राष्ट्राच्या भौतिक, नैतिक व

धार्मिक सुखाची अभिवृद्धि करणाऱ्या साधनांपैकीं अत्यंत श्रेष्ठ साधन जें शिक्षण त्याचा फैलावा करणें इष्ट व श्रेयस्कर, अशा समजुतीनें " इ. स. १८८० च्या जानेवारीच्या दुसऱ्या तारखेस " न्यु इंग्लिशस्कूल ( नवी इंग्रजी शाळा ) " नांवाच्या

न्यु इंग्लिश स्कूलची सुरवात.

शाळेची संस्थापना केली व आह्मीं हिंदुजनांमध्यें असणाऱ्या कर्तबगारी, गुणसमुच्चय वगैरे गोष्टींचें उदाहरण स्पष्टपणें जगापुढें मांडिलें, दुर्दैवानें गोष्ट एवढीच कीं, ज्या महापुरुषानें एवढा अकटोविकट कारखाना आपल्या दोन मित्रांच्या साहाय्यानें शिरावर घेतला त्याला कारखान्याची भरभराटी पहाण्यास कृतांतानें आह्मांमध्यें राहूं दिलें नाहीं; दुःखांत सुख एवढेंच कीं, त्या महाभागाच्या इहलोकांतील प्रयाणामुळें झालेल्या अनिवार्य व असह्य दुःखावर आपल्या गंभीर व उदात्त विचारांचा दाब घालून केवळ लोककल्याणावर नजर देऊन हातपाय न गाळतां त्याच्या मित्रद्वयांनीं हातीं घेतलेलें काम जारीनें व जोरानें सुरू ठेविलें. प्रस्तुतस्थलीं ह्या शाळेसंबंधीं चार शब्द लिहिणें अप्रयोजक ठरणार नाहीं. ही शाळा काढण्याचे उद्देश येणेंप्रमाणें होते.:—" सामान्यतः विद्या, व विशेषेंकरून इंग्रजी विद्या, सर्वांस थोड्या खर्चानें व सुगम रीतीनें प्राप्त व्हावी. " तसेंच राष्ट्रीय उन्नतीस साहाय्यभूत होईल अशा प्रकारचें इंग्रजी शिक्षण देशी भाषांतून व प्रचारांत असलेल्या शिक्षणपद्धतीहून भिन्न अशा

एकाद्या विवक्षित पद्धतीनें मिळावें, व ह्या शाळेच्या शाखा निरनिराळ्या ठिकाणीं पसराव्या व कालगतीनें आंग्लदेशस्थ आक्सफर्ड, केंब्रीज वगैरे नमुन्यावर स्वदेशीय विद्यापीठें स्थापन करावीं " शाळा स्थापन झाली त्यावेळीं मुलांची संख्या अवघी १९ होती व पुढें होत होत ती संख्या ८००–१००० वर गेली. व कै. आगरकर हे एम. एची परीक्षा पसार झाल्याबरोबर पूर्वसंकेताप्रमाणें शाळेत येऊन मिळाले. तसेंच कै. आपट्यांनीं नौकरीला फांटा देऊन ही देशसेवा पत्करली; शिवाय, कै. केळकर, धारप हेही शाळेला येऊन मिळाले. रा. गोळे व इतर मंडळी हें एका पाठीमागून एक येऊं लागले. जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप शाळेला मिळाली, प्रवेशपरीक्षेला पाठविलेले विद्यार्थी इतर शाळांच्या प्रमाणानें पाहतां जास्त पास होऊं लागले. मध्यंतरीं कोल्हापूरचा माजी मयत हतभागी राजा शिवाजी ह्याच्या संबंधें केसरी व मराठा पत्रांत लिहिले गेलेल्या लेखांबद्दल जेव्हां चरित्रनायक व त्यांचे जीवश्चकंठश्च मित्र कै. आगरकर ह्या उभयतांस डोंगरीवर *कारागृहवास कंठावा लागला, तेव्हां शाळेची स्थिति बिघडेल अशी सर्वत्र भीति वाटत होती; परंतु " परोपकारार्थमिदं शरीरम् " हें तत्त्व ज्यांचे अंगीं मूर्तिमंत वसत होतें अशा स्वकार्यदक्ष व विद्वान आपट्यांच्या श्रमांनीं ही भीति दूर झाली. शाळेमध्यें एकावर एक चढ असे विद्वान शि-

* ह्या संबंधाची हकीगत पुढें येईलच.

क्षक असल्यामुळें शाळेंत उत्तम तऱ्हेची शाळा ह्मटली ह्मणजे पुण्याचें " न्युस्कूल " असा जिकडे तिकडे एकच ध्वनि महाराष्ट्रभर निघूं लागला. जो तो आपलीं मुलें ह्याच शाळेंत पाठवूं लागला. कै. नामजोशांच्या खटपटीनें बडे बडे राजे रजवाडे शाळेंत येऊं लागून शाळेची व्यवस्था पाहून खूष झाल्याकारणानें शाळेला देणग्या मिळूं लागल्या. एकीचा फायदा कसा व किती होतो त्याची ढळढळीत प्रतीति महाराष्ट्रीयांच्या डोळ्यांपुढें उभी ठाकली. युनिव्हरसिटींतून पदवी घेऊन बाहेर पडणाऱ्या महाराष्ट्रजननीच्या हुपार बालकांस ह्या शाळेंत शिरून आपलें आयुष्य अशा प्रकारें देशसेवेंत घालण्याची स्फुर्ति होत चालली. सरकारची मदत मिळूं लागली व थोड्याच कालांत कॉलेजहि काढण्याची परवानगी मिळून तें आज मितीला चिरस्थाईहि झालें आहे. असो, शाळेची स्थिति कशी होती व कशी आहे हें सांगाण्याचा आमचा उद्देश नसून केवळ चरित्रनायकाचा ह्या शाळेशीं संबंध होता एवढींच गोष्ट सांगून वाचकांचें समाधान होणार नाहीं ह्मणून थोडक्यांत चार शब्द लिहिणें भाग पडलें; सबब एवढ्यांतच आटपतें घेऊन शाळेशीं चरित्रनायकांसंबंध होता तेवढ्याचेंच थोडक्यांत स्थूलमानानें वर्णन देतों.

शाळेंत अध्यापक ह्या नात्यानें

शाळेंत शिरल्यापासून तों अगदीं तिजपासून आपला संबध सोडीपर्यंत मी अमुकच विषय अमक्या वर्गाला शिकवीन अशा तऱ्हेची आढ्य-

ता बळवंतरावजींनीं कधींही धरिली नाहीं. अडेल त्या वर्गाला शिकविण्यास हे नेहमीं आनंदानें तयार असत. आज काय संस्कृत घेण्याला कोणी नाहीं का, "येतों तर मग" उद्यां काय तुमचें इंग्रजी घेण्यास मास्तर आलें नाहींत काय 'आलों मीं' असे उद्गार त्यांच्या तोंडून निघत, व उद्गारांप्रमाणें ते तें काम बजावीत. पुन्हां इतकेंही असून अमुक एक विषय त्यांना चांगला शिकवितां येत नसे असें कोणाच्यानेंही ह्मणतां आलें नाहीं. त्यांचा उत्कर्ष ज्यांना सहन होत नाहीं असे लोक सुद्धां खऱ्या अंतःकरणानें बोलूं लागल्यास आपल्या मुखावाटें सदर विधानास पुष्टयर्थ ह्मणून चार शब्द बोलल्याशिवाय रहाणार नाहींत. गणितविषयाचे शिक्षण देण्यांत परमपूज्य व कैलासवासी केरूनानांच्या खालोखाल हेच आहेत. ज्याप्रमाणें सूर्योदयापासून माध्यानकाल होईपर्यंत सहस्त्ररश्मीचा किरणप्रकाश क्रमशः आल्हादकारक रीतीनें वर्धमान होत जातो त्याप्रमाणेंच बळवंतरावजी बीजगणित किंवा भूमिती शिकवूं लागले कीं उदाहरणाच्या किंवा प्रमेयाच्या दरएक अंगाचें स्पष्टीकरण त्यांच्या मुखावाटें निघतांच विद्यार्थ्यांच्या अंतःकरणवृत्ती तल्लीन होऊन त्यांच्या मनांत तें स्पष्टीकरण पूर्णपणें ठसे. चरित्रनायक स्वार्थत्याग करून ह्या शाळेंत शिरले ही जरी दोन आणि दोन चारच होतात ह्याप्रमाणें स्पष्ट गोष्ट आहे तरीही त्यांच्या ह्या गुणाबद्दल महाराष्ट्राचे ललामभूत प्रो. रामकृष्णपंत भांडारकर ह्यांनीं इ. स. १८८४ च्या आ-

क्टोबर महिन्यांतील २४ व्या दिवशीं डेक्कन एजुकेशन सोसायटीच्या स्थापनेसाठीं जी सभा भरली होती तींत जे उद्गार काढले ते ऐकण्याजोगे असल्यामुळें प्रस्तुत समयीं दिल्याशिवाय रहावत नाहीं. ते उद्गार येणेंप्रमाणें:—" ( ज्या सात गृहस्थांनीं आज ह्या शाळेच्या कामीं श्रम चालविले आहेत ) " "ह्या सात गृहस्थांच्या अग्रभागीं एका एल. एल. बी. चें नांव आहे. हा गृहस्थ ह्या खाजगी शिक्षणाच्या नादीं न लागता, व स्वहिताकडे पाहून सरकारी नोकरी धरता, तर रावसाहेब होऊन दरमहा दोन तीनशें रुपयांवर आज कोठें तरी चैनींत असता, इत्यादि इत्यादि. ही इ. स. १८८४ मधील स्थिति. आजला ते सहजच दरमहा पांच सातशांच्या जागेवर असते. शाळेंतील अगदीं पांच रुपायांच्या शिपायापासून तों तहतवरपर्यंत कोणालाही बळवंतरावजींच्या तोंडून केंव्हांही मन दुखावेल असा शब्द गेला नाहीं व ह्यांच्या सौजन्याबद्दल शाळेंतील हरएक नोकर तारीफ करतो. * मी "विद्वान्"

* साधारण सुशिक्षित व समंजस लोकांनीं बळवंतरावजींच्या सौजन्याबद्दल तारीफ केली तर त्यांत विशेष नाहीं. परंतु अडाणी व अशिक्षित माणसांच्या तोंडून त्यांच्या सौजन्याबद्दल निर्मल अंतःकरणानें जेव्हां उद्गार निघतात तेव्हां आनंदाच्या उकळ्या फुटूं लागून त्यांच्या संबंधीं मनामध्यें परम पूज्यभाव उचंबळूं लागतो. व अशा प्रकारचे उद्गार स्वतःच्या कानांनीं ऐकण्याची आह्मांस सुदैवानें एकदां पाळी आली. हे उद्गार न्यू इंग्लिशस्कूलमध्यें पूर्वीं नोकरीस असलेल्या एका शिपायाच्या तोंडून आले. एके दिवशीं सुदैवानें आह्मांस त्याच्या जवळ चार शब्द बोलण्याचा

मी "प्रोफेसर" ह्मणून खालच्या शिक्षक मंडळांत कसा मिसळूं अशा कल्पनेचा विटाळ सुद्धां त्यांना झाला नाहीं व अजूनही ते कोठें बाहेर गेले तरी त्यांना होत नाहीं. बळवंतरावजींच्या रामदासी वृत्तीमुळें कोणत्याहि वर्गातील कोणताही विद्यार्थी त्यांच्यापुढें जाऊन कांहींही विचारण्यास भीत नसे; व ते सुद्धां पाश्चिमात्य शिक्षणाचे संगतीनें काम नसलें तरी जाण्यायेण्याची चपळाई, बोलण्याची महगता व त्या वेळीं पदवीधरांची संख्या थोडी असल्यामुळें साहजिकच क्षुद्र अंतःकरणधारी अहंभावी ग्राजुएटांच्या अंगीं दिसणारा ताठा इत्यादि दुर्गुणांच्या तडाक्यांत सांपडले नव्हते ह्मणून

मागील पृष्ठावरून पुढें चालू.

समय आला. तो मनुष्य पूर्वी शिकलेल्या लोकांत व विशेषतः पुण्यासारख्या शहरीं राहिलेला असल्यामुळे कुळंबी लोकांच्या संभाषणांत दृष्टिगोचर होणारा ग्राम्य शब्दांचा व रीतीरिवाजांचा भरणा त्याच्या जवळ नव्हता व ह्मणूनच त्याचे आमचें संभाषण सुरू झाले. बोलतां बोलतां त्याने मी न्यू इंग्लिश स्कूलचा नोकर होतों वगैरे आह्मांस सांगितले. अर्थात ता न्यू इंग्लिश स्कूलचा नोकर होता असे ऐकल्याबरोबर त्याचे बळवतरावजीबद्दल काय विचार आहेत हे खरेंखरे बाहेर काढण्यासाठीं प्रथमतः बळवंतरावजींविरुद्ध आमचे मत आहे असे आह्मी त्यांस सांगितले. आमच्या तोडून विरुद्ध अक्षरें बाहेर निघतांच त्यांस तें रुचले नाही व त्याने जणू काय आह्मी पुण्यांतील गोष्टींसंबंधे अनभ्यस्त आहों अशा समजुतीनें—आपल्या माहितीप्रमाणे व अनुभवावरून सर्व कांहीं गोष्टी आह्मांस सांगितल्या व त्यांत बळवंतरावजींच्या न्यू इंग्लिश स्कूलच्या नोकरींत असलेल्या नोकरांपाशीं असणाऱ्या वर्तनाबद्दल व सौजन्याबद्दल मनःपुरस्सर तारीफ केली.

हरएकाचा वांका सावधान चित्तानें ऐकून घेऊन त्याला जबाब देत. यःकश्चित् तिसऱ्या चवथ्या यत्तेंत असतांना-जरी ह्या शाळेंत आह्मी नवीनच असून सारे दोन चार महिने होतों–केवळ त्यांच्या साधुवृत्तीचा फायदा घेऊन आह्मीं अगदीं क्षुल्लक प्रश्न विचारून ह्या महात्म्याला त्रास दिलेला आहे. ह्या आमच्या कृत्याबद्दल आतां आह्माला फार खेद होतो. परंतु पोरस्वभावामुळें झालेल्या ह्या वर्तनाबद्दल सर्वसाक्षी परमेश्वर आह्मांस क्षमा करील अशी त्याच्या अंगीं असलेल्या दयाळूपणाच्या आमच्या कल्पनेवरून आमची भरपूर खात्री आहे. असें जरी होतें तरी त्यांच्यामध्यें पूर्णपणें वास्तव्य करीत असलेल्या शिक्षक व गृहस्थ ह्या दोन्ही नात्यांच्या अमोलिक व अलौकिक गुणांमुळें त्यांच्याबद्दल हवा तेवढा पूज्यभाव विद्यार्थ्यांच्या मनांत नव्हता असें नाहीं. ह्या पूज्यभावाचें उघड उघड प्रदर्शन पुष्कळ वेळां सभांमधूनही झालेलें आहे. बऱ्याच अंशीं–किंबहुना बरोबरीनेंही ह्मटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.–ह्यांच्याबद्दल विद्यार्थीजनाची पूज्यबुद्धि व ह्यांचें विद्यार्थ्यांशीं असलेलें वर्तन ह्या दोहोंची तुलना कै. केरूनानांचें विद्यार्थीजनाशीं असणाऱ्या वर्तनाशीं व विद्यार्थीजनांच्या अंतःकरणांत वागत असलेल्या नानाविषयींच्या पूज्यबुद्धीशीं करण्यास हरकत नाहीं. अंगीं योग्यता असतांना केवळ संस्था भरभराटीला यावी व तिला चिरस्थाईत्व आलें पाहिजे, एवढ्याच गोष्टीवर नजर ठेविल्यामुळें " मान अपमानाचें गोवें, अवघें गुं-

डाकूनि ठेवावें " ह्या साधूच्या उक्तीला आपल्या अंतःकरणरूपी कपाटांत कोंडून ठेवण्याचा व शांततादेवीला आपलीशी करून घेण्याचा बळवंतरावजींना अनेक वेळां प्रसंग आला; व त्याप्रमाणें करण्यासही ते बराच कालपर्यंत चुकले नाहींत. परंतु जेव्हां अगदीं निरुपाय झाला तेव्हांच त्यांनीं मोठ्या दुःखानें आपला हात शाळेंतून काढून घेतला.

लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट.

कोणत्याही संस्थेंतून आपलें अंग निघालें किंवा काढून घेतलें ह्मणजे सामान्य जनाच्या मनोवृत्तीचा कल त्या संस्थेसंबंधीं व्यंगें बाहेर काढण्यांत व तिजबद्दल तिरस्कारवृत्ति धारण करण्याकरण्याकडे वळतो. जे खरोखर महाजन असतात तेच ह्या सामान्य नियमास अपवाद असे ठरतात. अशा अपवादांत ज्यांनीं आर्यमातेच्या हितार्थ आपल्या स्वार्थावर लाथ मारली आहे, स्वदेशसेवा हेंच ज्यांचें ब्रीद बनलें आहे, व जे हल्लीं आपल्या सद्गुणांनीं व सत्कृतींनीं महाराष्ट्रीयांच्या अंतःकरणांत सदोदित वसत आहेत त्या आमच्या चरित्रनायकांची गणना होते. बळवंतरावजींनीं शाळेंमधून आपलें अंग काढलें म्हणून त्यांची संस्थेवरील भक्ति नाहींशी झाली नाहीं. ही कांहीं साधारण गोष्ट नव्हे. खरोखरच लोकोत्तर. असें सांगतात कीं, कांहीं दिवसांमागें जेव्हां पुण्यामध्यें एक दोन विद्यालयांची संस्थापना झाली, तेव्हां मनुष्यस्वभावाच्या साधारण प्रवृत्त्यनुसार बळवंतराव साहजिकच आपणाला

येऊन मिळतील व ते आमच्यांत आहेत एवढ्या गोष्टीनें सुद्धां आपण समाजाचें मन आपणाकडे आकर्षून घेऊन कार्यभाग साधूं अशा समजुतीनें त्या विद्यालयाच्या व्यवस्थापकांनीं व मालकांनीं—कित्येकांनीं भीड खर्च करून व करवून आणि कित्येकांनीं स्वतः नम्रतापूर्वक विनंति करून—त्यांना आपलेसें करून घेण्यासाठीं नानाप्रकारचे यत्न केले. परंतु कविकुलगुरूची ' विषवृक्षोऽपि संवर्ध्य स्वयं च्छेत्तुमसाम्प्रतम् ' ही उक्ति बळवंतरावजींच्या वर्तनांत बाणली असल्यामुळें त्यांचे ते यत्न सर्वांशीं फुकट गेले.

सोसायटींतून निघणें.

असो, शाळेच्या सुदैवानें ह्मणा किंवा दुर्दैवानें ह्मणा—तें आज निश्चित नसून भावी इतिहासावरूनच ठरावयाचें आहे—इ० स० १८९० सालांत ह्यांनीं आपला सोसायटीशीं असणारा संबंध सोडला. शाळेसंबंधीं लिहितांना, ह्या पूर्वींच, केसरी व मराठा ह्या वर्तमानपत्रांत लिहिले गेलेल्या लेखांबद्दल कै० आगरकर व चरित्रनायक ह्यांस कारागृहवास कंठावा लागला असें सहजगत्या जातां जातां नमूद केलेलें आहे. वाचकांपैकीं पुष्कळजणांस तो कारागृहवास कसा व कोणाकरितां भोगावा लागला हें समजून घेण्याची इच्छा होणें साहजिकच आहे. ह्मणून त्या संबंधें थोडक्यांत दिग्दर्शन करणें अप्रशस्त होणार नाहीं अशी उमेद आहे.

महाभाग कै० शास्त्रीबोवांनीं " न्यू इंग्लिश स्कूल " शाळेची संस्थापना केली त्यावेळींच मराठी भाषेंत के-

सरी व इंग्रजी भाषेंत मराठा अशीं वर्तमानपत्रें सुरू केलीं. हीं वर्तमानपत्रें काढण्याचा हेतु उदरंभरण नसून देशभाषेची व राष्ट्राची सेवा करून वर्तमानपत्रें काढण्याचा खरा खरा हेतु काय ह्यांचें जनाला उदाहरण दाखविण्याचा होता. आनंदाची गोष्ट ही कीं शास्त्रीबोवांचीं हीं दोन्ही अपत्यें योग्य त्या पालकाच्या हाताखालीं असल्यामुळें शास्त्रीबोवांच्या इच्छेनुसार आपलें वर्तन ठेवून देशसेवेंत तत्पर आहेत. वर्तमानपत्रें सुरू केल्यावर त्यांचें चालकत्व कोणाकडे आहे ह्याबद्दल सरकारांत नोंद दिली पाहिजे असा आमच्या सांप्रतच्या आंग्लप्रभूचा कायदा आहे. ह्या कायद्या अन्वयें अनुक्रमें केसरी व मराठा ह्या पत्रांचें चालकत्व कै० आगरकर व चरित्रनायक ह्यांजकडे असल्याविषयीं मायबाप सरकारच्या दप्तरीं नोंद दिलेली होती. सरकार दप्तरीं ह्या जीवश्च कंठश्च मित्रद्वयाची नोंद होती तरी कै० शास्त्रीबोवा व आपटे त्यांचेही लेख ह्या पत्रांमधून असत. हीं वर्तमानपत्रें सद्धेतूनें काम करीत असल्यामुळें व सर्वसाधारणतः वर्तमानपत्राच्या वांटणीस न येणाऱ्या अशा विद्वज्जनाकडे ह्यांचें चालकत्व असून ते चालक पुनः स्वकार्यदक्ष असल्यामुळें थोड्याच कालांत ह्यांचा बराच अभ्युदय झाला. परंतु उद्योगासक्तीची जणूं काय कसोटी पाहण्याच्या इराद्यानेंच चिच्छक्तीनें शास्त्रीबोवांच्या ह्या पत्रांवर मध्येंच एक किटाळ आणिलें. तो प्रकार असाः—

ज्यानें मऊ परांच्या गादीवर झोंप घ्यावयाची, सु-

ग्रास अन्नसेवन करावयाचें, सुंदर अशा राजवाड्यांत आनंदानें कालक्रमणा करावयाची, हजारों रुपये आपल्या हातानें धर्म करावयाचे, हजारों रुपये दरमहा देऊन नौकर ठेवून त्यांजकडून कामें करून घ्यावयाचीं, ज्याच्यापुढें आह्मीं हात जोडून उभें असावयाचें, जो आह्मांला सर्वतोपरी वंद्य होता, जो यवनांचा कर्दनकाळ शिवछत्रपति ह्याचा वंशज असा कोल्हापूर संस्थानच्या राजलक्ष्मीचा माजी मयत मालक राजा शिवाजी दैवाच्या दारुण दुर्विलासाच्या फेऱ्यांत सांपडून त्याचा नाहक छळ होत असल्याची हकीकत जेव्हां केसरी व मराठा कचेरींत आली व जेव्हां ती हकीकत विश्वसनीय होती असा चालकांचा ग्रह झाला, तेव्हां

कोल्हापूर प्रकरण.

अर्थातच उपलब्ध असलेल्या माहितीच्या जोरावर राजाच्या कल्याणाच्या बुद्धीनें व लोककार्यांत पत्रकर्त्यानें कसूर करणें लांछनास्पद होय अशा समजुतीनें केसरी व मराठा पत्रांत अधिकारीवर्गाची कानउघडणी करण्याजोगे विचारप्रचुर व लोकमत जागृत होण्यासारखे कडक लेख प्रसिद्ध झाले. एकीकडे ह्या स्वदेशाभिमानी व स्वकार्यतत्पर विद्वानांचे यत्न चाललेच होते. परंतु दुसरीकडून राजा शिवाजीचा निर्घृण शत्रु दुर्दैव ह्याची कडेकोट तयारी असल्यामुळें पत्रकारांचा उद्दिष्ट हेतु न साधतां बिचाऱ्या शिवाजी राजाला नगरच्या किल्ल्यांत एकाद्या साधारण मनुष्याप्रमाणें स्वर्गाची वाट धरावी लागली. हर ! हर ! काय

भयंकर प्रसंग तो ! दुर्दैवी राजा परलोकवासी झालाच, पण एवढें होऊनच थांबलें नाहीं; चमत्कार असा झाला कीं, कोल्हापूरचे माजी मयत कारभारी महादेव वासुदेव बर्वे—जे कोल्हापूर प्रकरणामुळें देशीं परदेशीं आबालवृद्धांस पूर्णपणें माहीत झालेले आहेत—ह्यांनीं सद्रहु बाबतींत केसरी व मराठा पत्रांत प्रसिद्ध झालेल्या लेखांबद्दल फिर्याद केली; आणि तिचा निकाल बर्व्यांच्या तर्फेचा झाल्यामुळें कैलासवासी आगरकर व आमचे चरित्रनायक ह्या उभयतांस १०१ दिवस कारागृहवास काढावा लागला. हे डोंगरी येथील बंदिशाळे ! खरोखरच तूं सुदैवी आहेस.

कारागृहवास.

ज्या साधुपुरुषांची त्यांच्या कार्यवैपुल्यामुळें आह्मां हतभागी महाराष्ट्रीयांपैकीं कोणालाही सारखी १०१ दिवस संगति घडणें दुष्प्राप्य त्यांच्या सहवासाचें तसें सुख त्वां संपादिलें ना ? ग्रीस देशस्थ तत्त्ववेत्ता साक्रेतिस ह्याच्या कारागृहवासानें ज्याप्रमाणें बंदिशाळेला महत्त्व आलें, त्याप्रमाणेंच ह्या विद्वज्जनांचा सहवास तुला घडल्यामुळें तुझें नांव संपूर्ण महाराष्ट्रास विदित झालें. ज्यांना तुरुंगवास काढावा लागतो त्यांतील शेंकडा नव्याण्णव लोक दुष्टपणाच्या व नीचत्वाच्या केलेल्या कर्मांचे क्षालनार्थच ऐहिक राजदंड म्हणून तो काढितात; आणि ह्मणूनच असा वास त्यांना कष्टमय होतो. ज्यांना सत्कार्याकरितांच समयविशेषीं हा वास सोसण्याची पाळी येते, त्यांना त्यांचें अंतःकरण निर्मल

असल्यामुळें त्याजपासून दुःख होत नाहीं एवढेंच नव्हे, तर उलटपक्षीं कांहीं एक प्रकारचें सुख प्राप्त होऊन ह्या वासांत त्यांजकडून कांहीं महत्त्वाचीं कामें होतात. असाच प्रकार चरित्रनायक व त्यांचे मित्र कै. आगरकर ह्यांचे हातून घडून आला. डोंगरीवर असतांनाच ह्या मित्रद्वयांनीं केर्ड, मिल्ल प्रभृति विख्यात शास्त्रज्ञांचे अर्थशास्त्रावरील प्रचंड ग्रंथांचें परिशीलन केलें व त्या विषयांवर अनेक वादविवादही केले. थोरपणाची गोष्ट ही कीं, ज्या लेखांबद्दल ह्या मित्रद्वयांस हा कारागृहवास सहन करावा लागला ते लेख त्यांचे नव्हते असें आमचें ऐकण्यांत आलें आहे. हें जर खरें असेल—आणि तें तसें आहे असें मानण्यास बराच सबळ पुरावाही मिळूं शकेल—तर बळवंतरावजी व कै० आगरकर ह्यांच्या मनांत वरील लेखकांसंबंधानें वसत असलेल्या लोकोत्तर मित्रभावाचें व सद्व्यवसायप्रेमाचें वर्णन करावें तितकें थोडेंच होईल. असो, ह्या संकटामुळें कै० आगरकर व चरित्रनायक ह्यांचें कांहीं कालपर्यंत फक्त शारीरिक यातना सोसाव्या लागण्यापलीकडे कांहीं एक वाईट झालें नाहीं; एवढेंच नव्हे, तर उलटपक्षीं त्यांना देशबांधवांकडून बहुमान मिळाला आणि " कालागुरुर्दहनमध्यगतः समंताल्लोकोत्तरं परिमलं प्रकटीकरोति " ह्या न्यायानें देशकार्य करण्याची त्यांची उमेद उत्तरोत्तर वाढत चालली ही एक अनुकरणीय गोष्ट होय.

असो, आतां सोसायटींतून आपला संबंध सोड-

लॉ क्लासाची सुरवात.

त्यापासूनच्या पुढील काळांत चरित्रनायकानें काय काय केलें ह्यांजकडे वळूं. खरोखर पाहिलें असतां बळवंतरावजींच्या चरित्रांतील लिहिण्यास विस्तृत व बिकट असा हाच भाग आहे. हा यथातथ्य लिहिण्याचें काम आमच्या योग्यतेच्या पलीकडील असून तो चांगल्या रीतीनें प्रसिद्ध करणें म्हटल्यास प्रस्तुत पुस्तकाचीं शेंकडों पानें व्यापून टाकील. तेव्हां आमच्या संकुचित ज्ञानानुसार मुख्य मुख्य गोष्टींचाच विचार त्यांत करणार आहों. बळवंतरावजींच्या लोकसेवारूपी नाटकाचीं एथवर नांदीच आटपून इतउत्तर नाटकाच्या प्रधानभागास सुरवात झाली असें म्हंणण्यास हरकत नाहीं. सोसायटींतून आपलें अंग काढण्यापूर्वीपासूनच मुंबईच्या न्यायाधिकारी हायकोर्टांत हायकोर्ट वकिलीची व डिस्ट्रिक्ट आणि सबार्डिनेट जज्जांच्या कोर्टांतील वकिलीची परीक्षा देणारे विद्यार्थी त्यांस योग्य त्या प्रकारचें शिक्षण देण्याचीं साधनें नसल्यामुळें परीक्षेंत व्हावे तसे यशस्वी होत नाहींत आणि कोणत्या प्रकारें अभ्यास करावा अशाबद्दल माहिती नसल्यामुळें त्यांना पुष्कळदां व्यर्थ शारीरिक व मानसिक श्रम पडून शक्तिक्षीणता येऊन हिम्मत नाहींशी होते, ह्याकरितां त्यांना शिक्षण देण्याचा एक वर्ग पुणें येथें असावा असें त्यांचें मत होतें. परंतु, एक काम हातीं घेतलें असतां त्यांस प्रत्यवाय येईल असें दुसरें काम त्याचवे-

हातांत घेणें अनिष्ट होय असें जें सर्वमान्य तत्त्व आहे त्या तत्त्वाचा बळवंतरावजींवर पूर्णपणें पगडा बसला असल्यामुळें त्यांना त्यावेळीं तसें करितां आलें नाहीं. सोसायटींतून बाहेर पडल्यावर थोड्याच महिन्यांनीं ह्मणजे इ. स. १८९१ च्या जून महिन्यांत पुणें येथें त्यांनीं लॉ क्लास ( वर निर्दिष्ट केलेल्या वकिलीची परीक्षा देणाऱ्या विद्यार्थ्यांस शिकविण्याचा वर्ग ) सुरू केला. बळवंतरावजी ज्या कामांत पडतील तें काम सर्वोत्कृष्ट रीतीनें व्हावयाचेंच असा महाराष्ट्रांत सर्वत्र समज असल्यामुळें—व हा समज असणें यथार्थ आहे—थोड्याच कालांत पुष्कळ विद्यार्थी जमले व हल्लींही क्लास भरभराटीच्या स्थितींत आहे. इ. स. १८९१ सालापासून झालेल्या लोकसेवेचें महत्त्वाचें अंग ह्मटलें ह्मणजे केसरीची एकनिष्ठपणें सेवा हें होय. आतां तिकडे वळूं.

ह्या सालापूर्वींपासूनच सुधारणादेवीचे कट्टे भक्त मलबारीशेट ह्यांनीं आमच्या इकडील सुधारक ह्मणविणाऱ्यांचें पाठबळ मिळाल्यामुळें हिंदुस्थानवासी प्रजाजनांवर " संमति बिल ( कन्सेन्ट बिल ) " रूपी घोरपड आणण्याचा यत्न थेट इंग्लंडांत जोडे फाडफाडून चालविला होता. व त्याप्रमाणें हिंदुस्थानसरकारानें त्या गोष्टीचा विचार केला आणि आपल्या नेहमींच्या दूरदृष्टीच्या वर्तनाप्रमाणें त्यांणीं ठिकठिकाणच्या स्थानिक सरकारच्या व्यवस्था पाहणारांचे व ज्ञातींतील प्रमुख लोकांचे सदरहू बाबतींत अभिप्राय मा-

गितले. अभिप्राय अर्थातच प्रतिकूळ गेल्यामुळें हिंदुस्थानसरकारानें रीतीरिवाजांत आह्मीं हात घालीत नाहीं असें इ. स. १८८६ त प्रगट केलें. परंतु दुर्दैवानें पुन्हां उचल घेतल्यामुळें इ. स. १८९० साल अखेर बील आमच्या बोडक्यावर येऊन हापटणार अशी भीति वाटूं लागली. जेथवर ह्या कायद्याचें बिल कलकत्त्यास काउन्सिलमध्यें आलेलें नव्हतें, तेथवर आह्मां भारतवर्षीयांस विशेषसें वाईट वाटलें नव्हतें; परंतु तें जेव्हां काउनसिलच्या ऐरणीवर घण खाऊं लागलें तेव्हां आमचीं धाबीं गडाडून गेलीं. आह्मांस दुर्दैवानें इतर बाबतींत स्वतंत्रता व स्वामित्व नाहीं, परंतु निदान जो तो गृहव्यवस्थेचा पूर्ण मालक आहे ही समजूत भ्रांतिमूलक भासूं लागली. ज्यांत राजाचें नफानुकसान नाहीं, ज्याच्या बऱ्या वाईट फलाचे मालक आमचे आह्मीं, ज्या आमच्या अंतर्गृहांतच घडणार, अशा बाबींसंबंधेंही सरकार आह्मांस कायद्यानें बांधून आह्मांस आमचीं धर्मशास्त्रें व अनादि कालापासून चालत असलेल्या रूढी ह्यांशीं फारखत करून घेण्यास लावणार ह्याबद्दल खेद वाटूं लागला. जिकडे तिकडे बिल नको असा एकच गिल्ला होऊन गेला. साधारणतः एकदां कायदा पसार झाला ह्मणजे त्यांत ताबडतोब बदल होणें अथवा तो अजिबात रद्द होणें ह्या दोन्ही गोष्टी सुधारलेल्या राष्ट्रांत फारच क्वचित् आढळतात. पुन्हां जे सुधारलेले प्रभु ह्मणवितात व त्याबद्दल तोरा मिरवितात त्यांच्या हातून तर अशा गोष्टी कधींच होत नाहींत

केलेल्या गोष्टींत चूक आहे अशी जरी त्यांची खात्री झाली तरी आपला बोज राखण्यासाठीं काहीं कालपर्यंत आह्मीं केलें तें बरोबर आहे असाच आग्रह धरण्यांत ते मागें पुढें पहात नाहींत. तेव्हां प्रभु कसेही असले तो तरी केलेला कायदा रद्द करणें त्यांस कठिणच जातें. असें आहे ह्मणून आपलें सरकार अमुक कायदा करीत आहे हें कळतांक्षणींच-सुदैवानें उदात्त ब्रिटिशसरकार ही बातमी आह्मा प्रजाजनांस जाहीर करतें-वेळीं अगोदरच तो मान्य नसल्यास त्यांस साधार व सप्रमाण रीतीनें कळविणें इष्ट आहे. असें करूनही जर त्यांनीं आपलें न ऐकतां आपलेंसेंच केलें तर आह्मीं हिंदुस्थानवासी लोक स्वभावसिद्धच राजनिष्ठ असल्यामुळें राजनियमाविरुद्ध चळवळ करणें हें आमचें शील नाहीं म्हणून जगदीशावर हवाला टाकून नशिबास हात लावून स्वस्थ बसतों. परंतु आमचें असें असें म्हणणें आहे हें तरी कोण कळविणार? एकएकटयाच्या अर्जानें दाद कशी लागणार ? सर्वत्र लोकांना कायद्याचें घोर स्वरूप कळून त्यांची एकवाक्यता कशी होणार ? अमुक अमुक दिशेनें जमून कार्यभाग उचलल्यास दयाळू प्रभूच्या अमलाखालीं त्यांत यश येईल हें अशिक्षित जनांस कोण समजावून सांगणार? हीं सर्व कामें वर्तमानपत्रकारांचीं होत. जे वर्तमानपत्रकर्ते नेकीनें, नेटानें, व केवळ लोककल्याणाच्या बुद्धीनें सदरीं लिहिल्याप्रमाणें आपलें वर्तन ठेवतात तेच खरे प्रजा-

संमतिबिल.

नायक. आमच्या मतें सर्व हिंदुस्थानभर अशा प्रकारचे जे तीन साडेतीन पत्रकर्ते आहेत त्यांतच प्रस्तुतच्या केसरीकर्त्यांची गणना होते. महाराष्ट्रापुरताच विचार करूं गेलों तर ह्यांचा एकट्याचाच पहिला वर्ग समजून त्यांत पहिला नंबर येतो. केसरी पत्राचें संपूर्ण चालकत्व बळवंतरावजींकडे आल्यापासून लोकमत जागृत करून देशबांधवांच्या हक्काचें, चालीरीतींचें व धर्माचें रक्षण करण्याचा महत्त्वाचे मानानें हाच पहिला प्रसंग आला. देशबांधवांच्या सेवेला अशा प्रकारें तत्पर झाल्यामुळें त्यांना पुष्कळच त्रास सोसावा लागला. परंतु त्रासाला न जुमानतां केवळ 'सत्यमेव जयते' हें तत्त्व पुढें ठेवून त्यांनीं आपला वर्तनक्रम ठेविला. कौन्सिलच्या बैठकींत बिल येऊन त्याची हकीगत कळल्या दिवसापासून विचारप्रचुर व मार्मिक असे लेख केसरी पत्रांत येऊं लागले. लोकांच्या कानींकपाळीं ओरडून त्यांना त्यांच्या हक्कांसंबंधीं माहिती करून देऊन कायदा पास झाला तर केवढा दुर्धर अनर्थ आपणांवर ओढवेल ह्याचें चित्र त्यांजपुढें मूर्तिमंत उभें केलें. ह्यामुळें साहजिक निरनिराळ्या ठिकाणीं सभा झाल्या व त्यांजकडून "बिल नको" अशाविषयींच्या विज्ञप्ती गव्हरनर जनरलांच्या कचेरींत पडल्या. "बिल पाहिजे" असें ह्मणणारांचे अर्जही गेले होते, परंतु ते फारच थोडे होते. दुर्दैवानें सरकार सर्व शक्तिमान् पडल्यामुळें लोकमताला धाब्यावर बसवून ता. १९ मार्च सन १८९१ रोजीं हा भयंकर कायदा पसार झाला.

कायदा पसार झाल्यावर आमच्या हातीं तें काय असणार ? बळवंतरावजींच्या लेखांनीं लोकांच्या मनांत नामदार पार्लमेंट सभेकडे कायदा रद्द करण्याविषयीं अर्ज करण्याचें आलें व त्याप्रमाणें त्यांनीं तो केलाही. परंतु एकाद्याच्या घरीं आपण पाहुणे गेलों व यजमानाचीच फूस असली तर त्याच्या गड्यानें आपला गुन्हा केल्याबद्दल कागाळी त्याच्याकडे नेल्यावर तो जसा कानाडोळा करतो तसाच कानाडोळा—इंग्लिश कमिटीकडून तें बिल वाजवीपेक्षां फाजील जलद रीतीनें पुढें आलें त्या गोष्टीवरूनच बिलास पार्लमेन्टाची जोरदार सम्मति होती असें म्हणण्यास हरकत नाहीं—आमच्या अर्जाकडे पार्लमेन्ट सभेनें केला.

असो, हा भाग एथेंच संपवितों. आतां, आमच्या वाचकांपैकीं कित्येकजण हा कायदा कोणता वगैरेबद्दल आह्मीं निर्देश केला नाहीं त्याबद्दल आह्मांस दोषी ठरवितील, परंतु ही अल्पसेवा बालप्रजेच्या हातीं जाण्याचाही संभव असल्यामुळें तसें करून तसल्या विषयासंबंधें कारण नसतां त्या प्रजेला माहिती देण्यास आम्ही नाखुष आहों. जे समंजस असतील व ज्यांना कायद्यांत काय काय बदल झाले हें समग्र वाचण्याची इच्छा असेल त्यांनीं हिंदुस्थानच्या अपराध्यांस शिक्षा देण्याचा ( ज्यास इंडियन पीनल कोड ह्मणतात ) जो कायदा आहे त्याच्या अगदीं नव्या अवृत्तींतील १२४ कलम अपवादासुद्धां पहावें अशी शिफारस आहे. तसेंच आज जरी आपणास अनुभवास

येत नाहीं तरी कारणप्रसंगीं हा अनर्थोत्पादक कायदा आमचें, आमच्या अब्रूचें, सारांश आमच्या सर्वस्वाचें मातेरें करण्यास कितपत व कसा कारणीभूत होईल ह्याची कल्पना पाहिजे असल्यास कानिटकरकृत संमतिबिलाचें नाटक प्रत्येक समंजस व चौकस वाचकानें वाचल्याशिवाय राहूं नये.

ह्याच सालीं, पाश्चात्य ग्रंथकार ज्या पुस्तकाच्या परिशीलनानें थक्क झाले व ज्याच्या योगानें बळवंतरावजींच्या बुद्धिमत्तेबद्दल सर्वत्र ख्याति झाली असें जें ओरिआन नामक पुस्तक त्यांनीं इ. स. १८९२ त ओरिएंटल कांग्रेसकडे पाठवून इ. स. १८९३ त छापून प्रसिद्ध केलें त्या पुस्तकाची रचना बळवंतरावजींनीं केली. सदरहू पुस्तकावरून त्यांचें गणित, ज्योतिष,

ओरिआन.

खगोल, भूगर्भ, इतक्या शास्त्रांतील व संस्कृत, भाषेंतील प्राविण्य दृष्टिगोचर होतें. साधारण शिक्षित मनुष्याला हें पुस्तक वाचून एकदम समजण्याजोगें नाहीं. ह्यांतील विषय पूर्ण समजण्यास बरीच विद्वत्ता व गूढ विचारशक्ति ह्यांचाच संयोग आवश्यक आहे. नांवाजलेले पाश्चात्य ग्रंथकार म्याक्समुल्लर व त्यांचे अनुयायी ह्यांच्या 'वेदकाल' निर्णयार्थ असणाऱ्या मतांचें सदरहू ओरिआन पुस्तकांत फारच उत्कृष्ट रीतीनें खंडन केलेलें आहे; व पुस्तकांतील विचारसरणी व प्रतिपाद्य गोष्टी पाश्चात्य विद्वानांस सर्वांशीं संमत आहेत. ह्या पुस्तकाच्या प्रकाशनानें बळवंत-

रावजींची कीर्ति संपूर्ण विद्याविभूषित व सुधारलेल्या राष्ट्रांमध्यें यावच्चंद्रदिवाकरौ राहीलच राहील. प्रथमतः ह्या पुस्तकांत साधारणतः कोणकोणत्या गोष्टी कसकशा नमूद केल्या आहेत व त्यांजपासून कसकसे सिद्धांत काढिले आहेत ह्याविषयीं थोडक्यांत चार दोन ओळी लिहिण्याचा आमचा विचार होता. परंतु, आमच्या अज्ञानामुळें योग्य त्या रीतीनें ही कामगिरी आम्हास बजावितां येणार नाहीं अशी भीति उत्पन्न झाल्यामुळें हें काम आह्मीं आपल्या एका विद्वान् मित्रावर सोंपविलें होतें. सुदैवानें केसरीची इ. स. १८९१ ची फाईल चाळतां चाळतां तींत खुद्द बळवंरावजींनीं ता.१९ मे १८९१ रोजीं सायंकाळीं हिराबागेंत ह्याच विषयावरील दिलेल्या व्याख्यानाचा गोषवारा आढळला व आह्मांस आपणावरील एक महत्त्वाची जबाबदारी कमी झाली असें पाहून अत्यानंद झाला. ह्या अत्यंत महत्त्वाच्या गोषवाऱ्याचा उतारा वाचकांचे माहितीसाठीं जशाचा तसाच देतों, तो येणेंप्रमाणें:—

"वेदाच्या कालसंबंधानें दोन मतें उपलब्ध आहेत. पहिलें हिंदुलोकांचें, ह्मणजे वेद अनादी आहेत हें होय; आणि दुसरें पाश्चात्य विद्वानांचें, म्हणजे वेद अदमासें ख्रिस्ती शकापूर्वी २००० किंवा २५०० वर्षें रचले गेले असावे असें आहे. ह्या दोन परस्परविरोधी मतांपैकीं कोणतें खरें आहे ह्याचा निर्णय करावयाचा किंवा ह्यामध्यें कांहीं तडजोड काढावयाची; हीं दोन्ही

कामें फार जोखमाचीं आहेत. वेदाचे संहिता, ब्राह्मण व सूत्रें असे तीन भाग आहेत. ह्या तिन्ही भागांच्या भाषासरणीचा विचार करतां दरएक भागाचा काल अजमासें पांच पांचशें वर्षें मिळून एकंदर वर्षें १५०० होतात. गौतमबुद्ध होण्यापूर्वीं वैदिक धर्म पूर्णतेस आला होता. गौतमबुद्धाचा काल ख्रिस्ती शकापूर्वीं साडेपांचशें सहाशें वर्षें धरला आहे. त्यांत वेदाच्या तिन्ही भागांचा काल १५०० वर्षें मिळविला म्हणजे संहितेचा काल सुमारें ख्रिस्ती शकापूर्वीं दोन हजारवर्षें निष्पन्न होतो असें पाश्चात्य विद्वानांचें म्हणणें आहे; परंतु वेदाच्या प्रत्येक भागाचा काल पांच पांचशेंच वर्षें कां धरावा, हजार वर्षें कां धरूं नये, ह्यास कांहीं सयुक्तिक प्रमाण कोणीं दिलें नाहीं; तेव्हां वेदाच्या कालनिर्णयाची रीत बऱ्याच अंशीं धरसोडीची मानावी लागते. कालनिर्णय करण्याची दुसरी रीत ज्योतिषशास्त्राच्या आधारें होय. वेदाच्या उपांगांत ज्योतिष म्हणून एक ग्रंथ आहे. त्यांत कृत्तिकेच्या आरंभीं संपात असून उत्तरायणास माघ महिन्यांत सुरवात होते असें लिहिलें आहे. ह्यावरून त्याच ग्रंथाचा काल सुमारें ख्रिस्ती शकापूर्वीं ११०० वर्षें धरला आहे, परंतु कृत्तिकेमध्यें संपात धरून नक्षत्रें मोजण्याचा प्रघात आम्हीं चिनी लोकांपासून घेतला आहे असें कांहीं लोकांचें मत आहे; ह्यामुळें व कृत्तिकेच्या अगदीं प्रारंभीं किंवा खुद्द कृत्तिकेच्या ताऱ्यावर संपात धरल्यानें ख्रिस्ती शकापूर्वीं २३०० वर्षांपासून तों ह-

जार वर्षेपर्यंत ह्या कालाची विद्वानांनीं ओढाताण के-
लेली आढळते. ह्या सर्वांस चांगलें उत्तर म्हणजे कृत्ति
केच्या पुढच्या नक्षत्रांत वासंतिक संपात(न आणखी
Equinox) असल्याबद्दल वेदांतील वचनें पुराण्यांव-
होय, व अशीं वचनें वेदांतून पुष्कळ आंपेक्षां 'वेद-
त्तरायणास माघमासीं सुरुवात होते असें कें. संपात
षांत लिहिलेलें आहे. सूत्रांतून व ब्राह्मणांतून षें लागु-
त व चैत्रांत उत्तरायणास सुरुवात होत असे अर्शं.
वाक्यें आहेत, व त्याचा उल्लेख खुद्द तैत्तिरीय संहि-
तेंतही केला आहे. ह्यावरून उत्तरायण चैत्रांतून फा-
ल्गुनांत, फाल्गुनांतून माघांत व माघांतून हल्लीं पौषांत
आलें आहे असें सिद्ध होतें. संपाताची गति उलटी आ-
हे त्यामुळें चैत्रांत उत्तरायण होत असतांना संपात
पुनवसूंत असला पाहिजे, व फाल्गुनांत उत्तरायण होत
असतांना संपात मृगांत असला पाहिजे; माघांत उत्त-
रायण होण्यास तो कृत्तिकेंत असला पाहिजे; पौषांत
उत्तरायण होण्यास अश्विनींत तो असला पाहिजे, व
हल्लीं उत्तराभाद्रपदेंत तो आहे. हा पूर्वाभाद्रपदांत गेला
म्हणजे उत्तारयण मार्गशीर्षांत येऊन ऋतु एकेक म-
हिना मागें सरतील व नक्षत्रांची सुरवातही पूर्व पद्ध-
तीस अनुसरून पूर्वाभाद्रपदांत करावी लागेल.

मृग नक्षत्रास अग्रहायण असें एक नांव आहे. त्यावरून एकदां मृगापासून नक्षत्रें मोजण्याचा प्रघात होता असें दिसतें. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांत वृषाकपीचें जें सूक्त आहे त्याचाही नीट अर्थ लाविल्यास

त्याकाळीं वासंतिक संपात मृगनक्षत्रांत होता असें सिद्ध
इंद्राची व वृत्राची लढाई होत असतां वृत्रीनें मृ-
भाषासरण। केलेल्या वृत्राचें डोकें पाण्याच्या फेसानें
अजमासें पांच रात्र ह्यांच्या संधिकाळीं कापलें अशी
होतात. गौतम आहे. पावसाचें नक्षत्र आर्द्रा सांगि-
ला होता. ग शरमा व शुनासीर ह्या देवता पाऊस आण-
डेपांचशें हीं वर्णन आहे, व त्याचें रूप कुत्र्याचें असू-
न्हें न स्वर्गद्वाराचें रक्षण करण्याकरितां हे दोन कुत्रे ठेवले आहेत असेंही मंत्रांतून सांगितलें आहे. आपल्या ज्योतिषांत ह्या कुत्र्यांचें नांव आपण विसरलों आहों; परंतु इंग्रजी ज्योतिषांतून लाटीन व ग्रीक लोकांनीं हीं नांवें सोडून दिलीं नाहींत. मृगनक्षत्रास त्यांचे भाषेंत ओरीआन ( Orion ) हें नांव आहे; व त्याचा धात्वर्थ सूर्याबरोबर उगवणारा असा आहे. ओरीआनच्यामागें जो लब्धक ह्मणून तारा आहे त्यास मोठा कुत्रा व त्याच्यावर आकाशगंगेच्या पलीकडे जो दुसरा तारा आहे त्यास लहान कुत्रा असें ह्मणतात. ह्या दोन कुत्र्यांमध्यें आकाशगंगेचा पांढरा पट्टा असून ह्याच्यावर दुधाची किंवा पाण्याच्या फेसाची कल्पना बसविणें अगदीं स्वाभाविक आहे. मृगरूप वृत्राचें डोकें ज्याप्रमाणें इंद्रानें कापलें, त्याचप्रमाणें ओरिआनाचें डोकेंही जुपिटरानें बाणानें उडविलें आहे. ह्या व दुसऱ्या अशाच वैदिक लोकांच्या व ग्रीक लोकांच्या मृगसंबंधीं ज्या कथा आहेत त्यांच्यांत जें साम्य दिसून येतें त्यावरून मृगनक्षत्रांत संपात वेदकालीं असावा व

त्यानंतर ग्रीक व वैदिक लोक निराळे झाले असें अनुमान करतां येतें. येथें व्याख्यानकारांनीं ऋग्वेदांतील आणखी कांहीं ऋचा वाचून दाखवून त्यासंबंधानें आणखी बराच पुरावा दिला, आणि अखेरीस ह्या सर्व पुराव्यांवरून निदान ख्रिस्ती शकापूर्वी ५००० वर्षांपेक्षां 'वेदकाल' कमी मानतां येत नाहीं असें सांगितलें. संपात एकेक नक्षत्र मागें हटण्यास सरासरीनें हजार वर्षें लागतात. पुनर्वसूंत संपात ख्रिस्ती शकाच्या पूर्वी सुमारें ६५०० वर्षें होता, मृगांत तो त्या पूर्वी ४५०० वर्षें होता, कृत्तिकेंत त्यापूर्वी तो २३०० वर्षें होता, अशी गणना आहे. ह्यावरून कमींतकमी मान धरलें तरी वेद प्रवृत्त होऊन आज मित्तीपर्यंत सात साडेसात हजार वर्षें झालीं असावीं असें अनुमान निघतें.

ह्या वेळीं तिथि, व संवत्सरादिकाल ह्यांची गणना करण्याचें आमच्यांत सामर्थ्य होतें; ह्यावरून तें सामर्थ्य येण्यास आणखी दोन तीन हजार वर्षें सदर काळांत गणलीं पाहिजेत. तीं मिळविलीं ह्मणजे भूगर्भशास्त्राप्रमाणें पृथ्वीवर मनुष्याची वस्ती होऊं लागल्याचा जो काल धरला आहे व ज्यास ग्लेशिअल काल (Glacial Period) ह्मणतात त्याच्या अगदीं जवळ जवळ आपण जातों. जगामध्यें ह्या कालांत प्रवृत्त असलेली एक पृथ्वीखेरीज दुसरी कोणतीच वस्तू आपले आढळण्यांत येत नाहीं. ह्यावरून वेद **अति पुरातन** असावे असें सिद्ध होतें, परंतु अगदीं **"कमींत कमी वर्षें धरलीं तरी वर निर्दिष्ट केलेलीं वर्षें धरावीं लागतात."**

ह्या पुस्तकाच्या सर्वोत्कृष्टपणाच्या सत्यतेबद्दल साक्ष देणारें एक उदाहरण आमच्या ऐकण्यांत आलें आहे. त्याचा उल्लेख करून पुढें जाऊं. प्रथमतः जेव्हां " ओरिआन " पुस्तक इंग्लंडमधील ब्लूमफील्ड नामक सुप्रसिद्ध प्रोफेसराकडे गेलें, तेव्हां तें पुस्तक हिंदुस्थानांतील एका मनुष्यानें लिहिलेलें आहे ह्मणून त्यांत कांहीं राम नसेल अशा समजुतीनें त्या विद्वानानें ह्या पुस्तची योजना फुरसुतीच्या वेळीं वाचावयाच्या पुस्तकांत करून तशासाठीं तें एका बाजूला ठेविलें; व एके दिवशीं फुरसुतीअंतीं तें हातीं घेतलें. विषयरचना हृदयंगम असल्यामुळें व विषय सखोल विचारांनीं परिप्लुत असल्या कारणानें आणि वाचक मार्मिक व गुणग्राही मिळाल्यामुळें पुस्तक वाचनांत तो प्रोफेसर गुंग होऊन गेला व त्याच्यानें तें पुस्तक खालीं ठेववेना. असें झाल्यामुळें त्याच्या नेहमींच्या कार्यक्रमांतील वर्षानुवर्षें चालविलेल्या कडकडीत वक्तशीरपणाचा सुद्धां त्या दिवशीं भंग झाला व त्यानें शेवटीं पुस्तकाबद्दल आपला सर्वोत्कृष्ट अभिप्राय मोठ्या औत्सुक्यानें व संतोषानें दिला; व त्यांतच वरील स्थितीचें दिग्दर्शन केलें. विद्वान प्रोफेसर जॉली यांच्यानेंही सदर पुस्तकाची तारीफ केल्याशिवाय राहवेना.

ओरिआनसंबंधीं नामांकित विद्वानाचें मत.

आपल्या ब्रीदाला अनुसरूनच इ. स. १८९२ सालांत ठाणें, कुलाबा जिल्ह्यांतील गरीब बिचाऱ्या वारली, कोळी व कात-

मोहाच्या फुलांचा कायदा.

करी लोकांच्या हिताकरितां खऱ्या खऱ्या माहितीसह व प्रमाणसिद्ध रीतीनें मोहाच्या फुलांच्या कायद्यासंबंधानें आपले प्रतिकूल विचार बळवंतरावजींनीं प्रसिद्ध केले. हा कायदा कशा प्रकारचा होता व तो कोणत्या कोटीक्रमानें व कशा मिषानें झाला व त्यापासून कोळी, वारली, कातकरी लोकांच्या जीवनसाधनांपैकीं किती नाहींशीं झालीं त्याबद्दल हकिकत नमूद करूं लागल्यास विस्तार होईल, सबब सुज्ञ वाचकांस ती माहिती प्रस्तुत स्थलीं देतां येत नाहीं. त्यांनीं इ. स. १८९२ वर्ष १२ पैकीं केसरीचे १६–१९–२७ हे अंक पहावे अशी आमची त्यांना विनयपूर्वक विनंति आहे.

आपटे यांचा मृत्यु.

ह्याच सालीं चरित्रनायकांच्या मनाला दुःख उत्पन्न करणारा असा एक प्रसंग उद्भवला. तो प्रसंग ह्मटला ह्मणजे कै० प्रि. आपटे ह्यांचा अकालिक मृत्यु होय. बळवंतरावजींकडे केसरी पत्राचें चालकत्व असल्यामुळें त्यांच्या मनाला दुःख देणारा असा कै० आपट्यांचा मृत्युलेख लिहिण्याचा दुःखद प्रसंग त्यांजवरच पडला; परंतु आलेल्या प्रसंगाला गट्ट करून त्यांनीं तो लिहिला. ह्या मृत्युलेखाच्या परिशीलनानें कोणाच्याही मनांत बळवंतरावजींच्या न्यायी, उदात्त, गुणग्राही व प्रेमळ वृत्तीबद्दल थोरवी उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहीं. ( वर्ष १२ केसरी अंक ३३ पहा. )

चालू सालच्या सेपटेम्बर महिन्यांत ( दुसऱ्या ) औ-

द्योगिक परिषदेंत बळवंतरावजींनीं ज्ञातिसंबंधाचा निबंध वाचिला. सदरहू निबंध अत्यंत महत्त्वाच्या व व्यापक गोष्टींनीं भरलेला असल्यामुळें इ. स. १८९२ च्या केसरीच्या ३७ व्या अंकांत त्याचा सारांश ज्या शब्दांनीं निर्दिष्ट केलेला आहे त्याच शब्दांनीं तो आह्मी आपल्या वाचकांपुढें मांडीत आहों.

ज्ञातिसंबंधाचा निबंध.

"आमच्या उद्योगधंद्याची कोणत्या रीतीनें सुधारणा होईल ह्याचा विचार करण्यासाठीं आपण येथें जमलों आहों, तेव्हां औद्योगिक दृष्टीनेंच ह्या विषयाचा आपणांस विचार केला पाहिजे. ज्ञातीचें बंधन निरनिराळ्या प्रकारचें आहे, व धर्मदृष्ट्या उच्चनीच वगैरे वर्णभेद असावे किंवा नाहीं याबद्दल विद्वान लोकांत बरेच तंटे आहेत; परंतु त्याचा आपल्या विषयाशीं कोणत्याही तऱ्हेनें संबंध पोंचत नाहीं. जाति धर्मदृष्ट्या कशीही असो, परंतु एका धंद्याचे अगर एका स्थितींतील लोकांस जुटीनें कोणचीही गोष्ट करणें असल्यास जातीसारखें दुसरें कोणतेंही साधन सध्यां आपल्यास उपलब्ध नाहीं. हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाकडे जर जरा लक्ष दिलें तर वर्णव्यवस्था कशी उत्पन्न झाली व तिच्यापासून आपणांस आजपर्यंत काय काय फायदे झाले हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. या विषयावर ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून चांगला विचार केला आहे त्या इंग्रज व नेटिव विचारी गृहस्थांचें मत असें आहे कीं आज हजारों वर्षें नाना-

तऱ्हेचीं संकटें व राज्यक्रांति ह्यांतून निभावून पार पड-ण्यास आमचें ज्ञातिबंधन हेंच आह्मांस मुख्यत्वेंकरून कारणीभूत झालें. आर्य लोक प्रथमतः ज्यावेळीं हिंदुस्थानांत आले, त्यावेळीं त्यांच्या जातींत द्वेष असता, तर त्यांस हिंदुस्थान देश काबीजच करतां आला नसता. ऋग्वेदांत जीं कांहीं जुनीं सूक्तें आहेत त्यांत आर्य व दास हाच एक भेद प्रथमतः नजरेस येतो. अमेरिकेंत सांप्रत हाच प्रकार चालू आहे; व एकंदरींत जिंकणारे व जिंकलेले ह्यांत--त्यांतूनही ते जेव्हां काळे, गोरे ह्याप्रमाणें भिन्न वर्णाचे असतील तेव्हां त्यांच्यांत--प्रेमभावरहस्य अगर एकी कधींही उत्पन्न होत नाहीं असें दिसतें. आपल्याकडे अगदीं कनिष्ठ प्रतीच्या ज्या ज्ञाती आहेत त्या उत्पन्न होण्यास काळे, गोरे हाच भेद पहिल्यानें कारण झाला असावा. परंतु खुद्द आर्य लोकांच्या ज्या ज्ञाती आहेत त्या भगवद्गीतेंत ह्मटल्याप्रमाणें गुणकर्मविभागशःच उत्पन्न झाल्या असें मानलें पाहिजे. उच्चनीचत्वाचा भेद त्यांत शिरला असल्यास तो मागाहूनचा आहे. स्मृतिग्रंथांतून पुरातनकाळीं ब्राह्मण क्षत्रिय, वैश्यांचे अन्नव्यवहार व बेटीव्यवहार चालत असत अशा अर्थाचीं पुष्कळ वाक्यें आहेत. कदाचित् बेटीव्यवहार नव्हता असें जरी मानलें तरी तेवढ्यानेंच ब्राह्मण क्षत्रियांस अगर क्षत्रिय वैश्यांस नीच मानीत असत असें मानण्यास कांहीं एक आधार नाहीं. ब्राह्मणाब्राह्मणांतच कित्येक ठिकाणीं बेटीव्यवहार होत नाहीं, परंतु त्यामुळेंच तेलंगी ब्राह्मण को-

कणस्थ ब्राह्मणांपेक्षां नीच असें कोणी समजत नाहीं. सारांश एक अतिशूद्र खेरीज करून जे हिंदुलोकांत जातिभेद आढळतात ते सर्व भिन्न भिन्न उद्योगधंद्यांमुळेंच झालेले आहेत.

आतां या जातिभेदामुळें आपला आजपर्यंत कसा बचाव झाला आहे हें लक्षांत आणा. पुरातनकालीं व्यापारधंद्यांतील, गांवांतील अगर शहरांतील आणि सामान्यतः प्रत्येक ज्ञातींतील सर्व व्यवस्था ज्ञातीमार्फतच चालत असे. ज्ञातींतील कोणी मनुष्य दारूबाज अगर बदफैली निघाला, तर त्यास ज्ञातीकडून ताबडतोब योग्य शिक्षा होई. आपलेकडील मजूर लोक यूरोपांतील अगर इंग्लंडांतील मजुरांपेक्षां दारू आणि स्त्रिया ह्या दोन बाबतींत अधिक नीतिमान आहेत असें मि. ईलिअट साहेबांनीं आपल्या जातीवरील निबंधांत लिहिलें आहे. ज्या ज्ञातिबंधनांचा अशा रीतीनें उपयोग होतो तीं बंधनें जितकीं दृढ होतील तितकीं चांगलींच. आजपर्यंत वर्तमानपत्रें, पुस्तकें वगैरे विद्याप्रसाराचीं हल्लीं असलेलीं साधनें उपलब्ध नसतांही हिंदु लोकांनीं आपले पूर्वार्जित धंदे व विद्या कायम ठेविल्या ह्याचेंही ज्ञाति हेंच कारण; व हींच बंधनें देशकालानुरूप त्यांत सुधारणा करून कायम केलीं तर हल्लींच्या उद्योगधंद्यांस आलेल्या विपन्न अवस्थेंतून पार पडण्यास त्यांचें आपणास मोठें साहाय्य होईल. अध्यक्षांनीं आपल्या भाषणांत सांगिल्याप्रमाणें आमच्या देशावर व विशेषत आमच्या मजुरांवर व कारागिरांवर हल्लीं मोठाच प्रसंग

आला आहे, व कदाचित् इतर राष्ट्रांबरोबर सामना करण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें ते धंदे व त्यांतील मंडळी कदाचित् अजीबात नाहींशी होईल अशी भीति आहे. अशा प्रसंगीं जुटीनें कांहीं प्रयत्न करणें असल्यास ज्ञातिव्यवस्थेसारखाच किंबहुना ज्ञातिव्यवस्थेचाच आपणांस उपयोग करून घेतला पाहिजे. याच व्यवस्थेनें आपण आजपर्यंत निभावलों व पुढेंही यानेंच आपला निभाव लागेल.

यूरोपांत अगर इंग्लंडांत उद्योगधंद्यानें उपजीविका करणाऱ्या लोकांवर जेव्हां असले प्रसंग आले अगर येतात तेव्हां ते ह्या किंवा असल्याच उपयांची योजना करीत असतात. यूरोपांत ज्ञाती नाहींत, परंतु प्रत्येक धंद्यांतील लोकांच्या निरनिराळ्या आणि स्वतंत्र मोठमोठ्या मंडळ्या, संस्था अगर संप आहेत. त्यांस ट्रेड गिल्ड( Trade Gild ) अगर ट्रेड यूनिअन ( Trade Union ) असें ह्मणतात. या संस्था कशा उत्पन्न झाल्या याचा इतिहास पाहतां असें दिसून येतें कीं, यूरोपांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार होण्यापूर्वीं जर्मन लोकांत आमच्या वैदिक धर्माप्रमाणें यज्ञयागादि कर्में चालत असत, व त्याकरितां सर्व लोक एके ठिकाणीं जमत. यापासूनच पुढें ज्ञातींच्या सभा अगर मंडळ्या निघाल्या आणि ख्रिस्ती धर्माचा प्रसार झाल्यानंतर त्यांचें पूर्वीचें धर्मस्वरूप नाहींसें होऊन मजुरांचे संप, कोष्ट्यांची मंडळी अगर कारागिरांची संस्था अशीं त्यांचीं रूपांतरें झालीं. जर्मन लोक हे आर्य लोकांची-

च एक शाखा आहे असें अलीकडील शोधावरून सिद्ध झालें आहे. तेव्हां जर्मन लोकांतील जुन्या संस्था आर्य लोकांतील जुन्या संस्थेपासूनच निघाल्या असाव्या असें मानण्यास हरकत नाहीं; व हें जर खरें असेल तर आमच्याकडील ज्ञाति आणि यूरोप किंवा इंग्लंड वगैरे ठिकाणीं हल्लीं प्रचारांत असलेल्या कारागिरांच्या अगर मजुरांच्या संस्था यांचें मूळ एकच असावें असें अनुमान होतें, व त्यावरून आमच्या ज्ञातीस आतां कोणचें वळण दिलें पाहिजे याचाही इतिहासाच्या आधारावरून निकाल लावितां येतो. ज्ञातीच्या व्यवस्थेंत हल्लीं अगदींच दोष नाहीं असें नाहीं; परंतु सदर व्यवस्थेस पुढें अमक्या तऱ्हेचें वळण द्यावयाचें असें ठरलें आणि त्यापासून होणारे फायदे लोकांच्या नजरेस येऊं लागले म्हणजे त्यांतील दोष उत्तरोत्तर कमी होत जाऊन चांगला व उपयुक्त असेल तेवढाच भाग शिल्लक राहील; परंतु ह्या सर्व गोष्टी दमानें होणाऱ्या आहेत. ज्ञाति म्हणजे सर्व पोरकट व मूर्खपणाचा प्रकार आहे असा आग्रह धरल्यानें या सुधारणा होण्यासारख्या नाहींत.

उद्योगधंद्याच्या दृष्टीनें ज्ञातीची सुधारणा व पुनरुज्जीवन करण्याचें मनांत आणलें ह्मणजे या कामीं आपणांस सरकारचें थोडेंबहुत साहाय्य घेतलें पाहिजे. ज्ञातीचीं बंधनें अमलांत आणण्यासाठीं सरकारच्या कायद्यानें कोणास तरी अधिकार असला पाहिजे. सरकारानें ज्ञातींत हात घालूं नये असें जें ह्मणणें आहे तें मला

पूर्णपणें मान्य आहे; पण ज्ञातीनें केलेले नियम अमलांत आणण्याचें जर सरकार नाकारील तर त्याचा परिणाम ज्ञातींत हात घालण्यासारखाच आहे. या विषयावर बरेंच बोलावें लागेल, परंतु मी तें सध्यांच सांगत नाहीं. इंग्लडांत ज्याप्रमाणें मजुरांच्या अगर कारागिरांच्या मंडळ्यांनीं केलेल्या नियमांचा अम्मल प्रत्येक मजुरावर आणि कारागिरावर कायद्यानें करितां येतो, त्याचप्रमाणें इकडेही पुढें मागें ज्ञातीसंबंधानें कायदा करून घेतला पाहिजे. परंतु ही पुढील व्यवस्था आहे. आज ज्ञातीस अशा तऱ्हेचें वळण द्यावें कीं नाहीं हा प्रश्न आहे व उद्योगधंद्यांच्या व धंदेशिक्षणाच्या वगैरे बाबतींत ज्ञातीची सुधारणा होऊन त्या संस्था कायम राहण्याची ह्या सभेनें व्यवस्था करावी अशी माझी सूचना आहे."

ज्यूरीप्रकरण.

"श्रुताध्ययनसंपन्ना धर्मज्ञाः सत्यवादिनः। राज्ञा सभासदः कार्या रिपौ मित्रे च ये समाः॥" या याज्ञवल्क्यवचनावरून जी 'ज्यूरीची पद्धति' आमच्या देशांत—जरी सांप्रतच्या स्वरूपाहून किंचित् भिन्न प्रकारानें—प्राचीन कालापासून न्याय देण्याच्या कामीं अमलांत होती, जी सुधारलेल्या राष्ट्रांनींही अविश्रांत श्रम करून संपादन केली व इ. स. १८६२ सालीं इंग्रज सरकारानें आमच्याकडे आपल्या कारकिर्दीत प्रथमतः फौजदारी काम चालविण्याच्या कायद्यानें सुरू केली त्या ज्यूरीच्या पद्धतीवर गदा आणण्या-

चा विचार जेव्हां बड्या बड्या लाट साहेबांनीं चालू केला व आपले मनोदय सफल होण्यासाठीं श्रम चालविले, त्यावेळीं बळवंतरावजींना आपल्या नेहमींच्या कार्यदक्षतेनुरूप वागण्यानें देशबांधवांसाठीं आह्मांपैकींच एका सन्माननीय थोर गृहस्थाचें मन दुखविण्याची पाळी आली.* परंतु त्यांनीं हातीं घेतलेल्या कार्याचें महत्त्व मनांत आणून आपल्या नेहमींच्या बाणेदार वर्तनाला अनुसरूनच त्यावेळींही मागें पुढें पाहिलें नाहीं. " ज्यूरी पद्धत, " आह्मांस काय किंवा कोणत्याही देशांतील लोकांस काय, न्यायाचे कामीं अत्यंत आवश्यक आहे. अधिकारी वर्गाची इच्छाच ही नष्ट करावी अशी असल्यामुळें ज्याप्रमाणें कांवीळ झालेल्या मनुष्याला सर्व वस्तूंच्याठायीं पीतवर्णाचा भास होतो त्याप्रमाणें त्याला सदरहू पद्धत कुचकामाची व गैरवाजवी आहे असें दाखविणें भाग पडलें; व त्याप्रमाणें सदरहू बाबतींतील खलित्यांत " भ्रमोत्पादक, निराधार व निर्मूल " मुद्यांचा संचय करण्यास त्याला कठिण पडलें नाहीं. सरकारी अधिकाऱ्यांच्या खलित्यांत 'ज्यूरी पद्धति' विरुद्ध ह्मणून नमूद केलेल्या गोष्टींच्या स्वरूपाची बळवंतरावजींनीं आपल्या लेखांत चांगलाच परि-

* सदरहू बाबीसंबंधानें वाचकांनीं ता० १० जानेवारी सन १८९३ रोजचा " केसरी " चा अंक पाहावा. व त्यांत " कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ " ह्या मथाळ्याखालील लेख वाचावा अशी आग्रहपूर्वक विनंति आहे.

स्फोट केला व सुदैवानें आह्मांस "ज्यूरी प्रकरणांत' अपयश आलें नाहीं.

मुंबईचा दगा.

इंग्रेज बहादुरांच्या हातांत आमच्या या सुवर्णभूमीचीं राज्यसूत्रें सार्वभौमत्वाच्या नात्यानें जाण्यापूर्वींच्या काळांत आह्मीं हिंदु व आह्मीं मुसलमान हा भेदाभेद त्या त्या वर्णांच्या ठायीं अभिमानपूर्वक वसत होता, व त्याप्रमाणें उभयपक्षांकडून वर्तनही होत असे; परंतु जेव्हां आह्मी उभयतां एकाच मायबाप सरकारची प्रजा झालों तेव्हां आह्मांमधील भिन्नभाव हळू हळू नष्ट होत चालला व प्रजाबंधूंच्या नात्यानें आह्मीं एकदिलानें वागूं लागलों. आह्मांमधील पुढारी सामाजिक, राजकीय चळवळींत एके ठिकाणीं मिसळूं लागून आपलीं कर्तव्यकर्में बजावूं लागले आहेत असें आह्मीं मूढजनांनीं पाहिल्यावर अर्थातच आह्मांमधील आढी नाहींशी झाली. परंतु दैव हात धुऊन आमच्या पाठीस लागल्यामुळें इ. स. १८९३ सालीं आह्मा हिंदु व मुसलमानभाईमध्यें आपसांस उभयपक्षांचे थोड्याबहुत नुकसानास कारण होणारी मारामारी झाली. ह्या मारामारीचा परिणाम राष्ट्रीय दृष्टया काडीमात्र वाईट झाला नाहीं ही एक आनदांची गोष्ट होय. जुनागड संस्थानांत प्रभासपाटण येथें मोहरमांत हिंदु व मुसलमान ह्या उभयतांत भयंकर दंगा होऊन हिंदुलोकांचा त्यांत फारच छळ झाला ही गोष्ट सर्वांस विश्रुत आहेच. प्रभासपाटणच्या दंग्यात हिंदूंचे हाल झाले तेव्हां त्यांना मदत करण्याचे

इराद्यानें मुंबईंत हिंदुलोकांची एक सभा झाली. सभेचा उद्देश नसताच गृहित धरला गेल्यामुळें व मुसलमानभाई जातीनें कडवे पडल्यामुळें त्यांजकडून ता. ११ आगस्ट रोजीं दंग्यास सुरवात झाली व जवळ जवळ एक आठवडापर्यंत उभयपक्षांच्या लहान मोठ्या झटापटी झाल्या. सरकारच्या अधिकाऱ्यांनीं उभय पक्षांकडील लोक अटकेंत ठेविले. व सुमारें दोन महिनेपर्यंत हे खटले चालले होते. ह्यावेळीं चरित्रनायकांच्या स्पष्टवक्तेपणाची व आम्हा हिंदुजनांसंबंधी असलेल्या कळकळीची खरी खरी कसोटी लागली. "केसरी" च्या एकनिष्ठ देशसेवेची कल्पना अगदीं अशिक्षितापर्यंत जाऊन ठेपली. बळवंतरावजींनीं सदर बाबतींत आम्हां हिंदूंच्या तर्फे इतके कांहीं श्रम घेतले कीं त्याची फेड करणें आमच्या शक्तिपलीकडील आहे. त्यांच्या कित्येक मित्रांना तर ह्यावेळीं कोल्हापूरप्रकरणासारखा कांहीं वेडा वांकडा प्रसंग येतो कीं काय, अशी भीति वाटूं लागली. सरकारी अधिकारी त्यांचे लेख डोळ्यांत तेल घालून पाहूं लागले; परंतु त्यांनीं आपला बाणा सोडिला नाहीं.

गणपतीचे मेळे व पुण्याचा दंगा.

मुंबईस दंगा झाला तेव्हांपासून हिंदूंच्या मनांत मुसलमानभाईंच्या मोहरमाच्या सणांत जाऊन त्यांजबरोबर गळ्यांत फकीरी अडकवून आनंद मानण्यापेक्षां त्याच तोडीचा व तितक्याच उत्सवाचा एकादा सण आपणांमध्यें करून त्यामध्यें आपण आनं-

द मानून राहणें बरें असें झालें व त्याप्रमाणें त्यांणीं गणपत्युत्सव करण्याचें योजिलें. हा गणपत्युत्सव, त्यास चरित्रनायकांच्या लेखनपटुत्वाचें आनुकूल्य मिळालें म्हणूनच आम्हांत बळावला व ह्यापासून पुष्कळ फायदे होण्याचा संभव आहे. समाजाच्या उत्कर्षास अत्यंत आवश्यक अशा संघशक्तीच्या कित्त्याचा गणपत्युत्सव हा सांप्रतच्या स्थितींत श्रीगच आहे असें म्हणण्यास बिलकूल हरकत नाहीं. कित्येक सुशिक्षित मनुष्यांना ह्या उत्सवाची टर घालणें हें भूषणास्पद वाटल्यामुळें त्यांनीं आपल्या कोत्या अगर दूरदृष्ट्यनुसार—हें सुज्ञ वाचकांनींच ठरवावें—हा उत्सव मोडून टाकण्याचा आपल्याकडून होईल तेवढा यत्न केला; परंतु आमच्या सुदैवानें त्यांचे ते यत्न फलद्रूप झाले नाहींत. गणपत्युत्सव प्रथमतः सुरू झाला त्याच उत्सवांतील दिवसांत हिंदु व मुसलमानांचा पुण्यास दंगा झाला. ह्या दंग्याचें स्वरूप मुंबईच्या दंग्याच्या स्वरूपाइतकें भयंकर नव्हतें. परंतु उत्सवाचें प्रथमच साल असल्या कारणानें एवढ्याशा दंगलीनेंही आम्हीं सुरू केलेला उत्सव बंद पडण्याची भीति वाटूं लागली; मोरयाच्या कृपेनें आमची ती भीति दूर झाली व सर्व गोष्टींचा परिणाम चांगला झाला. ह्या दंग्याच्या वेळींही आम्हां हिंदुजनांच्या पक्षाच्या समर्थनार्थ बळवंतरावजींना फार श्रम घ्यावे लागले.

“ ज्या लोकांस पूर्वकाल नाहीं त्यास उत्तरकाल कोणता ? ” अशी एक म्हण आहे. ह्या ह्मणीची स-

त्यता हरएक विचारी मनुष्यास पटल्याशिवाय रहात नाहीं. पूर्वी आपण कसें होतों हें समजलें व पूर्वीच्या स्थितींत व सांप्रतच्या स्थितींत कोणते इष्ट अगर अनिष्ट बदल झाले आहेत, हें ध्यानीं आलें तरच मनुष्यमात्र अवनतींतून उन्नतीच्या स्थितीप्रत पोहोंचतो. पूर्वी आपण कसें होतों हें समजण्यास त्या कालांतील वस्तुस्थिति डोळ्यांसमोर आणणें अथवा असणें ह्यासारखें दुसरें उत्तम असें साधनच नाहीं. बळवंतरावजींच्या कंठशोषानें ह्या वर्गांतील एक साधन आम्हांस उपलब्ध झालें आहे. हें साधन म्हटलें म्हणजे सालोसाल शिवछत्रपतींच्या जन्मदिवसानिमित्त रायगड किल्ल्यावर भरणारी यात्रा हें होय. महाराजांच्या समाधीच्या जीर्णोद्धारार्थ ह्यांच्या लेखामुळें हरएक हिंदुधर्माभिमान्यानें आपल्या शक्त्यनुसार पैपासून तों हजारों रुपयांपर्यंत मदत केली आहे. ह्या उत्सवांत राष्ट्रीयत्व व स्वधर्मनिष्ठा ह्या दोन उन्नत तत्त्वांचें सम्मीलन झालें आहे. व हें सम्मीलन कालेंकरून आमच्या अभ्युदयास बऱ्याच अंशानें कारणीभूत झाल्याशिवाय राहणार नाहीं.

शिवछत्रपतींच्या समाधीचा जिर्णोद्धार.

कायदे कौन्सिल म्हणजे सरकारानें योजलेल्या हरएक कायद्याचा उहापोह करून त्या संबधें अनुकूल अगर प्रतिकूल अभिप्राय देणारें सभासदांचें मंडल होय. ह्या मंडळीकडे अतिशय जबाबदारीचें काम असतें, अर्थात ह्यांतील माणसें विद्वान, अनुभवी, स्वतंत्रविचाराचीं व दूरदर्शी असावीं लागतात. अगदीं परवांपर्यंत ह्या मंड-

कौंसिलमध्यें सरकारचे बडे बडे अधिकारी व इतर सरकारच्या कृपेंतलीं बडीं माणसें ह्यांचाच प्रवेश होत असे. ह्या संस्थेंतील सभासदत्व मानार्ह असल्यामुळें सरकारच्या मेहरबानीखातर तें ज्यांस प्राप्त होई, त्यांचा कल स्वाभाविकच सरकारची मेहेरनजर कायम ठेवण्याकडे असे; व यामुळें कायदे कौन्सिलपुढें येणाऱ्या हरएक प्रश्नाचा केवळ एकतर्फी विचार होत असे. सरकार जे कायदे करणार त्यापासून प्रजेचें हित अगर अहित किती होणार याबद्दल स्वतंत्र व निर्भीड अशा रीतीनें विचार सरकारच्या मिंध्या कौन्सिलरांच्या सभेंत क्वचितच होत असे. प्रजेच्या हितसंबंधाचा विचार जेथें होणार तेथें लोकनियुक्त सभासदांचा भरणा असल्याशिवाय प्रजेची बाजू समर्पकरीतीनें सरकारापुढें मांडली जात नाहीं ह्या करितां कायदेकौन्सिलमध्यें तशा सभासदांची नेमणूक व्हावी अशाबद्दल राष्ट्रीय सभेनें आज कित्येक वर्षेपर्यंत सारखे प्रयत्न चालविले होते. राष्ट्रीय सभेच्या ह्या अत्यंत महत्त्वाच्या मागणीकडे आमच्या सुधारलेल्या प्रभूंचें—थोडा उशीरां कां होइना—लक्ष पोंचून आम्हांस अशातऱ्हेनें नियमित सभासद निवडून देण्याचा हक्क प्राप्त झाला. दुर्दैवानें मुंबई इलाख्याच्या मध्यभागास ह्या हक्काचा उपभोग थोड्या उशीरां मिळाला व त्याप्रमाणें इ. स. १८९५ सालीं चरित्रनायक ना० बाळ गंगाधर टिळक हे मध्यभागाच्या तर्फेनें लोकनियुक्त सभासद निवडले गेले.

कायदे कौन्सिलांतील नेमणूक.

कौन्सिलर निवडून आल्यानंतर सरकारानें त्यांची निवडणूक मंजूर करूं नये अशाबद्दलही कित्येक दुराग्रही व विघ्नसंतोषी लोकांनीं खटपट करण्यास कमी केलें नाहीं; परंतु त्यांच्या त्या खटपटीचा अरण्यरुदनवत् प्रकार होऊन मुंबईसरकारानें त्यांची नेमणूक पसंत केली. कौन्सिलर झाल्यापासून अनेक बैठकींत वेगवेगळ्या विषयांवर त्यांनीं आपले विचार भीडमुरवत न धरितां मुद्देसुद व सप्रमाणरीतीनें सरकारपुढें मांडण्यास अद्यापपर्यंत कसूर केली नाहीं व पुढेंही त्यांच्या हातून होणार नाहीं. जोंपर्यंत लोकनियुक्त सभासदांच्या संख्येचें प्रमाण सरकारनें नेमलेल्या सभासदांच्या संख्येच्या प्रमाणाहून कमी आहे तोंपर्यंत चरित्रनायकांसारख्या निर्भीड सभासदांच्या विचारांचा सरकारच्या वर्तनावर परिणाम दिसून येण्याची आशा नकोच; तथापि असें असूनही त्यांजकडून लोकपक्षाचें यथार्थ मंडन मोठ्या उत्साहानें, मार्मिकरीतीनें व गंभीरपणानें नेहमीं केलें जातें. बळवंतरावजींची कौन्सिलांत नेमणूक झाल्यावर तिच्या अभिनंदनार्थ म्हणून त्यांना निरनिराळ्या संस्थांनीं मानपत्रें दिलीं व पानसुपाऱ्या केल्या. कौन्सिलांत "बजेटावर" जो वादविवाद त्यांनीं केला आहे तो त्यांच्या विद्वत्तेबद्दल व विचारप्रचुरत्वाबद्दल साक्ष देत आहे; सबब वाचकांनीं तो एकवेळ वाचण्याची तसदी घ्यावी.

इ. स. १८९९ सालीं बळवंतरावजींच्या मनाला

आगरकरांचें परलोकगमन.

धक्का पोंचेल अशा प्रकारचा एक दुःखद प्रसंग त्यांजवर ओढवला. हा प्रसंग ह्मटला ह्मणजे ज्यांनीं व बळवंतरावजींनीं दृढनिश्चयानें कांहीं विशिष्ट लोकोपयोगी कार्यें सिद्धीस नेण्याकरितां एक दिलानें घरीं, दारीं, किंबहुना कारागृहीं बेत व उद्योग केले, त्या थोर कै. आगरकरांचा परलोकवास हा होय. साधारण परिचिताचा परलोकवास किंचित् तरी दुःख उत्पन्न केल्याशिवाय रहात नाहीं, तर सन्मित्राचा अक्षयींचा वियोग असह्य असें दुःख दिल्याशिवाय राहील काय? आमच्या मतें पित्याच्या निधनासंबंधें बळवंतरावजींस जें दुःख वाटलें असेल तितकेंच दुःख कै. आगरकरांच्या मृत्यूसंबंधें वाटल्याशिवाय राहिलें नसेल.

पुण्याची कांग्रेस.

कोणत्याही महत्त्वाच्या चळवळीचा उद्भव महाराष्ट्राची ऐतिहासिक राजधानी पुणें येथें होत असतो, असा पुष्कळ वेळां प्रत्यय येतो. त्याप्रमाणें राष्ट्रीयसभेस चिकटलेल्या सामाजिक परिषदेपासून तिला मोकळें करण्याचें श्रेयही पुणेंकरांनींच घेतलें. राष्ट्रीयसभेच्या बैठकीस आरंभ झाल्यावर ह्या सर्वमान्य संस्थेच्या मंडपांत सामाजिक सुधारणेच्या मार्गांचा उहापोह उरकून घ्यावा असा सुधारणाभक्त मंडळीचा उपक्रम सुरू झाला व त्याप्रमाणें इ० स० १८९४ च्या कांग्रेसपर्यंत हा क्रम चालला होता. राष्ट्रीयसभेप्रमाणें ही परिषद सर्वांस सारखी मान्य नाहीं, म्हणून राष्ट्री-

यसभेच्या मंडपात परिषद भरल्यामुळें तिला नसतें महत्त्व येऊन राष्ट्रीयसभेबद्दल सामाजिक परिषदेस प्रतिकूळ असणाऱ्यांची पूज्यबुद्धि नष्ट होण्याचा संभव आहे सबब त्या दोन्हीही सभांची बैठक एका मंडपांत होऊं नये, अशाबद्दल राष्ट्रीयसभेचे अध्यक्ष व इतर प्रमुख मंडळी यांनीं वेळोवेळीं स्पष्ट अभिप्राय दिलेले आहेत. राष्ट्रीयसभेच्या मंडपांत परिषद भरल्यानें आपल्या परिषदेस वर्चस्व येतें सबब ती तेथेंच भरविण्याबद्दल सुधारणाभक्तांनीं आपल्याकडून शिकस्त केली; परंतु बळवंतरावजींनीं ह्या महत्त्वाच्या प्रश्नासंबंधें वेळींच योग्य चळवळ करून प्रतिपक्षाकडून झालेल्या तापाकडे लक्ष न देतां महाराष्ट्रीयांचें सामाजिक परिषदेस प्रतिकूळ असें बहुमत प्रमुख राष्ट्रीय भक्तांपुढें मांडल्यामुळें व ह्या दोन्ही सभा एकाच मंडपांत भरल्या तर विलक्षण बखेडा उत्पन्न होईल अशी त्यांची खात्री करून दिल्या कारणानें एकीस दुसरीपासून वेगळें काढण्याची तजवीज झाली. ह्या कामांत बळवंतरावजींना बरेच श्रम करावे लागले. प्रतिपक्षाच्या निराधार वाक्प्रहाराच्या खंडनार्थ लेखणीला व वाचेला बरेंच शिणवावें लागलें, सुधारणावाल्यांचे निरर्गल प्रलाप व कुटाळकी यांचा भडिमार सोसावा लागला; परंतु तितक्या सगळ्यांस दाद न देतां केवळ राष्ट्रीय हिताकडे लक्ष देऊन राष्ट्रीयसभेचे आपण कट्टे भक्त आहों हें त्यांनीं सर्व लोकांच्या प्रत्ययास आणून दिलें. प्रतिपक्ष कितीही निंदो, खरा मार्ग सोडावयचा नाहीं,

हा त्यांचा बाणा या प्रसंगाइतका इतर थोड्याच प्रसंगीं दिसून आला असेल. पुणें येथील राष्ट्रीयसभेच्या बैठकीच्या व्यवस्थेचीं सूत्रें सुधारणावाल्यांचे हातांत गेल्यापासून खर्चाचे पैसे जमा होण्याचें बंद पडत चाललें होतें व यावेळीं जर बळवंतरावजींनीं केवळ राष्ट्रीयसभेकरितां म्हणून अश्रांत परिश्रम केले नसते तर सभेच्या बैठकीचा योग पुण्यास आला असता किंवा नाहीं ह्याचा वानवाच आहे. यावेळीं या दोन सभांबद्दल भांडणें सुरू होऊन बळवंतरावजींस कांग्रेस कमिटीचे सेक्रेटरीपणाचा राजीनामा देणें विचाराचें वाटल्यावरून त्यांनीं तसेंही केलें. तथापि राष्ट्रीयसभेसंबंधानें त्यांनीं आपले प्रयत्नांत कसुरी केली नाहीं ही ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट होय.

कांग्रेस व परिषदेच्या उपस्थित झालेल्या वादाचा त्रास बळवंतरावजींच्या पाठीमागून सुटतो न सुटतो तोंच त्यांच्या अंतःकरणाला दुःख देणारा कै० नामजोशी यांचा मृत्यु त्यांच्या समोर दत्त ठाकला. इ० स० १८८० सालीं ज्या पांच सात गृहस्थांनीं न्यू इंग्लिश स्कूल व केसरी मराठा हीं वर्तमानपत्रें काढून महाराष्ट्रांत एक प्रकारची नवी चळवळ उत्पन्न करण्याचा उपक्रम केला त्यापैकीं खटपटीच्या मानानें माधवराव नामजोशी हे पहिल्या प्रतीचे होत. बळवंतरावजींचा व नामजोशांचा अगदीं जीवलग मित्राचा संबंध होता; व तो कितीही वावटळें व संकटें आलीं तरी अखेरपर्यंत का-

नामजोशांचा मृत्यु.

यम राहिला. माधवरावांच्या हुषारीचा व मेहनतीचा अनेक महत्त्वाच्या प्रसंगीं चरित्रनायकांस उपयोग झालेला आहे. सारांश, नामजोशांच्या मृत्यूनें बळवंतरावजींचा एक जुना सन्मित्र गमावला.

गुण.

मोठी विद्वत्ता, दृढनिश्चयीपणा, सत्यासक्ति, सदयता, जुलुमाचा तिटकारा, न्यायभक्ति, प्रजापक्षाचा कट्टा अभिमान व म्हणूनच त्याचा कैवार घेण्याची उत्कट बुद्धि हे गुण बळवंतरावजींच्या अंगीं ओतप्रोत आहेत. वादविवादांत सत्यपक्षाचें अवलंबन व दुरभिमानाचा त्याग हेंच आपलें ब्रीद अशी त्यांची ठाम समजूत आहे; व या समजुतीप्रमाणेंच त्यांजकडून अक्षरशः नेहमीं वर्तन घडतें, म्हणून वादविवादामुळें त्यांच्या नेहमींच्या शांतवृत्तीचा कधींही भंग होत नाहीं. म्हणूनच ह्या बाबतींत त्यांची आंग्लदेशस्थ मुत्सद्दी ग्लॅडस्टन साहेब ह्यांच्याशीं तुलना केल्यास अयथार्थ होणार नाहीं. महाभारत व भगवद्गीता हे दोन्ही बळवंतरावजींचे आवडते वाचनग्रंथ आहेत, व ह्यांच्या परिशीलनानें त्यांच्या सद्विचारप्रवृत्तीस नेहमीं प्रोत्साहन मिळतें.

लेखनपटुत्व.

आजकाल आमच्या महाराष्ट्र भाषेंत सुबोध, ठसण्या जोगे, कडकडीत, उदात्त व सदसद्विवेकबुद्धीस अनुसरून लिहिणारे अगोदर दुर्मिळ. त्यांतल्या त्यांत सुदैवानें ह्या प्रकारचे जे एक दोन ले-

खक आहेत त्यांत बळवंतरावजी हे श्रेष्ठ आहेत. लेखांतील विचारसरणी हृदयंगम कशी होईल हें बळवंतरावजींस पूर्णपणें स्वभावसिद्धच अवगत आहे व त्यामुळें त्यांचे लेख अल्प शिक्षितापासून तो बड्या विद्वानापर्यंत सर्व लोक मोठ्या हौसेनें वाचतात. " यं ब्राह्मणमियं देवी वाग्वश्येवानुवर्तते ॥ " या भवभूतीच्या उक्तीचें ह्यांचे लेख वाचल्याबरोबर स्मरण झाल्याशिवाय राहत नाहीं. यांच्या टाकांतून जें जें ह्मणून उतरतें—ते कोणत्याहि मनोविकाराला आपल्या मनाची आहुति न देतां प्रेमळपणानें व खऱ्या बुद्धीनें नेहमीं लिहितात ह्मणून—तें तें बहुजनसमाजास प्रिय हें व्हावयाचेंच. यांच्या मस्तकावर सरस्वतीचा वरद हस्त आहे असें वाटतें; व कित्येक लोक तर त्यांच्या लेखनप्रभावास समर्थ रामदासांच्या प्रभावाची उपमा देतात, व ती त्यास कां मिळूं नये? श्रीसमर्थ रामदासांनीं कोणतीही अपेक्षा न करितां ज्याप्रमाणें केवळ प्रभु शिवरायाच्या कल्याणार्थच त्याला वेळोवेळीं बोध करण्याचा क्रम ठेविला होता, त्याप्रमाणेंच बळवंतरावजींनींही काडीची अपेक्षा न करितां केवळ लोककल्याणबुद्धीनें लोकांस वेळोवेळीं सुबोध व सयुक्तिक असा उपदेश करण्याचें व्रत घेतलें आहे. यांच्या मनांत जे विचार येतात तेच हुबेहुब कागदावर वठवावयाचे असल्यामुळें त्यांना लेखनासंबंधानें यत्किंचित्ही प्रयास पडत नाहींत; अथवा ओढाताण करावी लागत नाहीं. भाषेवर तर त्यांचा इतका कांहीं व्यासंग आहे कीं,

एका बैठकीस एकदां लिहिलेला शब्द अगर वाक्यरचना यांत बदल न करितांना ते पानेंच्या पानें लिहून टाकतात; ही साधारण शक्ति काय? इतकें असून कधींही व्याकरण वगैरे बाबतींत कोणताही दोष लेखांत दिसतो काय? क्राफर्ड-प्रकरण, संमतिबल, बडोदें येथील बापट कमिशन वगैरे वेळीं यांनीं लिहिलेले लहान मोठे लेख वाचून यूरोपियन लोकांनाही कित्येक वेळीं तोंडांत बोट घालून बसावें लागलें आहे व कित्येक वेळीं स्तुति केल्याशिवाय राहवलें नाहीं.

बळवंतरावजींचीं लहान मोठ्या सभांत आजपर्यंत पुष्कळ भाषणें झालेलीं आहेत.

वक्ते ह्या नात्यानें.

ह्यांचे भाषणांचा कल पोकळ शब्दावडंबराचें प्रदर्शन करण्याकडे नसून केवळ सोप्या भाषेंत थोडक्या कालांत मुद्याच्या बऱ्याच गोष्टी सांगण्याकडे असतो. भाषणांतील माहिती, विषयरचनेची पद्धति, सखोलपणा व गांभीर्य हीं पाहून आनंद झाल्याशिवाय राहत नाहीं. मात्र ह्यांच्या भाषणशैलींत असावा तितका अस्खलितपणा नसल्यामुळें वरवर पाहणाऱ्या श्रोत्यांस विषयाच्या अंतरगांत शिरण्याची संवय नसते ह्मणून जसा त्यांच्या लेखनाचा झाडून साऱ्यांवर परिणाम घडतो तसा व्याख्यानाचा घडत नाहीं. लेखांप्रमाणें भाषणांतही सुबोधत्व व कडकडितपणा ह्यांचा अभाव नसतोच.

बळवंतरावजींच्या आयुष्यक्रमाचा वृत्तांत म्हणजे

प्रजापक्षाचे कैवारी. तादृश महाराष्ट्राचा इ० सन १८९८ सालापासूनचा पुढें होणाऱ्या इतिहासांतील एक वाचनीय व महत्त्वाचा भाग आहे अशाविषयीं ह्यापूर्वींच आह्मीं निर्देश केलेला आहे. त्यांचा जीवनवृत्तांत इतर गोष्टींनीं चिरस्मरणीय आहेच आहे; तथापि त्यांनीं अतिशय मोठी संस्था कोणती काढली ह्या प्रश्नास त्यांनीं स्वतःच्या वर्तनानें होतकरू विद्वानांत लोकसेवेस प्रवृत्त होण्याची सद्बुद्धि निर्माण केली—व ती अशीच उत्तरोत्तर वाढत जाणार—ही गोष्ट उत्तरादाखल लिहिणें बस्स आहे. परकीय अमलाखालीं होतकरू विद्वानावर द्रव्याची लालूच दाखवून छाप पाडण्याची व त्यास मोह उत्पन्न करण्याची ठराविक पद्धति आहे. ह्या स्थितींत ह्या मोहजालास मागें सारून स्वतःचें आयुष्य प्रजापक्षास केवळ निस्सीम देशभक्तीखातर अर्पण करणारे खरे कैवारी फारच थोडे निपजतात. अशा प्रकारच्या देशभक्तांस अथवा प्रजापक्षाचे कैवाऱ्यांस बळवंतरावजींचें उत्कृष्ट उदाहरण आहेच व त्यांचा त्यांस सदैव पाठिंबा आहे. हल्लींच्या काळीं सार्वजनिक कामांत पुढाकार घेणें फार धोक्याचें आहे हें येथें विस्तारानें सांगण्याची जरूर नाहीं. कोणत्याही महत्त्वाच्या कामांत पुढाकार घेण्यास मनुष्य एकट्या विद्वत्तेनेंच सर्वस्वीं पात्र होत नसतो. त्यास कालदेशवर्तमानाचें ज्ञान, व्यवहारपद्धति, ह्यांची पूर्ण माहिती असली पाहिजे. आजकाल आपलेकडे विद्वान व तरत-

रीत माणसें लोकसेवेंत तत्पर होत आहेत ह्याचें सर्व-स्वीं श्रेय बळवंतरावजींच्या उदात्त उदाहरणास व त्यां-जकडून नवीन मंडळीस मिळत असलेल्या योग्य मार्गो-पदेशनास व पाठबळासच दिलें पाहिजे. राजकार्यधुरं-धर विद्वान हे राजकीय स्थित्यनुरोधानें अवकाशानें प्राप्त होणाऱ्या संकटाची आगाऊ सूचना देणारे ज्यो-तिषीच होत. कोणतीही नवीन राजकीय मसलत जीपा-सून लोकांस यत्किंचित् तरी त्रास होण्याचा संभव आहे तिचा दरबारीं खल होऊं लागतांच त्यांच्या प्रसिद्ध व सणसणीत लेखाच्या द्वारें लोकांत तिचा चोहोंकडे फै-लावा होतो, तिच्या संबंधानें लोक विचार करूं लाग-तात व तिजपासून होणारे दुष्परिणाम टाळण्याकरितां लोक सरकारास अर्जद्वारा वगैरे विनंति करितात हें जें नवीन वळण लोकांस लागत चाललें आहे व लोकांस खऱ्या स्थितीचें ज्ञान उत्तरोत्तर होत आहे तें प्रजाप-क्षाचे कैवारी व लोकनायक बळवंतरावजी ह्यांच्या अ-व्याहत प्रयत्नाचें फळ होय, हें बळवंतरावजींसारख्या प्रजापक्षाच्या कैवाऱ्यास पाण्यांत पाहणाऱ्या प्रतिस्प-र्ध्यांसही अक्षरशः संमत असलें पाहिजे.

सर्वसाधारण विचार.

जगामध्यें लोकनायक कोण होतो ? ज्याचे अंगीं मनुष्यपण पूर्णपणें वास्तव्य क-रितें तो. नियंत्याच्या हेतूकडे लक्ष दिलें तर असें स्पष्ट दिसतें कीं, त्याची इच्छा म-नुष्यानें इतरांस साहाय्य केलें पाहिजे अशी असावी. उदाहरणार्थ—केंवढाही धनाढ्य असो, कितीही गुणवंत

असो त्याला ह्मणून इतरांच्या साहाय्याशिवाय सर्वांशीं राहतां येत नाहीं. कोणाला थोडी तर कोणाला अधिक. कांहींही केलें तरी मदत ही पाहिजेच. आपणाला जन्मल्यापासूनच इतरांच्या मदतीची अपेक्षा असते. सारांश एकानें दुसऱ्यास साहाय्य केलेंच पाहिजे असा नियम विधात्यानें मनुष्यमात्राच्या पाठीस उपजतच लाविला आहे. ईश्वराच्या सदर इच्छेप्रमाणें जो आपलें काम चोख रीतीनें बजावतो तो आपल्या आज्ञाधारकपणामुळें त्यास प्रिय होतो व असा प्रिय झाला ह्मणजे त्यांस कोणतीही अडचण पडत नाहीं. घरधन्याचा ज्या ज्या प्रमाणानें एकाद्या मनुष्यावर प्रसाद अगर विषाद असतो त्या त्या प्रमाणानें इतर माणसें आपलें वर्तन त्या मनुष्याशीं ठेवितात; हाच नियम ह्या ठिकाणीं लावावयाचा. आपण सर्व माणसें सर्वसाक्षी प्रभूचीं बालकें असल्यामुळें त्याचा ज्यावर प्रसाद आहे अशा मनुष्यांस आपणही पूज्य मानितों. इतरांस मदत करणें हेंच माणुसकीपैकीं प्रधान अंग आहे. हें अंग बळवंतरावजींमध्यें असामान्यरीतीनें हजर आहे हें स्पष्टपणें वदावयास पाहिजे असें नाही. त्यांच्या लेखांत, वागण्यांत, व बोलण्यांत, सारांश हरएक व्यापारांत हें दृष्टिगोचर होतेंच होतें. कोणीही मनुष्य,—वाणी, उदमी, शेटसावकार, कुळंबी, माळी, सुशिक्षित अशिक्षित—त्यांजकडे गेला तर त्यांची भेट घेण्यास वर्दी लागत नाहीं व भेटल्यावर त्यांची प्रसन्न मुद्रा पाहून हरएकास आपली हकिगत सांगून सल्ला

घेण्यास हरकत वाटत नाहीं; व हकीगत ऐकल्यावर खरा खरा सल्ला देण्यांत त्यांजकडून कधींही कसूर होत नाहीं. कोणत्याही दर्जाचा मनुष्य असो त्याजजवळ अहंभावाचें वर्तन करावें असें स्वप्न सुद्धां आजपर्यंत त्यांना पडलें असेल किंवा नाहीं ह्याची शंकाच वाटते. माणुसकीचें दुसरें अंग ह्मटलें ह्मटजे उद्गार व क्रिया ह्याचा मेळ ठेवणें हें होय, ह्यांचीही त्यांच्या-मध्यें उणीव नाहीं. ज्याप्रमाणें आपल्या हातून वर्तन होणार नाहीं असें त्यांना वाटतें अशा प्रकारचें उद्गार ते काढीतच नाहींत. जें बोलतात तेंच करतात. व; जें करतात तें आंत एक बाहेर एक असें न ठेवितां स्पष्टपणें बोलून दाखवितात; व ह्यामुळेंच क्रोडो रुपये खर्चून व वाटेल तितका हव्यास करून अप्राप्य अशी मनःशान्ति सदैव त्यांच्या भजनीं असते. सत्यपक्ष-पातित्व व कार्यदक्षता ह्या दोहींचे बजावणींत भर्तृहरीच्या "गुरुं वा बालवृद्धौ वा ब्राह्मणं वा बहुश्रुतम् ॥ आततायिनमायांतं हन्यादेवाविचारयन् ॥ १ ॥" ह्या उक्तीला डोळ्यांसमोर ठेवून वर्तन करणें हेंच आपलें ब्रीद आहे अशी त्यांची ठाम समजूत आहे. ह्या समजुतीचा प्रभावही वेळोवेळीं केसरीच्या विचारपूर्वक मनन करणाऱ्या वाचकांचे अवलोकनांत आल्याशिवाय रहात नाहीं. अमक्याचीं अशीं मतें आहेत म्हणून माझीं तीं आहेत असा कांहींएक प्रकार त्यांच्या जवळ नाहीं. स्वतःच्या नजरेस जें रास्त दिसेल तेंच त्यांचें मत. सार्वजनिकसभा, पुणें म्युनसिपॉलिटी, मुंबई

युनिव्हरसिटी वगैरे संस्थांत सभासद ह्या नात्यानें बळवंतरावजींनीं जी लोकसेवा केली आहे तिचें लक्ष्यपूर्वक मनन केल्यास ह्या विधानाची सत्यता पटल्याशिवाय राहणार नाहीं. कोणतेंही कार्य हातीं घेतलें म्हणजे तें मोठ्या कळकळीनें करावयाचें असा त्यांचा कित्ता आहे; व म्हणूनच केवळ परकीयांच्या स्वाधीन अशा कार्याखेरीज बहुधा सर्वत्रांत त्यांना सिद्धि प्राप्त होते. हे मनाचे जितके कोंवळे आहेत तितकेच धीट आहेत. कै. शास्त्रीबोवा, नामजोशी, आगरकर व आपटे ह्या मित्रांच्या परलोकगमनानें बळवंतरावजींच्या चित्तवृत्तीचें बदललेलें स्वरूप ज्यांनीं ज्यांनीं पाहिलें आहे त्यांची त्यांची ह्यांच्या मनाच्या कोंवळेपणाबद्दल खात्री झाली आहे. कोणतेही प्रकारच्या व्यसनाचा स्पर्शसुद्धां ह्यांना आजपर्यंत झाला नाहीं व पुढें होणारही नाहीं. पोषाख पाहिला तर, खरोखरच आधुनिक मोठ्या माणसांच्या पोषाखासंबंधीं साधारणतः ज्या कल्पना प्रचलित आहेत त्यांच्याच धोरणानें पाहूं लागल्यास एकाद्या अनोळखी मनुष्यास एकाद्या सभेंत "ते पहा अमुक ठिकाणीं बसले आहेत ते टिळक" असें सांगितल्यास त्याला तें खोटें वाटेल, असा असतो. वाजवीच आहे, ज्याप्रमाणें म्युनिसिपल अधिकाऱ्याकडून मोठमोठ्या शहरांत जेव्हां घरतपासणीचें काम सुरू होतें त्यावेळीं ज्यांचीं घरें भक्कम नसतात त्या लोकांचें घराला बाह्योपचार करून रंगमाती लावून शोभा आणल्याशिवाय चालत नाहीं, त्याप्रमाणेंच सर्वसाधारणतः

ज्यांच्या अंगीं लोकांत मान्यता प्राप्त करून घेण्याजोगे गुण नसून इतरांनीं आपणास मान द्यावा अशी इच्छा असते त्या लोकांना बहुजनसमाजांत जातांना कांहींएक विशेष प्रकारचा पोषाख व अलंकार परिधान केल्याशिवाय जाववत नाहीं. परंतु असें झालें तरी, एकादा कसबी सुवर्णकार ज्याप्रमाणें त्याजपुढें एक खऱ्या सोन्याचा तुकडा एकाद्या मलीन वस्त्रामध्यें गुंडाळून ठेविलेला व तसाच एका लांकडी पेटींत जांभळ्या मखमालीचें अस्तर घालून त्यांत एक पितळेचा जिल्हई देऊन न्याशनल ब्यांकेचा छाप मारलेला तुकडा ठेविल्यास खरा कोणता व खोटा कोणता हें हस्तस्पर्शानें सांगेल त्याप्रमाणें जे खरे मार्मिक जन असतात ते आपल्या ज्ञानेंद्रियांच्या साहाय्यानें गुणी मनुष्याची परीक्षा केल्याशिवाय रहात नाहींत. असो, ह्या बाबतींत कितीही लिहिलें तरी आमच्या मनाचें समाधान होणार नाहीं, असें आमचें मत आहे. परंतु नाइलाजास्तव पुढील चार ओळी लिहिल्याशिवाय राहवत नाहीं. बळवंतरावजी हे ज्या काळीं पदवीधर झाले त्या काळच्या स्थितीच्या मानानें पाहिलें तर उपपदधारी विद्वानांत पोषाखाच्या तरतरीची व झाकीची भर पडण्यास पदवीदान समारंभाचा अवधीही मध्यें पुरा जात नसे. रंगी बेरंगी पोषाख, दृष्टीस साहाय्यभूत उपनेत्र व पदवीदान समारंभाचे वेळीं अवश्य लागणारा परकीय तुकतुकीत जोडा, व काळाचें महत्त्वदर्शक सूक्ष्माकृतीचें घड्याळ ह्या गोष्टी विद्वत्तेचीं आवश्यक उपांगें मानल्या जात हो-

त्या; पण बळवंतरावजींस अशा दिखाऊपणाची हांव त्या वेळीं नव्हती एवढेंच नव्हे, तर अझूनही त्यांनीं आपला देशी पेहराव कायम ठेविला आहे. वेळाची चूकभूल होऊं नये म्हणून नामदारी प्राप्त झाल्यावर त्यांच्या कित्येक सन्मित्रांनीं घड्याळ त्यांच्या पोषाखावर लादलें आहे असें सांगतात, व पोषाखास विदेशीयत्व आणणारा बूट याचा—बड्या बड्या मंडळींनीं आग्रह केला असूनही त्यांनीं कायमचा अव्हेर केल्याचें दिसत आहे. फार काय. कायदेकौन्सिलांत जातांना सुद्धां त्यांच्या पायांत पेशवाई जोडा असतो. सारांश हाच कीं आज ज्या मनुष्यांच्या मूर्ती आमच्या डोळ्यांपुढें आहेत, त्यांत बळवंतरावजी हे आम्हांस श्रेष्ठतर वाटतात व म्हणूनच खरी माणुसकी जिला म्हणतात ती ह्यांच्यांत आढळते हें म्हटल्याशिवाय आमच्यानें राहवत नाहीं.

अपत्यें.

अपत्यप्राप्ति ही एक ईश्वराची अलौकिक देणगी आहे; व धर्मसमजुतीनें ती पूर्वजन्मार्जित जोडलेल्या व चालू जन्मांत जोडित असलेल्या सुकृतीचें फल आहे. तसेंच गृहस्थाश्रमांतील सुखांपैकीं अपत्यप्राप्ति हें एक प्राधान्य प्रकारचें सुख आहे. पराक्रमी व भाग्यवान् दशरथ राजाला सुद्धां अपत्यप्राप्तीसाठीं यज्ञ करावा लागला. सारांश मुलेंबाळें असणें हें भाग्यशालीपणाचें द्योतक असून गृहस्थाश्रमास अत्यावश्यक आहे. आम्हांस लिहिण्यास अतिशय आनंद वाटतो

कीं, आमचे चरित्रनायक ह्या बाबतींत सुद्धां भाग्यशाली आहेत. ह्यांना आज मित्तीला तीन पुत्र व तीन कन्या अशीं सहा अपत्यें आहेत. वयाच्या वगैरे मानानें सर्वांना आवश्यक असें शिक्षण देण्यांत बळवंतरावजींनीं कसूर केलेली नाहीं. स्वतः त्यांचें वर्तन चोख व शुचिर्भूत असल्यामुळें व योग्य त्या प्रकारें सर्व प्रकारच्या शिक्षणाचीं साधनें उपलब्ध असल्यामुळें त्यांचीं अपत्यें वाउगीं निघणें शक्य नाहीं.

लोकमान्यता

आपल्या सद्गुणमंडितत्वाच्या योगेंकरून बळवंतवजी आमच्या महाराष्ट्रांत आबाल वृद्धांस पूज्यतर झालेले आहेत. महाराष्ट्रांतील कोणत्याही भागांत ज्याला म्हणून थोडीशी तरी सामाजिक व राजकीय माहिती आहे त्याच्या तोंडून टिळकांचें नांव निघाल्याबरोबर त्यांच्या एकनिष्ठ देशसेवेबद्दल त्याबरोबरच चार शब्द बोलल्याशिवाय त्याच्यानें राहवत नाहीं. ह्यांच्या कडकडित लोकसेवेबद्दल अगदीं अशिक्षित लोकांपैकीं देखील कांहींच्या मनावर विलक्षण प्रकारचा ठसा मुद्रित झालेला आढळतो. त्यासंबंधें एक दोन उदाहरणें आम्हीं ऐकिलीं तेव्हां आमचें अंतःकरण सद्गदित होऊन गेलें व ह्या महात्म्याच्या गुणांबद्दल आमच्या मनांत गुदगुल्या होऊं लागल्या. दोन्हीही जवळ जवळ एकाच मनोवृत्तीचीं प्रदर्शक असल्यामुळें एकच वाचकांपुढें मांडतों व दुसरें न मांडल्याबद्दल कित्येकांची इतराजी झाली तर त्या कृत्यांबद्दल माफी मागतों—सुमारें अडीच महिन्यांपूर्वी न्युबानिक ता-

पानें प्रथमतःच मुंबापुरींत कहर उसळून देण्यास सुरवात केली त्यावेळीं कांहीं काल अधिकारी वर्गाच्या—सद्धेतूनें फर्माविलेल्या—हुकुमाप्रमाणें सांथीचा रोगी दवाखान्यांत नेण्याची सक्ति होत असे. तशा प्रकारानें दवाखान्यांत जाण्याला लोकांची नाखुषी दिसल्यावरून लगेच सरकारनें सक्तीचा कायदा बंद केला. असें जरी झालें तरी, न जाणो पुन्हां कायदा झाला तर काय होईल अशा भीतीनें पुष्कळ मजूर लोक आपआपल्या घरीं गेले. आमच्या ज्या मित्रानें ही हकीगत सांगितली तो त्यावेळीं आपल्या घरीं कोंकणांत जात होता. तो ज्या आगबोटींत होता ती आगबोट मजूर वगैरे लोकांनीं गच्च भरून गेल्यामुळें दुसरा व तिसरा ह्या दोन्ही वर्गांचे उतारू ह्यांत भेद राहिला नव्हता; व म्हणूनच सुदैवानें त्याला हे पूज्यबुद्धिप्रदर्शक उद्गार ऐकूं आले. आगबोटीवर पांढरपेशे लोक विशेष नसल्यामुळें आमच्या मित्राला बोलाचालायला कोणी नव्हता. तो आपला एकटाच स्वस्थ डोळे मिटून पडला होता. इतक्यांत शेजारीं बसलेल्या एका कुळंबी गड्यानें एका दुसऱ्या सोबत्याजवळ त्याच्या रजा न मिळाल्यामुळें व पगार हातीं न आल्याकारणानें मुंबईस राहिलेल्या एका मित्राबद्दल काळजी प्रदर्शित करून सरकारनें जबरीनें माणसें धरधरून नेल्यास आमचें कसें होईल वगैरे दुःखोद्गार काढिले. हें ऐकतांक्षणींच त्या दुसऱ्यानें त्याला जो जबाब दिला तो फारच आनंदजनक आहे. तो ऐकल्यावर कोणाही सहृदय वाचकांस आनंदाचें भरतें

आल्याशिवाय राहणार नाहीं. जबाब महत्त्वाचा असल्यामुळें आमच्या मित्रानें फिरफिरून त्या गड्याच्या तोंडून तो वदवून आपल्या कानांचें पारणें फेडलें व ते शब्द नीट लक्षांत ठेविले. मुंबईस परत आल्याबरोबर आपल्या स्मरणवहींतील टिपलेली हकीगत दाखवून व तोंडानें सांगून ती एकाद्या वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करण्याविषयीं त्यानें आग्रह धरिला. परंतु आम्हीं हें चरित्र लिहावयाचें फार दिवसांपासून ठरविलेलें असल्यामुळें त्याजकडून तो बेत तहकूब करविला. लिहावयाच्या नादांत व चरित्रनायकांच्या लोकमान्यतेबद्दल वाटलेल्या आनंदाच्या भरांत प्रिय वाचकांस त्या कुळंबी गड्याचें उत्तर काय होतें हें निवेदन करण्यास विसरलों; तें उत्तर स्वतःच्या शब्दांनीं वाचकांपुढें मांडण्यापेक्षां आमच्या मित्राच्या स्मरणवहींतील अक्षरशः उताऱ्यांतच देतों:—" आपल्याला कांहीं भ्यायास नको, पुन्याचा टिलक त्याच्या मनीं मुखीं परमेश्वर उभा राहून तो आपली दाद गव्हरनर साहेबापर्यंत लावील इत्यादि, इत्यादि " कोण लोकोत्तर लोकमान्यता ! काय विलक्षण पूज्यबुद्धि ! धन्य त्या बळवंतरावजींची ! नरजन्माला येऊन आमच्या सारखें स्वस्थ न बसतां आर्यमातेची निस्सीमपणानें व एकनिष्ठतेनें तुजवीण दुसरा कोण सेवा करीत आहे ? ही झाली महाराष्ट्रांतील गोष्ट. महाराष्ट्राबाहेर सुद्धां जेथें जेथें ह्यांची देशसेवा लेखनद्वारा दृग्गोचर होते तेथें तेथेंही असाच प्रकार आहे. फार काय कित्येक लोक तर बळवंतरावजींस " दक्षिणेचे अनभिषक्त

राजे" म्हणतात; व ॥ निन्दन्तु नीतिनिपुणा यदिवा स्तुवन्तु लक्ष्मीः समाविशतु गच्छतु वा यथेष्टम् । अद्यैव-द्वा मरणमस्तु युगांतरेवा न्याय्यात् पथः प्रविचलन्ति पदं न धीराः ॥ या उदात्त तत्त्वाचें रहस्य त्यांचे वर्तनांत पूर्णपणें नेहमीं मुद्रित झालेलें दिसतें.

पंचवार्षिक करार.

सरतेशेवटीं गेल्या राष्ट्रीयसभेंत " हिंदुस्थान सरकार व स्थानिक सरकार ह्यांमधील पंचवार्षिक करार " संबंधीं नामदारांनीं जें भाषण केलें तें अत्यंत उपयुक्त माहितीनें भरलेलें असल्यामुळें व त्यांत आलेल्या गोष्टी हरएकास माहित असणें जरूरीचें आहे ह्मणून त्याचा सारांश येथें देऊन ह्या अल्पचरित्राची येथें समाप्ति करूं.

" राष्ट्रीयसभेपुढें हा ठराव यंदां प्रथमच येत आहे. हा ठराव पूर्वींच सभेपुढें यावयास पाहिजे होता, पण लोकनियुक्त सभासद कायदेकौन्सिलांत बसूं लागून त्यांच्यापुढें जंमाखर्चाचा वादविवाद होऊं लागल्यामुळें अलिकडेच ह्या विषयाकडे लोकांचें मन लागलें आहे. हा जमाखर्चाचा प्रश्न आहे व माझ्या भाषणांत पुष्कळ आंकडे आढळतील, अशी आपली अटकळ असेल; पण ह्या प्रश्नाचा इतिहास व ह्यांतील मुख्य तत्त्वें एवढींच मी आपणास सांगणार आहें. स्थानिकसरकार व हिंदुस्थानसरकार ह्यांमधील संबंधाचा हा प्रश्न असल्यामुळें जरी राष्ट्रीयसभेच्या इतर ठरावांस अंमलदार प्रतिकूळ असले, तरी ह्या प्रश्नासंबंधानें स्थानिक-

सरकारचें मत आमच्या मताशीं जुळणारें आहे. जमाखर्चाची स्थिति अशी आहे. हिंदुस्थानसरकार हरएक प्रकारचा वसूल आपला आहे असें समजतें. परराष्ट्रांशीं हरएक प्रकारची वागणूक, सरहद्दीवरील लढाया, पार्लमेंटच्या परवानगीखेरीज देखील परराष्ट्रांवर करावयाच्या मोहिमा, सरहद्दीची बळकटी, नोकरांचीं पेन्शनें व हुंडणावळीची तूट ह्या सर्व गोष्टी हिंदुस्थानसरकार करतें व राज्याच्या आंतील व्यवस्था स्थानिकसरकाराकडे सोंपविली आहे. हिंदुस्थानसरकाराला जसे खर्चाला पैसे पाहिजेत तसेच राज्यव्यवस्था राखण्यास स्थानिकसरकारालाही पैसे पाहिजेतच. १८७० सालापूर्वी हिंदुस्थानसरकार हरएक प्रकारचा जमाखर्च स्वतः पहात असे. मुंबईस एकादी विहीर खणावयाची असली किंवा कलकत्त्यास एकादा पूल बांधावयाचा असला तरी देखील हिंदुस्थानसरकारची मंजुरी घ्यावी लागे. ह्यामुळें असें होत असें कीं, स्थानिकसरकार पाहिजे तेवढ्या खर्चाची मंजुरी मिळवीत असे, पण वसुलाच्या नवीन बाबी शोधून काढण्याची किंवा आयाच्या बाहेर खर्च न करण्याची जबाबदारी त्यांच्यावर मुळींच नसे. ह्मणून १८७१ सालीं लॉर्ड मेयोनीं प्रांतिक कराराच्या पद्धतीस प्रारंभ केला. सरकारचे वतीनें असें सांगण्यांत येतें कीं, हा करार ' कायदेशीर करार ' नव्हे, तर हिंदुस्थानसरकारनें स्थानिकसरकारशीं जी जमाखर्चासंबंधानें व्यवस्था केली तिला करार ' असें नांव देण्यांत आलें आहे. कांहींही

असो; ही व्यवस्था अशी आहे कीं जर प्रजाजन हा करार करणारे असते, तर कायद्याचे कोर्टांत त्याची अंमलबजावणी खात्रीनें झाली असती. असो; ही व्यवस्था अशी होती कीं, कांहीं कांहीं खर्चाच्या बाबी स्थानिकसरकारचे पूर्ण ताब्यांत दिल्या होत्या. ह्या खर्चात जर कांहीं शिल्लक उरली तर स्थानिकसरकारला ही शिल्लक त्या त्या खात्याची सुधारणा करण्याकडे खर्च करण्याचा अधिकार होता. हेंही पण त्याबरोबरच ठरलेलें होतें कीं, जर तोडून दिलेल्या बाबींचें उत्पन्न नेमलेल्या खर्चास पुरलें नाहीं तर स्थानिकसरकारनें हिंदुस्थानसरकारचे तोंडाकडे बघूं नये. पांच वर्षांच्या अनुभवानें ही पद्धत हिंदुस्थानसरकाराला फार सोईस्कर वाटली, व स्थानिकसरकारला स्वतंत्र खर्चाचा अधिकार असूं नये असें त्यांचें मत असतांही लॉर्ड लिटन व सर जॉन स्ट्रॅची यांनीं आणखी खर्चाच्या बाबी व थोडक्या उत्पन्नाच्या बाबी स्थानिकसरकारच्या ताब्यांत दिल्या. कांहीं विशेष खर्च हिंदुस्थानसरकारचे मंजुरीशिवाय स्थानिकसरकारनें करूं नयेत अशी नवीन अट ह्यावेळीं **प्रांतिक करारांत** घुसडण्यांत आली. ज्याप्रमाणें हिंदुस्थानसरकारनें वसुलाच्या व खर्चाच्या कांहीं बाबी स्थानिकसरकारास दिल्या, त्याचप्रमाणें लॉर्ड रिपन यांनीं स्थानिकसरकारास आपल्या वसुलाच्या व खर्चाच्या कांहीं बाबी स्थानिकस्वराज्याच्या ताब्यांत देण्यास लाविलें. लॉर्ड लॅन्सडाउनचे कारकीर्दींत ह्या **प्रान्तिक कराराची** फे-

रतपासणी झाली, व स्थानिकसरकारास अशी समज दे-
ण्यांत आली कीं, हिंदुस्थानसरकारास प्रान्तिकसरकार-
चे शिलकेची मागणी पाहिजे तेव्हां करतां येते. ह्याचा
अर्थ असा कीं, उधळपट्टीमुळें जेव्हां जेव्हां हिंदुस्थान-
सरकारास पैशाची टंचाई पडली तेव्हां तेव्हां त्यांनीं
स्थानिकसरकारचे उत्पन्नावर झडप घातली व राहिले-
ल्या उत्पन्नावर आपला कसाबसा खर्च भागविणें स्था-
निकसरकारास भाग पडलें. घरखर्चासंबंधानें नवराबाय-
कोमध्यें जशी व्यवस्था ठरते तशांतला हा प्रकार आहे.
नवऱ्यानें मनमुराद बेताल चैन करावी व मग 'तुझ्या पे-
टींतले पैसे टाक' म्हणून बायकोस धमकी द्यावी अशा-
सारखीच ही व्यवस्था आहे. ( हशा ) या अन्याया-
च्या प्रकाराविरुद्ध आपल्यापुढें सांप्रतचा ठराव आण-
ला आहे. सर जे. वेस्टलंड यांच्याविरुद्ध बोलतांना सर ए.
मेकंझी म्हणाले आहेत कीं, प्रान्तिककरारासंबंधानें जी पं-
चवार्षिक फेरतपासणी होते ती पद्धत फार वाईट आहे.
ह्या प्रांतिक शेळीची लोंकर हम करेसो कायद्यानें का-
पून घेतली जाते व त्या बिचारीला पुनः लोंकर येईतों
थंडींत कुडकुडत दिवस काढावे लागतात. पंचवार्षिक
करारांतील पहिलीं दोन वर्षें मिळून पैसे काढण्यांत, शि-
ल्लक टाकण्यांत व कामें लांबणीवर टाकण्यांत जातात;
पुढें दोन वर्षें चालावीं तशीं कामें चालतात; शेवटच्या
वर्षीं शिलकेची उधळपट्टी चालते; कारण शिल्लक रा-
हिल्यास हिंदुस्थानसरकार उपटील ही पोटांत भीति
असते. ह्मणजे ह्या करारांना सर ए. मेकंझी पंचवा-

षिक उचलाउचलीचे करार असें नांव देतात. ( टाळ्या ) वायव्य प्रांताच्या सर ए. म्यॅकडोनल्ड ह्यांना त्यांच्या वांट्यास दिलेल्या उत्पन्नाच्या बाबींतून राज्यकारभार चालविणें दुरापास्त झालें आहे, स्थानिकसरकारची बाजू अगदीं खरी आहे, आणि वचनभंग करून हिंदुस्थानसरकार स्थानिकसरकारची शिल्लक व उत्पन्नाच्या कांहीं बाबी गडप करण्याचा जो विचार करितें त्याच्याविरुद्ध स्थानिकसरकारास आह्मीं मदत केली पाहिजे. राज्याची अंतस्थ व्यवस्था कशीही असो, हिंदुस्थानसरकारच्या फाजील खर्चाकडे स्थानिक उत्पन्नाच्या कांहीं बाबी सोडून देणें भाग पडलें तरी स्थानिकसरकारानें कांहीं कुरकूर करूं नये, व टाकलेल्या भाकरीच्या तुकड्याकरितां हिंदुस्थानसरकारचे आभार मानावेत असें हिंदुस्थानसरकारचें मत दिसतें. मि० वाच्छा हे रायल कमिशनपुढें साक्ष देण्यास इंग्लंडांत गेले ह्मणजे ह्या सर्व गोष्टी कमिशनपुढें खुलासेवार मांडतील अशी माझी खात्री आहे. दिवाळें काढणाऱ्या भागीदाराप्रमाणें राज्यकारभारांत वागण्याचा हिंदुस्थानसरकारचा बेत दिसतो. ( टाळ्या ) अशा रीतीनें हिंदुस्थानसरकारास वागवूं न देणें हें तुमचें काम आहे. हिंदुस्थानसरकारच्या हक्कांस अशा प्रकारानें आळा घालण्यांत यश मिळाल्यावर स्थानिकसरकारच्या उत्पन्नाच्या बाबींवरील अधिकारावर लोकनियुक्त सभासदांचा कांहीं दाब असला पाहिजे; पण ह्या पुढच्या गोष्टी आहेत. ”

असो, आमच्या परिच्छिन्न बुद्ध्यनुसार व आमच्या

उत्कट इच्छेप्रमाणें हा वेडावांकडा अल्पचरित्रलेख महाराष्ट्रीयांपुढें ठेविला आहे. लेखनकलेंतील अनभ्यस्तपणा मुळें शेंकडों दोषस्थळें राहिलीं असतील. परंतु त्याजबद्दल आम्हाला वाचकांनीं माफी करावी अशी आमची विनंति आहे. सुदैवानें ज्या सत्पुरुषाचे गुणानुवाद वर्णन करण्याची संधि आली त्याला जगन्नियंत्यानें उदंड आयुष्य घालून, झाली ही कांहींच नव्हे, ह्यापेक्षां जास्त अशी लोकसेवा करण्याची बुद्धि व त्या कामांत पाठिंबा द्यावा, तसेंच त्यांच्या सारखे शेंकडों नव्हे हजारों लोक आम्हांमध्यें उत्पन्न करावे, व ज्या ब्रिटिश सरकारचे राज्यांत आम्हांस वाक्स्वातंत्र्याचा अनुपमेय फायदा मिळाला म्हणूनच आमच्या चरित्रनायकांचे गुणांपैकीं कांहीं जास्त जास्त विकसित झाले, त्या सर्वशक्तिमत् ब्रिटिश सरकारचें राज्य आम्हांस सुखावह होईल अशा रीतीनें आम्हांवर सदोदित ठेवावें अशी साष्टांग प्रणिपात करून प्रार्थना करतों.



# ना० बाळ गंगाधर टिळक यांचें

## ( कविताबद्ध )

## संक्षिप्त चरित्र.



### ( वसंततिलका )

कां प्राणिमात्र अवघे श्रम हे करीती ? ।
इच्छा मनीं निज हितार्थचि कीं धरीती ॥
तद्धर्म कीं निज हितीं रत नित्य व्हावें ।
अन्यार्थ यत्न करणें नच त्यांसि ठावें ॥ १ ॥

आम्हां नरांसि दिधलें परि ईश्वरानें ।
सुज्ञान, यन्महति ना वदवे मुखानें ॥
आह्मी यथामति तयें खपुनी भलें कीं ।
रात्रंदिनींहि करणें उपकार लोकीं ॥ २ ॥

तद्देशबांधवजनां बहु सौख्य द्याया ।
जे चंदनासमचि कष्टविती स्वकाया ॥
ते साधु, ते सुजन, ईश्वर तेचि पाही ।
त्यांच्याचि पाद–कमला धरणें जनांहीं ॥ ३ ॥

ऐसे परार्थरत सद्भरताभिमानी ।
सद्विद्य सोद्यम भले, सह सद्गुणांनीं ॥
आहेत हे टिळक सज्जन नामदार ।
मी दीन, सच्चरित तें वदतों अपार ॥ ४ ॥

---

१ कारण.

सत्राशेंवरि सत्तराष्ट सुशकीं आषाढ वद्यामधीं ।
षष्ठीच्या शुभ वासरीं प्रसवली बाळासि माता सुधी ॥
माता ताताहि धन्य होति; अणखी तूं धन्य रत्नागिरे ।
नामा सार्थ करूनि रत्न असलें आर्यांसि देशी बरें ॥ ५ ॥

वाढे चंद्रकलेसमान जगतीं हा बाळ लोकोत्तर ।
लीलेनें निजबुद्धिनें सुखवि तो माता-सु-तातांतर ॥
होता शिक्षकमेरु थोर गणिती तत्तात रत्नागिरीं ।
विद्या देउनियां विकासमति तो पुत्रा करी चातुरीं ॥ ६ ॥

आधीं बुद्धि विशाल; शिक्षण भलें विद्वान् पिता देतसे ।
त्यानें बाळ-मती विकासित बहू पद्मासमा होतसे ॥
सच्छिक्षेकरुनी पिता निजसुता लावी सुनीती–पथा ।
स्वतंत्र्य–स्वभिमान–उद्यम–बिजा पेरी सुपुत्रीं तथा ॥ ७ ॥

ताताला बदती पुण्यामधिं मिळे; जाईच पुण्य–स्थला ।
आंग्लाभ्यास तिथेंचि नायक करी प्रारंभ तेंव्हां भला ॥
ते गंगाधरपंत उत्तम गुणी सच्छील विद्यापती ।
दुर्दैवें करिती बहात्तर सनीं कैलासवासाप्रति ! ॥ ८ ॥

दुःखाचा जणु कोसळे गिरि महा बाळावरी या रितीं ।
आहा ! वाटति शून्यशा दश दिशा दुःखा नसे त्या मिती ॥
सारें दुःख गिळूनियां टिळक तो अभ्यास जारी करी ।
त्याची त्याच सनांत पास पहिली झाली परीक्षा बरी ॥ ९ ॥

( पृथ्वी )

शहात्तर सनामध्यें टिळक होय बी. ए. तरी ।
हुषार मतिवान हा म्हणूनि कीर्ति होई बरी ॥

---

१ शके १७७८.

अनेक विषयांमध्यें निपुणताहि संपादुनी ।
महा गणिति धन्य हा म्हणवूनीच घेई जनीं ॥१०॥
पुढें लवकरीच हा गमत पास एलेलबी ।
असे सुमति तीव्रही चपल वीज जैशी नभीं ॥
स्वहस्तमल मानितो टिळक हा सदा कायदा ।
जनव्यसन वारण्या झिजतसे स्वकार्यें सदा॥ ११ ॥

( साकी )

कॉलेजामधिं मित्रांसह हा विचार केला त्यांनीं ।
सद्यःशिक्षण–पद्धति आहे व्याप्त बहु दोषांनीं ॥ १२ ॥
शिक्षण मिळतें अर्धें कच्चें एकमार्गि मायावी ।
शिक्षण–संस्था म्हणुनी नूतन दोषरहित काढावी ॥ १३ ॥
स्वातंत्र्याचा अभिमानाचा जेणें हो संचार ।
शिक्षण ऐसें जनां मिळावें हाच गमे सुविचार ॥ १४ ॥
विचार ऐसा शास्त्रिबुवादिक[1] प्रिय मित्रांशीं केला ।
सुहृज्जनांच्या साह्यजलें हा लागे तरु वाढीला॥ १५ ॥
ऐशीं सालीं[2] 'नवांग्लशाला' स्थापियली बहु नामी ।
राष्ट्रहितैषी स्वतंत्रताप्रिय सुमान्य, पुण्यग्रामीं ॥ १६ ॥
आगरकर ते माधवरावहि[3] अपटे धारप तैसे ।
केळकरादिक विद्वन्मणि ते मिळती येउनि खासे ॥ १७॥
सद्गुरुशिक्षित विद्यालाभें सुख हो छात्रगणास ।
सिद्धिविनायक गुरू लाभतां पळे अविद्या खास ॥ १८॥
टिळक अनंतर कॉलेजहि तें उत्तम फर्ग्युसनाख्य ।
पंचाऐशीं सालीं स्थापिति देत जनां जें सौख्य ॥ १९॥

---

१ कै. विष्णूशास्त्री चिपळूणकर. २ न्यू इंग्लिश स्कूल पुणें.
३ कै. नामजोशी.

आर्य बांधवां शिक्षण उत्तम मिळण्यास्तव टिळकांनीं ।
श्रम बहु केले म्हणुनि तयांना जग हें बहुतचि वानी २०

( मंदाक्रांता )

कॉलेजाची सुखकर दशा ही अशी सौख्यदायी ।
दुष्टा काळा हर हर! कशी साहवेनाच कांहीं ॥
आधाराचे कितिक हरिले स्तंभ त्या दुष्ट काळें ।
कॉलेजाच्या सकल जनिंचें धैर्य तेव्हां पळालें ॥ २१ ॥
विष्णूशास्त्री अधिंच हरपे; आपटे नामजोशी ।
गेले गेले अगरकरही धारप ज्ञानराशी ॥
गेले तैसे नर पर जागीं आंग्ल भाषीनिपूण ।
प्रारब्धाची खडतर दशा याविना काय जाण! ॥२२॥
त्या कॉलेजांतुनि टिळकही कारणानें निघाले ।
मूळांपैकीं हर हर! कसे टाकुनी त्यास गेले ॥
जैशा रीतीं वितिलक दिसे भाल तें बालिकेचें ।
त्या संस्थेचें खचितचि तसें जाहलें येथ साचें ॥ २२ ॥

( आर्या )

काढिति नवांग्ल शालेसह पत्रें ‘ केसरी ’ ‘मराठा’ हीं ।
उत्कृष्ट लेख लिहुनी फिरविति सल्लोकशिक्षण-द्वाही२४
त्यांतील लेख मार्मिक कळकळिचे जोरदार निर्भिड ते ।
वाचुनि कुणा नराच्या दुःखक्रोधें मनीं न भडभडतें?२५
नैतिक सामाजिकही धार्मिकही राजकीय लेखांहीं ।
देशाभिमान पसरिति सांगति देशस्थिती खरी पाही॥२६॥
कोल्हापूर प्रकरणीं लिहिती उत्कृष्ट लेख सत्याचे ।
गहजब तयें उडोनी भोगाया लागलेंचि फल त्याचें॥२७॥

---

१ कै. प्रो.केळकर.

समव्यवसायि बंधुंनीं लिहिले ते लेख सर्व परि त्याचें ।
मित्र प्रेमास्तव या दोघांनीं भोगिलेंचि फल साचें ॥२८॥
देशार्थ वीरनर हे कारागृहवास डोंगरीवरती ।
हर्षें शतेक दिन ते मंगलकार्यासमान पतकरती ॥२९॥
थोर नरश्रेष्ठांनो ह्या कृत्यें तत्सुकीर्तिचा गंध ।
यावच्चंद्रदिवाकर राहुनि देईल सुजनिं आनंद ॥ ३० ॥

## ( शार्दूलविक्रीडित )

झाला दुःख-भरें त्यजूनि टिळकें लॉक्लास तो काढुनीं ।
लोकां उत्तम कायदा शिकवितो हा थोर लोकाग्रणी ॥
सारा वेळ करीत खर्च, करण्या हा देशसेवा बरी ।
ह्या ईशा परमेश्वरा,विनवितों दीर्घायु याला करीं ॥ ३१ ॥
आहे हा सुसभेंत सार्वजनिका सन्मान्यसा मेंबर ।
आर्यावर्तहितार्थ हा झटतसे तेथें जणूं किंकर ॥
फेलोचा बहु मान त्यासि मिळतो त्या विश्वविद्यालयीं ।
विद्यार्थी-व्यसनांसि दूर करण्या घेई श्रमातें तयीं॥३२॥
तो पंचाण्णव सालिं कौन्सिलमधें झाला पहा मेंबर ।
त्या योगें जनिं कीर्तिसत्परिमलें दाटे बहू अंबर ॥
लोकांची शुभ नामदार नर तो सेवा करी कौन्सिलीं ।
तेथें लोकहितार्थ वाद करितो;काया जनां वाहिली ॥३३॥
ज्या ज्या उद्भवती जनीं चळवळी हा सिद्ध त्या त्यांमधीं।
वाटे मंगलकार्य त्यासि, गमतां ऐशी सुसंधी सुधी ॥

---

१ ना. टिळक व कै० आगरकर यांनीं.

कंटाळा ह्मणुनी तयाप्रति कधीं त्या उद्यमाचा नसे ।
सद्राजाऽनभिषिक्त, लोक वदती, हा दक्षिणेचा असे॥३४॥
कैवारी हरिसा प्रजाजनिं दुजा याच्याविना नाढळे ।
सरकारा उपदेश योग्य करण्या चित्तीं न केंव्हां ढळे॥
त्याचा ईश्वर शांति मोक्षपदही ती लोकसेवा असे ।
स्वार्थत्याग निजाभिमान भरतीं यांची सुमूर्ती दिसे॥३५॥
हिंदु म्लेंच्छ कुभांडणा शमविण्या ह्यानें श्रमां घेतलें ।
सत्या न त्यजिलें तयांत कधिंही कांहीं जरी जाहलें ॥
खातीं पोलिस जंगलादि अवघीं देती जनां त्रास हा ।
सल्लेखा लिहुनी सदा शमविण्या घेई श्रमांतें महा॥३६॥
म्लेंच्छां मर्दुनि जो झटेचि करण्या सद्धर्म-संस्थापना ।
साधी आर्यहितासि जो; करित जो गो-विप्र-संरक्षणा ॥
धर्मेच्छा अभिमानमूर्तिच अशा श्रीमच्छिव-स्मारकीं ।
स्वार्थत्याग करूनि ह्या सु-टिळके केलें श्रमा फारकीं॥३७॥
नीती भूतदया स्वधर्मरतता स्वातंत्र्य लाभें नफा ।
ऐक्याची महती सुशिक्षण-मती देशाभिमान-कृपा ॥
ऐशा नैतिक राजकीय विषयीं तैसेंचि सामाजिकीं ।
जोरानें लिहुनी करी उपकृती आह्मांवरी नित्य कीं ॥३८॥
हा हा ! माजविला महा प्रलय हा दुष्काळ-काळें जनां ।
प्राणातें मुकती पटापट किती हे अन्नपाण्याविना ॥
त्यांचे वांचविण्यासि जीव, सुचवी सूपाय नानापरी ।
त्यांचें दुःख बघूनि हा तळमळे भारी श्रमांतें करी ॥३९॥

---

1 The uncrowned king of the Deccan.

( वसंततिलका )

आहेत हे सुगुण पूर्ण भले उदार ।
विद्वान्सुशील विरतोद्यम नामदार ॥
न्यायी सदाचरणयुक्तहि देशभक्त ।
देशाभिमानि निजधर्मि सदानुरक्त ॥ ४० ॥

त्यां लोकनायक अशी पदवीच साजे ।
त्यांची जगांत बहु शुभ्र सुकीर्ति गाजे ॥
आहेत निर्भिड नरोत्तम पत्रकार ।
साधे सुशांत बहु सज्जनमान्य धीर ॥ ४१ ॥

ह्या आर्यभूमिंत अशी नर रत्नमाला ।
निर्माण होउनि करो हित भारताला ॥
त्यांच्या श्रमें भरतभूमि सुखी असोंदे ।
तत्कीर्तिच्या परिमलें जग हें भरोंदे ॥ ४२ ॥

होवो जगीं टिळक धन्य चिरायु थोर ।
भोगो अपत्यसह[1] सौख्य सदा अपार ॥
तैशी सदा जगिं करो बहु लोकसेवा ।
नारायणेच्छित असें करि पूर्ण देवा ॥ ४३ ॥

**नारायण श्री० निपाणीकर**

कोल्हापूर.

---

१ तीन पुत्र व तीन कन्या यांसह.

## सदरहू पुस्तक मिळण्याचीं ठिकाणें.

**इंदूर** ( शहर ):– गोपाळ मंदिराचे पिछाडीस श्री. जमनाबाईसाहेब होळकर ह्यांचे वाड्यांत **गोविंद हरि बापट** ह्यांजकडे.

**धारवाड**:—जुन्या तालुका कचेरी जवळ मंगळवार पेठेंत **व्हि. जी. गणपुले** ह्यांजकडे.

**बडोदें**:—रावपुऱ्यांत सरकारी छापखान्यांत **त्रिंबक सखाराम गोखले** ह्यांजकडे.

**धुळें**:—जुनें धुळें येथें **शंकरराव नरहर वेलणकर** ह्यांजकडे.

**मुंबई**:—७ खेतवाडी घ. नं. १२६ अगर **डी. के. राईलकर ॲन्ड को** वाचमेकर्स ठाकुरद्वार.

**रत्नागिरी**:—**श्री. वाय. एस.** दळी ह्यांजकडे.

पुणें, बुधवार चौक } य. गो. दीक्षित.
२०-२-९७ } ( मालकाकरितां )

---



पांडुरंग प्रकाश

## आगाऊ आश्रयदात्यांचीं नांवें.

**अकूट** श्री. ह. ( ९ ); अंतरकर गो. ना. ( ३ ); अत्रे गं. म. ( २ ); अभ्यंकर गं. वा.; अभ्यंकर कृ. ना.; अक्कलकोटे ओं. गं. अनगळ रा. वा.; **आचवल** ना. मि. ( ९ ); आगरकर द. स. ( ४ ); आपटे श्री. वा. ( २ ); आहेट्टी चि. ह.; आपटे कृ. स.; आगाशे र. बा.; आंबेकर ना. त्र्यं.; आपटे गो. शि.; आचवल कृ. पु; **इनामदार** ह. रा. ( २ ); इनामति गु. रा; **उपासनी** स. के. ( २ ); उमराणी पां. ह.; उदोसी मल्लाप्पा आ.; उमरावतीकर म. अं.; उगले शि. ह.; उगले प्रभाकरपंत; **ऋषी** का. वा. ( २ ); ऋषी ब. के.; **ओगले** चिं. वि.; ओक ग. बा. पो. पे.; ओंकार श्रीमंत वा. भा.; ओक गं. बा.; **औरंगाबादकर** के. ल.; **कृष्णराव** शामराव ( ९ ); केसकर ग. वा. ( ९ ); काळे शि. ग. ( २ ); केळकर वा. का. ( २ ); किसनदास विष्णु; कदम वि. श्री.; कुळकर्णी चिं. अं.; कुंटे ह. गो.; कुळकर्णी ग. श्री.; कान्हेरे ना. शि.; कानडे गो. गो.; केतकर ग. बा.; काळकर अ. शि.; काशीकर ग. रं.; काशीकर वा. ब.; कंथारिआ ह. रा.; कोंकणे बा. ज.; केळकर कृ. र.; कानविंदे मं. भ.; करंदीकर स. ना.; केकरे वि. भा.; कासखेडीकर स. भ.; किनखेडे मा. बा.; कामथ म. श्री.; कुळकर्णी आ. बा.; काळगे न. स.; करंदीकर अ. प.; कोळगे ह. पां.; काणे श्री. भि.;

कोठवळे ल. ज.; कानिटकार ह. ग.; करंदीकर मो. मा.; कुवळेकर वि. श्री.; काळे आ. कृ.; केळकर डी. एन; केळकर ग. ह.; करोडे शं. वि.; कोरबा का. बा. किबेसाहेब माधवराव; करंदीकर एस. एन; कारखाननीस डब्ल्यू. डी.; किल्लेदार वा. बा.; कुपेलकर त्र्यं. य.; केळकर गो. प्र.; कुळकर्णी जी. एन.; कपतान माधवराव बाजी.; **खाडिलकर** ल. पां. ( ३ ); खत्री एन. व्ही. ( २ ); खेरडे अंबादास तुकाराम; खांडेकर ग. वा.; खोपकर भाऊराव प.; **गणेश** जयराम ( ६ ); गोळे रा. मा. ( ३ ); गानू के. एस. ( २ ); गोगटे शि. वि. ( २ ); गोविंद राघवेंद्र (२); गिरधरदास बाळकृष्णदास; गणूलाल रामलाल; गटाणे शं. वि.; गाडेकर ग. का.; गोडबोले वि. दी.; गोखले ग. ह.; गणपुले ग. वा.; गाडगीळ त्र्यं. ग.; गाडगीळ म. ना.; गाडगीळ म. ह.; गोखले ना. बा.; गुजर वीरचंद ना.; गाडगीळ वि. कृ.; गोडबोले भा. भि.; गोखले त्र्यं. स.; गंगाधर हरी; गद्रे वा. वा.; गुजर शां. दौ.; गोविंद सदाशिव; गोडबोले वा. गो.; गोसावी गो. बा.;गाडगीळ रा.रा.;गोखले व्ही.एस. गोखले ग.ब.; **घैसास** स. गो. ( ३ ); घाटे रं. ना. ( २ ); घाणेकर ना. कृ.; घोडनदीकर त्र्यं. शि.; **चंद्रचूड** कृ. म. (७); चोबे मं. वा. ( ४ ); चाफेकर ग. रि.; चौबळ गं. वि.; चितळे ना. रा.; चितळे पा. के.; चिखलीकर बा. ज.; चांफेकर पु. ज.; चिठणीस रा. य.; चितळे मो. गो.; चंद्रगडगी ह. वा.; **छत्रे** के. म.; **जयकर** भा. स. (४); **जोशी** डब्ल्यू. डी. ( ३ ); जोशी गो. ल. ( २ ); जोशी

बा. ल.; जोशी श्री. रा.; जोशी वि. न.; जोशी न. म.; जोशी वि. शि.; जोशी ब. गो.; जोशी गं. म.; जोशी दा. ब. नाझर; जोशी. कृ. चिं.; जठार रा. वा.; जवखेडकर का. गो.; जोशी त्रिं. प्र.; जोशी गं. प्र.; जोगळेकर शि. दि.; जोगळेकर के. रा.; जोशी वा. वा.; जोशी वि. वा.; जतकर कृ. ह.; जोशी वा. शि.; जोशी चिं. रा.; जोशी आ. कृ.; जोशी वि· द.; जोशी त्रि. रा.; जोशी वा. ना.; जोशी त्रिं. ना.; जुवेकर के. मो.; जोंडगी च. गु.; जोशी ज. भि.; जोशी ना. बा.; **टिकेकर** जी. एन. ( २ ); टेम्बूलकर श्रीमंत गो. ना.; टकले वि. ना.; **ठोंसर** वि. कृ. ( ४ ); ठाकूर स. गो; ठकार रा. सा व्यं. स.; ठाकूर भि, सु.; डी. संभाजी ( ४ ); डोंगरे वा. दा. ( २ ); डी. बापूजी प. व. इन्स्पेक्टर; **ढमढेरे** ग. शि. ( २ ); ढेकणें ह. ना.; **ताटके** बा, श्री. ( ३ ) त्रिविक्रम नारायण ( २ ); तपस्वी बा. गो.; तात्या बयाजी; तेंडूलकर वि. मा.; तळवलकर आ. व्हि.; तांबे ना. कृ.; तवरगेटी व्हि. आर. तेलंग.; **थोरात** शं. ल.; एम. एन. (२); थत्ते द. वा.; थत्ते वि. ल.; थत्ते. वा. चिं.; थत्ते वि. वा.; **देवस्थळी** सी. जी. ( ३ ); देवरुखकर का. गो. ( २ ); देसाई महादेव लक्ष्मण ( २ ); दामले श्री. रा. ( २ ); दातार धों. रा.; देसाई दि. वा.; देवधर म. रा.; देशपांडे र. रा. दांडेकर पा. स.; देशपांडे मा. त्रि.; देशमुख दा. कृ.; देवधर ग. य. देवणगांवी अं. मं.; दीक्षित मा. ना.; देवळे रं. न.; दुगल न. बा.; देव र. ग.; दातार ग. प. देव रा. त्रिं.; दांडेकर पा. स.;

देसाई श्रीमंत आप्पा साहेब.; देसाई स. कृ.; दीक्षित कृ. पु.; देशपांडे वि. के.; दातार भा. धों.; देशपांडे प्र. ना.; देवभानकर ह. व्यं.; देशपांडे गो. गा. महाजन; दातार धों. ब.; देसाई टी. के.; दाते अ. म.; दाते व. वि.; देशपांडे व्यं. कृ. **धामणसकर** वै. मा. ( ८ ); धोपटकर सदाशिव महेश्वर ( ९ ); धारप ल. मा. ( ४ ); धूपकर जे. डब्ल्यू.; **नित्सुरे** डि. एन. ( ९ ); नागोराव अ. भा. ट्रे. इ. ( ९ ); नरसिंगराव जे. ( ३ ); निपाणीकर ना. श्री.; नातू वि. ब.; निसळ रं. ग.; निसळ रं. भ.; नवरे ना. पां.; नारायणसिंग; हरिसिंग; नेने लक्ष्मणराव; नेने वि. शं.; नित्सुरे गं. अ.; नाझर साहेब जनार्दन वा.; नाईक पां. बा.; नगरकर बा. वि.; नाईक वि. वा.; नाईक ना. रा.; नारकर ना. गो.; तेरुरकर जे. एस.; **पाठक** म. रा. ( ९ ); पाध्ये गो. दा. ( ३ ); पेठे धों. गो. ( २ ); पाटणकर वा. ल.; पुसाळकर का. मु.; परांजपे ना. ग.; परांजपे शं. म.; प्रधान स. भ.; पुरोहित रा. वि. पाटील ग. ना.; पाटणकर वा. प.; पुरंदरे र. पां.; पांडे दि. व्यं.; पाटणकर माधवराव; पाटील अ. गं.; पुसाळकर वि. सी.; पाटणकर रा. म.; परांजपे वि. वि.; पटवर्धन श्री. ग.; पटवर्धन ग. वि.; पाटणकर बा. वि.; पाटुकले शं. रा.; परांजपे अ. गो.; पोतनीस चिं. मा.; पटवर्धन के. कृ.; पुराणिक वा. दा.; **फडतरे** व्यं. कृ. ( ४ ); फणसळकर ह. ना. ( २ ) फाठक वि. गो.; फडणीस ग. आ.; फणसे के. वि.; फाळके ह. ह. फडके वि. स.; फाटक रा. म.; फडके

कृ. य.; फळणीकर वि. म.; बाक्रे बा. वि. ( ९ ); बागाईतकर एस. जी. ( ९ ); बिळगी एन. व्ही, ( ३ ); बोळमल्ल चे. गु.; बडगंडी म. रा.; बर्वे गो. ग.; बापट कृ. ना.; बापट ग. दि.; बर्वे र. भि.; बेडेकर के. पां.; बापट गो. ह.; बेडेकर स. य.; बापट वा. गो.; बेडेकर ल. ग.; बोहरा सिमरतमल्ल; बोरकर अ. के.; बाईंडर शेख हुसेन; बडगंडी म.रा.; बेंद्रे व्यं. वि.; बेगडे वि. ग.; बापट स. वि ;बेहरे वा. रा.; बागलकर गो. ह,; बापट ग. पु.; बेठेकर वि. शि.; भावे बा. न. ( ८ ); भोमे गं. वि. ( ४ ); भेंदे दा. त्रिं. ( ३ ); भागवत ना. न. ( २ ); भाम्बुरकर रा. मा.; भिवापुरकर बी मो.; भागवत वा. वि.; भावे एम. बी; भिडे वि. भि.; भावे ग. ल.; भागवत रा. मो.; भट के. द.; भागवत स. म.; भाटे रा. भ.; भागवत वि. प.; भागवत शि. वा.; भोपटकर भा. ब.; भिस्कुटे द. वि.; भाटे अ. पां.; भावे के. पां.; म्हाडिक गो. ज. ( ३ ); म्हात्रे स. प. ( २ ); माटे भा. नागेश ( २ ); मालगांवकर ग. बा.; महाजन दा. व्यं.; मोरे रा. गो.; मनोहर शि. स.; माधवराव नारायण; मुकादम ग. वि.; मूरकर म. ह.; मंगसुळी आर. एस.; मारवाडी प. दौ. महाबळेश्वरकर के. प.; यज्ञोपवित गो. भा.; यावलकर दा. वा.; रणदिवे गो. ना. ( ९ ); राजाध्यक्ष्य रा. म. ( ३ ); रानडे शि. ग. ( २ ); रासने दा.सा.; राखे बा. ह.; रानडे य. न.; राजवाडकर वा. ल.; रायकर रा. नि.; राजवाडे वि. वि.; रानडे स. त्रिं. रिसवडकर शि. के.; राहतेकर वि. ह.; राजवाडे एन.;

एस; रानडे वि. वि.; राजन्ना आशन्ना; राहाळकर वि. रा.; राईलकर डि. के. ॲन्ड को.; **लोहपात्रे** ह. गं. ( ६ ); लागू गां. चिं. ( ३ ); लागवणकर पु.ज. (२). लक्ष्मीनारायण एन; लिखते कृ. ह; लिमये ह. ग.; लाबजुरी इ. ब.; लाथे सि. मु.; लंके पु. गं.; लळीत धों. बा.; लघाटे गो. ब.; **वाड** ज. त्रि. ( ४ ); वाळिंबे टि. एस. ( ३ ); वाडेकर वा. वि. ( २ ); वैद्य आ. भा. ( २ ); वामन रामकृष्ण पेनशनर; वलवडेकर वा. वि.; वैद्य वि. बा.; वेलिनकर य. रा.; वेलणकर शंकरराव नरहर; वैद्य आ. महेश्वर; वाघ मो. वा.; वैद्य रावसाहेब गणपतराव; वाईकर बा. ल.; वाचनालय. गु. मि. समाज; वकील वा. भि.; विश्वनाथ रामकृष्ण; वैद्य पां. स.; वैशंपायन पु. र.; वझे शं. वि.; व्हावळ प. ना.; वैशंपायन शि. स.; वाळवेकर म. रा.; **शिरगांवकर** आ. रा. ( ३ ); शिंत्रे र. के (२); शौध्ये; वाय. एच. (२); शिदोरे वा. वि.; श्रोत्री गो. वि.; शिंदे भा. ब. ; शिंगारपुरे ना. ग. ; शिळवलकर स. त्रिं. ; शहाणे ज्ञा. रा. ; श्रोत्री. ग. मा. ; शिंपि बि. झेड. ; शिरहट्टी रा. ह. ; शिंदे ना. म. ; शिधये गो. ना.; **सातारकर** ज. श्री. ( ३ ); सोहनी का. ग ( ३ ); स्वादी ल. शि.; सराप त्रि. मा.; से. ने. ज.ला अष्टें; सोमण गो. ह.; साठे धों. रा.; साठे वि. के.; साठे ग. बा.; सप्रे शि. वि.; सावरीकर र. वि.; सावरकर वाय. जी.; से. ने. ज. ला आक्षी; सहस्रबुद्धे के. रा.; साने द. धों.; से. नारगोल सा. हि. सभा;. सदाशिव रावजी; साठे नि. वा.; सोमण गो. ज.; सोमण